डौलाने, दिमाखाने आपण हिंदुस्थानला स्वतंत्र केले, डौलात आपल्याला पुढे जायचे आहे; ही भारतीय स्वातंत्र्याची ज्योत हातात घेऊन आपल्याला डौलात चालावयाचे आहे. जेव्हा आपले हात थकतील तेव्हा ती इतरांच्या हातो द्यावयाची आहे. मग नवजवान हात ती उंच धरतील, आणि आपण आपले काम पूर्ण करून मातीत मिळून जाऊ.

—जवाहरलाल नेहरू

# अनुक्रमणिका

भारत स्वतंत्र झाल्यापासून दर वर्षी 15 ऑगस्ट रोजी लाल किल्ल्यावरून दिलेले श्री० नेहरूंचे भाषण ऐकणे हा एक वार्षिक राष्ट्रीय सण बनला होता. ज्याला समोर बसून भाषण ऐकणे शक्य नसे ते रेडिओवरून ऐकत. परंतु गेल्या दोन वर्षांपासून ती मधुर ओजस्वी वाणी ऐकू येत नाही याचे दुःख होते. नेहरूंनी आपल्या युगात 15 ऑगस्ट रोजी दिलेली भाषणे आकाशवाणीच्या अनुलेखन विभागाने सुरक्षित ठेवलेली आहेत. भारत सरकारच्या प्रकाशन विभागाने त्या महान नेत्याची ही भाषणे त्यांच्याच शब्दांत प्रकाशित केली आहेत. त्यांचा हा मराठी अनुवाद. ही भाषणे प्रत्येक भारतीयाला प्रेरणा देतील, यात शंका नाही. यामध्ये श्री० नेहरूंचे सर्व विचार व त्यात झालेला निरंतर विकास याचे थोडक्यात दर्शन घडेल.

# जनतेचा पहिला सेवक

आजचा हा दिवस मोठा शुभ व मंगल दिवस आहे. वर्षानुवर्षे जे स्वप्न आपण पाहात होतो ते काहींसे आज साकार झाले आहे. काही गोष्टी आपल्या हातात आल्या. आपण एका मुक्कामावर पोचलो, या कल्पनेने आपले अंतःकरण आनंदित झाले आहे. आमचा प्रवास संपलेला नाही, अजून पुष्कळ मुक्काम व्हावयाचे आहेत, हे आम्हाला माहित आहे. तरीपण एक मोठा मुक्काम आपण गाठला आहे. हिंदुस्थानावर आता कोणा परक्याची सत्ता असणार नाही, ही गोष्ट नक्की झाली.

आज आपण स्वतंत्र लोक आहोत, स्वतंत्र देशाचे नागरिक आहोत. मी आज तुमच्याशी एका विशिष्ट स्थानावरून बोलतो आहे. मला एक सरकारी स्थान मिळालेले आहे. खरे म्हणजे, मी हिंदी जनतेचा पहिला सेवक आहे. तेच हे स्थान. त्या स्थानावरून मी तुमच्याशी बोलत आहे. हे स्थान मला कोणी परक्या इसमाने दिलेले नसून तुम्हीच दिलेले आहे; आणि जोपर्यंत तुमचा माझ्यावर विश्वास आहे, तोपर्यंतच मी या स्थानावर राहीन आणि ती सेवा करीन.

आपला देश स्वतंत्र झाला. राजकीय दृष्ट्या परकीय सत्तेचे जे ओझे आपल्यावर होते ते दूर झाले. परंतु स्वातंत्र्य हेही नाना प्रकारच्या जबाबदाऱ्या चे ओझी घेऊन येत असते. आता त्या जबाबदाऱ्याना तोंड देऊन एक स्वतंत्र देश या नात्याने आपल्याला आगेकूच करावयाची आहे व आपले मोठमोठे प्रश्न सोडवावयाचे आहेत. हे प्रश्न फार मोठे आहेत. सार्‍या भारतीय जनतेच्या उद्धाराशी त्याचा संबंध आहे. आपल्याला गरिबीचा नाश करावयाचा आहे, रोगराई नाहीशी करावयाची आहे, निरक्षरता दूर करावयाची आहे. याखेरीज आणखी कितो संकटाचा परिहार आपल्याला करावयाचा आहे, हे तुम्ही जाणताच स्वातंत्र्य ही काही केवळ राजकीय गोष्ट नव्हे. जेव्हा स्वातंत्र्यामुळे जनतेचा फायदा होतो तेव्हाच ते स्वातंत्र्य शोभून दिसते.) सध्या आपल्यासमोर पुष्कळच आर्थिक समस्या आहेत. आपल्या गुलामगिरीच्या काळातील त्या समस्या आहेत. त्यापैकी पुष्कळशा समस्या दुसऱ्या जागतिक युद्धामुळे व युद्धानंतर जगात उद्भवलेल्या परिस्थितीमुळे निर्माण झाल्या आहेत. अन्नाचा तुटवडा आहे, वस्त्राची चणचण आहे, गरजेच्या वस्तूंची कमतरता आहे, आणि त्यात पुन: किमती वाढत आहेत. त्यामुळे जनतेच्या अडचणीही वाढत आहेत.

हे भाषण आकाशवाणीवरून ध्वनिक्षेपित करण्यात आले होते.

या साऱ्या अडचणी आपल्याला काही जादूच्या कांडीने दूर करता येणार नाहीत; परंतु हे प्रश्न हातात घेऊन ते सोडविण्याचा प्रयत्न करणे आणि जनतेला स्वास्थ्य मिळवून देणे, हे आपले कर्तव्य आहे. परंतु त्याच्याही पूर्वी एक प्रश्न आपल्याला सोडवावयाचा आहे. तो आहे शांततेचा. सर्व देशांत शांतता नांदली पाहिजे. आपसातील भांडणे, दंगेधोपे पूर्णपणे बंद झाले पाहिजेत. कारण दंगेधोपे चालू असेपर्यंत कोणतेही काम व्यवस्थितपणे होऊ शकत नाही. म्हणून तुम्हाला माझी पहिली विनंती अशी की आपसातील भांडणे, दंगेधोपे तावडतोब बंद व्हावेत. आज आपले जे नवे सरकार बनले आहे त्यानेही सर्व देशाला उद्देशून हीच विनंती केली आहे. उद्याच्या वर्तमानपत्रात तुम्हाला ती वाचावयास मिळेल. आपसातील वैमनस्य या दंग्याधोप्यांनी का दूर होणार आहे? एके ठिकाणी भांडण होते आणि त्याचा सूड दुसरीकडे उगवला जातो, हे तुम्ही पाहिलेच आहे. याला काही अंतच नाही. या गोष्टी स्वतंत्र लोकांना शोभत नाहीत. ती तर गुलामीची लक्षणे आहेत.

आम्हाला या देशात लोकशाही हवी, असे आपण म्हटले आहे. लोकशाहीत अशा गोष्टी बसत नाहीत. जे काही प्रश्न असतील ते आपसात विचारविनिमय करून, एकमेकांना समजावून घेऊन सोडविले पाहिजेत व आपण जे काही ठरवू ते अमलात आणले पाहिजे

म्हणून पहिली गोष्ट ही की, हे सारे दंगेधोपे बंद झाले पाहिजेत. त्यानंतर आपण तावडतोब, मी आताच सांगितलेले आर्थिक प्रश्न हाती घेतले पाहिजेत. आपल्या देशातील बहुतेक प्रांतात प्रचलित असलेले जमीनविषयक कायदे किती जुनाट आहेत, त्यांचे किती मोठे ओझे आमच्या शेतकऱ्यांवर पडलेले आहे, याची कल्पना तुम्हाला आहे म्हणूनच गेल्या अनेक वर्षांपासून ते कायदे बदलण्याचा प्रयत्न आपण करीत आहोत जमीनदारी प्रथेचे निर्मूलन करण्याचीही खटपट आपण चालविली आहे हे काम आपल्याला लवकर करावयाचे आहे. शिवाय आपल्याला साऱ्या देशाचा आर्थिक विकास घडवून आणावयाचा आहे, कारखाने सुरू करावयाचे आहेत, घरगुती उद्योग वाढवावयाचे आहेत ज्यायोगे देशाची संपत्ती वाढेल अशी कामे हाती घ्यावयाची आहेत अर्थात ही वाढलेली संपत्ती मूठभर लोकांच्या खिशात जाईल अशा पद्धतीने ही कामे होता कामा नयेत, तर सामान्य जनतेला त्याचा लाभ मिळाला पाहिजे आमच्या समोर मोठमोठ्या योजना आहेत, भारतात करावयाच्या कामाचे मोठमोठे आराखडे आहेत, हे तुम्हाला माहित आहे. आपल्या देशात ज्या लहान-मोठ्या नद्या आहेत त्यांच्या पाण्यापासून नवी मोठी शक्ती आपल्याला निर्माण करावयाची आहे, कालवे काढावयाचे आहेत, वीज निर्माण करावयाची आहे. त्या शक्तीच्या साहाय्याने आपल्याला

इतर पुष्कळ कामे करता येतील, या सार्‍या योजना हाती घेऊन आपल्याला त्या वेगाने पार पाडावयाच्या आहेत, कारण त्यांतूनच देशाची संपत्ती वाढेल आणि मग जनतेचा उद्धार होईल.

मला पुष्कळच गोष्टी तुम्हाला सांगावयाच्या आहेत. मी त्या वेळोवेळी सांगेनही. परंतु आज मात्र या दोनचार गोष्टीच मी तुमच्यासमोर ठेवीत आहे. आम्ही कसे काम करीत आहोत, आमच्या डोक्यात कोणकोणते विचार आहेत हे सर्व तुमच्यासमोर मांडण्याची संधी यापुढे नेहमी येत राहील अशी मला आशा वाटते. आम्ही काय करीत आहोत, कशा पद्धतीने विचार करीत आहोत, हे लोकशाहीतील जनतेला समजले पाहिजे. ते तिला पटले पाहिजे. तिच्याच सल्ल्याने सारे काम झाले पाहिजे म्हणून तुमच्याशी आमचा संबंध अगदी जवळचा राहाणे, आवश्यक आहे.

आज मी अधिक काही सांगत नाही. आजच्या या शुभ प्रसंगी तुमच्याशी थोडे बोलावे, आपला जुना संबंध काहीसा ताजा करावा, एवढीच माझी इच्छा होती. म्हणून मी आज तुमच्यासमोर उपस्थित झालो. पुन्हा एकदा या शुभ प्रसंगी मी तुमचे अभिनंदन करतो, शुभेच्छा व्यक्त करतो. परंतु त्याचबरोबर आपल्या जबाबदाऱ्यांचेही स्मरण करून देतो त्याचा अर्थ एवढाच की यापुढे आपल्याला आराम करावयाचा नसून परिश्रम करावयाचे आहेत. परस्पर सहकार्याने कामे करावयाची आहेत. तसे केले तरच आपल्याला आपले मोठमोठे प्रश्न सोडविता येतील.

1947

जय हिंद !

# गांधीजींच्या मार्गाचा विसर न पडो

एक वर्षापूर्वी आपण येथें जमलो होतो. या एका वर्षांत कोण-कोणत्या घटना घडल्या, आपल्यावर कसले-कसले प्रसंग गुदरले! मोठमोठी वादळें झाली आणि त्या खवळलेल्या दर्यात अनेकांनी गोतें खाल्ले, अनेकजण बुडून गेले. तरीपण भारताने त्या खवळलेल्या दर्याला तोंड देऊन आपल्या मजबूत बाहूंनी त्याच्यावर काहीसा विजयही मिळविला. या वर्षांत अनेक घटना घडल्या—चांगल्या व वाईट परंतु या वर्षांत घडलेली सर्वांत मोठी घटना, आपल्यावर झालेला सर्वांत मोठा आघात म्हणजे आपल्या राष्ट्रपित्याचे निर्वाण. गतवर्षी याच प्रसंगी मी तुमच्याशी बोलत होतो. त्या वेळी माझे अंतःकरण काहीसे निश्चिंत होते आणि मी तुम्हालाही म्हटले होते की आपल्यावर कितीही संकटे आली, अडचणी आल्या, तरी आपल्या-जवळ एक फार मोठा आधार आहे, तो आपल्याला सदैव योग्य मार्ग दाखवील आणि आपल्याला धीर देईल. त्यामुळे आपण निश्चिंत होतो. पण तो आधार गेला. आता आपल्याला आपल्या विवेकावर आणि सामर्थ्यावर अवलंबून राहावे लागणार आहे. आज सकाळी आमच्यापैकी पुष्कळ मंडळी राजघाटावर गेली आणि त्या स्थानी आपली श्रद्धांजली वाहून आली असे करणे योग्यच होते. अर्थात वर्षानुवर्ष काही विशिष्ट दिवशी तेथे जाऊन त्याचे स्मरण करणे, एवढेच पुरेसे नाही. त्यांची शिकवण आपल्या अंतःकरणात ठसली पाहिजे. तिच्याप्रमाणे आपण वागले पाहिजे व आपल्या देशाला त्या मार्गाने नेले पाहिजे. जवळजवळ तीस वर्षांपासून त्यांनी भारताला स्वातंत्र्याचा मार्ग दाखविला आणि हळूहळू क्रमाक्रमाने त्यांनी भारताचे सामर्थ्य वाढविले. भारतीय जनतेच्या अंतःकरणातून भीती काढून टाकली आणि शेवटी भारताला स्वातंत्र्य मिळवून दिले. त्यांनी त्यांचे काम पूर्ण केले पण आपण आपले कर्तव्य कितपत बजावले? कितीसे काम पूर्ण केले? आपल्यावर मोठमोठी संकटे आली हे खरे, परंतु मला असे वाटते, नव्हे माझी अशी खात्री आहे की त्यांनी दाखविलेल्या मार्गावरून आपण दृढपणे चाललो असतो तर संकटे आली नसती, आणि आली असती तरी ती लवकर टळली असती. म्हणून माझे तुम्हाला असे सांगणे आहे की ज्या सिद्धान्ताच्या आधाराने आपण भारताला स्वातंत्र्य मिळवून दिले त्याचा आपण दररोज विचार केला पाहिजे. विशेषतः आजच्या दिवशी तर त्याचे चिंतन झालेच पाहिजे. आपण त्या मार्गाला चिकटून आहोत की दुसऱ्या एखाद्या मार्गाने जाऊ इच्छितो याचाही विचार आपण केला पाहिजे. माझ्या वाचनांत बोलावयाचे तर मी तुम्हाला असे सांगू इच्छितो की या विषयासंबंधी मी जे चिंतन केले आहे

त्यावरून भारताचे स्वातंत्र्य कायम राखण्यासाठी, भारताच्या विकासासाठी, भारत हा जगामध्ये एक मोठा देश बनावा यासाठी, आम्हाला स्वतःला मोठे व्हावे लागेल, महात्मा गांधींनी दाखवून दिलेल्या मार्गाने आम्हाला जावे लागेल याविषयी माझी खात्री झाली आहे. भारताला मोठे बनवावयाचे याचा अर्थ केवळ त्याची लांबी-रुंदी वाढवून मोठे बनवावयाचे नाही, तर मोठमोठी कार्ये करणारा व जगात प्रतिष्ठा असलेला असा भारत आपल्याला निर्माण करावयाचा आहे. भारत म्हणजे काय? भारत ही एक फार मोठी वस्तू आहे—हजारो वर्षांपासून चालत आलेली. परंतु वस्तुतः आज भारत म्हणजे काय आहे? तुम्ही-आम्ही आणि या देशात राहणारे कोटयवधी लोक म्हणजेच भारत ना? आपण चांगले असू, सामर्थ्यवान असू, तर भारत सामर्थ्यवान आहे; आणि आपण दुर्बळ असू तर भारत दुबळा आहे. आमच्या अंतःकरणात हिंमत व सामर्थ्य असेल तर ते भारताचे सामर्थ्य बनेल. आमच्यात दुफळी असेल, दुबळेपणा असेल तर भारत दुबळा आहे. भारत ही आपल्याहून एखादी वेगळी गोष्ट नाही. आपण भारताचेच लहान-लहान भाग आहोत. आपण त्याची मुले आहोत. परंतु त्याचबरोबर हे लक्षात ठेवा की आपण आज ज्या पद्धतीने विचार करू व जी कार्ये करू त्यानून उद्याचा भारत बनणार आहे. तुमच्यावर, आमच्यावर, सार्‍या हिंदी जनतेवर फार मोठी जबाबदारी आहे. आपण 'जय हिंद' ची घोषणा, करतो व 'भारतमाता की जय' म्हणतो. परंतु जेव्हा आपण योग्य मार्गावरून चालू, खरी सेवा करू आणि भारताची प्रतिष्ठा व सामर्थ्य ज्यामुळे कमी होईल अशा गोष्टी करण्याचे सोडून देऊ तेव्हाच 'जय हिंद' ची घोषणा प्रत्यक्षात उतरेल.

या गेल्या वर्षामध्ये आपण मोठमोठ्या संकटावर मात केली हे खरे, परंतु त्याचबरोबर आपल्या हातून मोठमोठ्या चुका झाल्या. आपण आपल्या दुबळेपणाचे प्रदर्शन केले आणि योग्य मार्गापासून आपण फार दूर गेलो, हेही तितकेच खरे. आपल्याला भारताचा विसर पडला. आपापल्या जातींचा, धर्मांचा व प्रांतांचाच विचार आपण करीत राहिलो. आपण स्वार्थात गुंतलो. जेव्हा आपण स्वार्थ, द्वेष व दंगे-धोपे यात अडकलो तेव्हा आपल्या देशाचा अधःपात होतो. अर्थात या सार्‍या गोष्टींना आपण तोंड दिले आणि नुकत्याच मिळविलेल्या या स्वातंत्र्यामध्ये एका वर्षानंतर आपण नुसते जिवंतच आहोत असे नव्हे तर चांगले दृढपणे जिवंत आहोत, धट्टेकट्टे आहोत आणि आपली हिम्मतही कमी झालेली नाही. आजकाल जगामध्ये व भारतात पुन्हा युद्धाची चर्चा सुरू झालेली आहे. कोठे लढाई सुरू झाली आहे तर कोठे भावी युद्धाचे वारे वाहू लागले आहेत. अशा स्थितीत आपण कोणाकडे पाहावे? काय करावे? विशेषतः आजच्या दिवशी मी तुमच्याशी युद्धासंबंधी काही बोलू इच्छित नाही. मला फक्त एवढेच सांगावयाचे

आहे की ज्या लोकांना स्वातंत्र्य हवे असते, त्यांनी सदैव आपल्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी, ते कायम टिकविण्यासाठी स्वतःचे बलिदान करण्यास तयार राहिले पाहिजे. जेव्हा एखादे राष्ट्र गाफील बनते तेव्हा ते दुबळे होते व त्याचे अधःपतन होते. म्हणून आपण सदैव तयार राहिले पाहिजे. अर्थात याच ठिकाणी मी एक गोष्ट स्पष्ट करू इच्छितो. ती अशी की आपला देश दुसऱ्या कोणाचा गुलाम बनविण्यासाठी सैन्य बाळगीत नाही किंवा युद्धसामग्री तयार करीत नाही, तर आपल्या स्वातंत्र्याचे रक्षण करता यावे आणि जरूर पडल्यास जगाच्या स्वातंत्र्याला हातभार लावता यावा यासाठी भारताचे सैन्य व युद्धसामग्री आहे. आपण फार काळ गुलामगिरीत राहिलो. त्यामुळे गुलामगिरीविषयी आपल्या मनात तिटकारा निर्माण झाला. मग आपण इतरांना गुलाम कसे बनवू ? म्हणून विशेषतः आजच्या प्रसंगी मी तुम्हाला सातंत्र्यदिनाचे दोन शब्द सांगू इच्छितो. महात्माजींनी आपल्याला जी मूलभूत शिकवण दिली ती शांततेची व अहिंसेची होती. आम्हाला आमच्या दुर्बलतेमुळे त्यांनी दाखविलेल्या मार्गा-वरून पूर्णपणे चालता आले नसेल, हे शक्य आहे, परंतु त्या मार्गावरून आपण पुष्कळच चाललो. आज जगात भारताची मोठी प्रतिष्ठा आहे. ही प्रतिष्ठा का आहे, याचा तुम्ही कधी विचार केला आहे काय ? तुम्ही-आम्ही काही गोष्टी केल्या. त्यातल्या काही चांगल्या होत्या, काही वाईट होत्या. परंतु जग भारता-समोर नमत असेल, त्याचा आदर करीत असेल तर ते त्या एका थोर पुरुषामुळे— ज्याने आम्हाला स्वातंत्र्यापर्यंत आणून पोचविले त्या थोर पुरुषामुळे ! जग त्याच्यासमोर नमले. त्याची शिकवण आपण विसरलो तर ते योग्य होईल काय ? आपण एकोप्याने कार्य करावे, शांततेच्या मार्गाने चालावे, आपसात ऐक्य ठेवावे, आपल्या देशात किंवा देशाबाहेरच्या जगात जातीय दंगली होऊ नयेत हीच तर त्याच्या शिकवणुकीची आधारशिला होती.

या भारताच्या हजारो वर्षांच्या इतिहासात कोणती गोष्ट ठळकपणे दिसून येते याची तुम्हाला कल्पना आहे काय ? भारतीय संस्कृती म्हणजे काय ? भारतीय संस्कृती म्हणजे सहिष्णुता, जातीय दंगे न करणे, जो कोणी येईल त्याच्याशी प्रेमाने वागणे, त्याला जवळ करणे, हीच भारतीय संस्कृती. आता आपण स्वतंत्र झालो असता आपल्या देशाची ही हजारो वर्षांची शिकवण आपण विसरून जाणार काय ? तिचा जर आपल्याला विसर पडला तर भारत हे महान राष्ट्र राहाणार नाही; तो एक लहान, क्षुद्र देश बनेल. आपण जी स्वप्ने रंगविली होती त्यात भारताच्या स्वातंत्र्याचेही स्वप्न होते ते स्वप्न काय होते ? इंग्रज राज्यकर्त्यांनी येथून निघून जावे आणि आपण पतित अवस्थेत राहावे, अशी काही आपली कल्पना नव्हती. भारतातील कोट्यवधी लोकांची स्थिती सुधारावी, त्याचे दारिद्र्य नाहीसे व्हावे, बेकारी राहू नये, त्यांना अन्न मिळावे, राहायला घर

मिळावे, कपडा मिळावा, सर्व मुलांना शिक्षण लाभावे, आणि भारतातील प्रत्येक व्यक्तीला स्वतःचा विकास करून घेण्याची, देशाची सेवा करण्याची, आपले रक्षण करण्याची संधी मिळावी, आणि अशा प्रकारे सारा देश वर उठावा हेच तर आपले स्वप्न होते. काही थोडी मंडळी राजसत्तेच्या उंच खुर्च्यांवर बसली म्हणजे काही देश वर उठत नाही. जेव्हा कोट्यवधी लोक सुखी बनतात व आपली उन्नती करून घेऊ शकतात तेव्हाच त्या देशाचे उत्थान होते. अशा प्रकारच्या उत्थानाचे स्वप्न आम्ही पाहिले होते. जेव्हा भारतातील कोट्यवधी लोकांसाठी दरवाजे उघडले जातील तेव्हा त्यांतील लाखो लायक लोक पुढे येतील, नाम कमावतील आणि जगावर प्रभाव पाडतील, असा विचार आम्ही करीत असू. त्या गोष्टी अजून दूर आहेत; कारण आपण आपसातील भांडणातच गुंतून पडलो. परंतु ते कार्य आपल्याला करावयाचे आहे. जोपर्यंत आपले हे कार्य पूर्ण होत नाही, तोपर्यंत आपले स्वातंत्र्यही अपूर्णच राहील तोपर्यंत आपण मुक्त मनाने 'जय हिंद' ही म्हणू शकणार नाही.

आज आपण फार मोठ्या संकटात सापडलो आहोत. या दिल्ली शहरात आणि भारताच्या वेगवेगळ्या भागात आपले कितीतरी निर्वासित बांधव हालात दिवस काढीत आहेत. त्यांच्यापैकी काही लोकांची व्यवस्था झाली, काही लोकांची अजून झालेली नाही. शिवाय इतर अनेक लोक, भाववाढीमुळे सर्वसामान्य जनतेवर कोसळलेल्या आपत्तीत सापडले आहेत. हे सारे मोठे प्रश्न आहेत आम्हाला सत्तेच्या सिंहासनावर बसविण्यात आले आहे त्यामुळे हे प्रश्न सोडविण्याची जबाबदारी आमच्यावर आहे. परंतु आपण हे विसरता कामा नये की कोणत्याही स्वतंत्र देशात सामान्य जनतेचे संपूर्ण सहकार्य मिळाल्याखेरीज मोठमोठे प्रश्न सोडविता येत नाहीत. टीका करण्याचा, हरकत घेण्याचा तुम्हाला अधिकार आहे. ठीक आहे. सर्वांनी डोळे मिटून प्रत्येक गोष्ट मान्य करावी, अशा पद्धतीने, मूकपणाने देशाचे गाडे चालत नसतात. परंतु तुम्ही एक स्वतंत्र राष्ट्र असाल तर केवळ हरकत घेऊन, टीका करून भागणार नाही. तुम्ही ते ओझे उचलले पाहिजे, सहकार्य केले पाहिजे, मदत दिली पाहिजे आपण सर्वांनी ही गोष्ट केली तर मोठमोठे प्रश्न सुटतील. या ठिकाणी आपण लाखो मंडळी जमला आहात तुम्ही स्वतःला विचारा की आम्ही भारताची काय सेवा केली ? तुमच्यापैकी प्रत्येक स्त्रीपुरुष, आबालवृद्ध दररोज कोणत्या लहानमोठ्या गोष्टी करीत असतो ? या भारताची काही ना काही सेवा करणे हे तुमचे-आमचे पहिले कर्तव्य आहे. पुष्कळ लोकांनी मिळून थोडे-थोडे काम केले तरी त्यातून एक फार मोठी वस्तू निर्माण होते. परंतु ही सारी जबाबदारी काही थोड्या अधिकाऱ्यांची आहे, राजसत्तेच्या खुर्च्यांवर बसलेल्यांची आहे, असे जर आपण समजलो तर ती चूक आहे. स्वतंत्र देश अशा प्रकारे

वागत नसतात. गुलाम देश अशा प्रकारे विचार करतात आणि याच पद्धतीने त्याचा कारभार चालविला जातो. जेव्हा देशावर परकीयांची सत्ता असते तेव्हा परकीय त्याना वाटेल ते करतात; परंतु स्वतंत्र देशामध्ये तुम्हाला स्वातंत्र्याचे फायदे हवे असतील तर स्वातंत्र्याच्या जबाबदाऱ्याही तुम्ही स्वीकारल्या पाहिजेत, स्वातंत्र्याचे ओझेही उचलले पाहिजे, स्वातंत्र्याची शिस्तही पाळली पाहिजे. गुलामगिरीच्या काळातील आपल्या जुन्या सवयींचा अजून आपल्याला विसर पडलेला नाही. आपण स्वतः काही न करता सार्‍या गोष्टी वरून झाल्या पाहिजेत, असे आम्हाला वाटते. आपण स्वतंत्र झालो असल्यामुळे एका स्वतंत्र राष्ट्राप्रमाणे प्रत्येकाने वागले पाहिजे, ती जबाबदारी स्वीकारली पाहिजे, ते ओझे उचलले पाहिजे, ही गोष्ट तुम्ही नीट समजून घ्यावी अशी माझी इच्छा आहे.

आपल्या सरकारचे जे नवे-जुने अधिकारी आहेत त्यानाही मला दोन शब्द सांगावयाचे आहेत. काम करण्याच्या जुन्या पद्धतींमध्ये ज्या चांगल्या गोष्टी होत्या त्या आपल्याला कायम ठेवावयाच्या आहेत, आणि ज्या वाईट गोष्टी होत्या त्या मोडून द्यावयाच्या आहेत. आता जुन्या पद्धतीने कामे करून चालणार नाही. सरकारी अधिकाऱ्यांनी या देशाच्या निर्मितीस हातभार लावावयाचा आहे. त्यांनी जनतेशी सहकार्य केले पाहिजे व जनतेचे सहकार्य मिळविले पाहिजे. आजकाल आपल्या सरकारच्या कामाची सगळीकडे खूप निंदा होत आहे, हे तुम्हाला माहित आहे म्हणून आपल्या लहान-मोठ्या अधिकाऱ्यांनी विचार करावा आणि त्यांच्या, आपल्या व सर्वांच्याच परीक्षेची ही वेळ आहे, हे त्यांनी ओळखावे विशेषतः जबाबदारीच्या जागेवर असलेल्या प्रत्येक व्यक्तीने आपले काम प्रामाणिकपणे, चोखपणे बजावले पाहिजे त्यांनी कोणत्याही बाबतीत पक्षपात करता कामा नये कारण जो कोणी अधिकारी किंवा जबाबदार माणूस पक्षपात करीत असेल तो आपल्या जागेला लायक नाही, असे म्हणावे लागते. आम्हाला मोठमोठी कामे करण्यासाठी लायक माणसे हवी आहेत, हे खरे परंतु लायकीपेक्षाही जास्त आवश्यक गोष्ट म्हणजे प्रामाणिकपणा, सचोटी आणि सेवावृत्ती ही आहे. आपण देशाची नीट सेवा केली नाही, आमच्यामध्ये प्रामाणिकपणा नसेल, तर आपल्या लायकीचा काय उपयोग? त्या लायकीमुळे देशाचे उलट जास्त नुकसानच होऊ शकते.

म्हणून सर्वांत पहिला धडा आपल्याला हा शिकावयाचा आहे की या देशाला सत्याच्या मार्गाने न्यावयाचे आहे. हा मूलभूत धडा महात्माजींनी आपल्याला शिकविला होता. त्याप्रमाणे इतकी वर्षे कमी-अधिक प्रमाणात आपण वागलो त्यामुळे जगात भारताची प्रतिष्ठा वाढली. इतकेच नव्हे तर, आपण जरी दुर्बळ असलो व पदोपदी ठेचा खात असलो तरी, विश्वेच लोक आजही भारताकडे आशेने

पाहात आहेत; कारण आपण आपल्या राजकारणाला एक वेगळे रूप दिले होते. सामान्यत: राजकारण ही फसवाफसवीची, लबाडीची बाब आहे, असे समजले जात होते, परंतु गांधीजींनी जे राजकारण आपल्याला शिकविले त्या भारतीय राजकारणात असत्य व लबाडी यांना त्यांनी स्थान दिले नाही. अजूनही लोकांना असे वाटते की लुच्चेगिरी करून देश पुढे जातात. परंतु लुच्चेगिरीने एखाद्या वेळी थोडाना फायदा होत असला तरी त्या मार्गाने व्यक्तीचीही उन्नती होत नाही किंवा राष्ट्राचीही प्रगती होत नाही विशेषत: जी राष्ट्रे महान असल्याचा अभिमान बाळगतात ती जगामध्ये लबाडीने, फसवेगिरीने फार पुढे जाऊ शकत नाहीत. हिंमत, सचोटी, शौर्य व सेवा याच्या बळावरच ती पुढे जातात. म्हणून या वेळी हा धडा आपण प्रामुख्याने लक्षात ठेवला पाहिजे. आपल्या अंत:करणांत असलेले वैमनस्य, द्वेष काढून टाकला पाहिजे. एखादे संकट आले, एखादा शत्रू उद्भवला तर त्याला आपण अवश्य तोंड देऊ. परंतु अंत:करणात वैर असेल, द्वेष असेल, जळफळाट असेल, तर आपले सामर्थ्य वाया जाते; आणि आपण फारसे काम करू शकत नाही.

राजकारण म्हणजे काय? आणि देशाचे काम म्हणजे काय? राजकारण किंवा राजनीती ही एक नीती आहे, धोरण आहे. परंतु सोवटी कोटयवधी लोक काम करून देशाला ज्या दिशेने नेतात त्या दिशेने तो जातो. त्या कोटयवधी लोकांची लहान-लहान कामे मिळून देशाचे एकूण काम होत असते. देशाची संपत्ती कोणती? तुम्ही मंडळी आणि देशातील सगळे लोक स्वत:च्या परिश्रमाने जी मिळविता ती देशाची संपत्ती. ही संपत्ती काही वरून पडत नाही. याचा अर्थ असा की कोटयवधी लोकांच्या कामाचे एकत्रीकरण म्हणजेच देशाचे काम आपल्या देशातून गरिबीचे उच्चाटन करावयाचे असेल तर आपल्या परिश्रमानी काम करून, संपत्ती निर्माण करूनच ते करता येईल. काही लोकांना वाटते की कोठून तरी बाहेरून संपत्ती यावी आणि आपण ती वाटून द्यावी. पण पैसा येतो कोठून? पैसा येतो जनतेच्या परिश्रमातून. लोक आपल्या श्रमानी जे निर्माण करतात, जमीनदार किंवा शेतकरी शेतातून जे उत्पन्न काढतात, कारखान्यातून जे मिळवतात, दुकानांतून जे कमावतात.......... या मार्गांनी देशाची संपत्ती वाढते आणि देश प्रगती करतो. इतराना सल्ला देऊन प्रगती होत नसते. तर या देशाच्या उन्नतीसाठी आपण काय करतो आहोत, याचा विचार केल्याने प्रगती होते. आपल्या कामानी व सेवेने आपण देशाला किती पुढे नेतो आणि त्याच्या संपत्तीत किती भर घालतो याचा विचार आपण करीत राहिलो तर आपण आपल्या देशाला वेगाने पुढे नेऊ शकू, मजबूत बनवू शकू आणि जगात त्याला श्रेष्ठ स्थान

वाटते, दुःख होते. आपले काही देशबांधव वाट चुकून कसे आडमार्गाला लागले आहेत हे पाहिले की मनाला क्लेश होतात. हे लोक तोंडाने म्हणतात की, आम्ही भारताला पुढे नेणार आहोत, परंतु वस्तुतः ते भारताची पाळेमुळे खणून काढीत आहेत, भारताच्या श्रेष्ठत्वाला काळिमा फासत आहेत.

म्हणून तुम्ही या बाबतीत सावध व्हा; कारण जर कोणती गोष्ट भारताचे नुकसान करीत असेल तर ती म्हणजे आमच्या अंतःकरणाची दुर्बलता, आमच्या मनाची क्षुद्रता. बाहेरचा शत्रू आमचे काही नुकसान करू शकणार नाही. आपले सामर्थ्य पुष्कळ आहे व आपले सामर्थ्य यापुढेही वाढेल. परंतु आम्ही स्वतःलाच विसरलो, आमच्या थोर पुरुषांच्या शिकवणुकीचा आम्हाला विसर पडला, आमच्या इतिहासाचा आम्हाला विसर पडला, तर मग बाहेरच्या शत्रूची काय जरूर? आम्ही स्वतःचीच हत्या करू. म्हणून ही गोष्ट तुम्ही लक्षात ठेवा. ज्या विषाने भारताचे इतके तुकडे केले, त्याला तुम्ही आपल्याजवळ येऊ देऊ नका. त्या विषाने एका बाजूने येऊन हिंदुस्थानचे तुकडे केले आणि दुसऱ्या बाजूने पुनः भारतात प्रवेश करून आम्हाला हतबल केले. त्याने आम्हाला फार जोराचा धक्का दिला, आणि इतके अपमानित केले की जगासमोर आपल्याला शरमेने मान खाली घालावी लागली. तेव्हा आजच्या या दिवशी आपण या गोष्टींचा विचार करावा, विचार करून आपले मन निर्मळ व दृढ करावे आणि महात्माजींनी दाखविलेल्या मार्गाने जाऊन देशसेवा करण्याची आपली जुनी प्रतिज्ञा प्रामाणिकपणे पुनः एकदा घ्यावी. असे झाले तरच आजचा दिवस शुभ आहे आणि आपल्याला 'जय हिंद' म्हणण्याचा हक्क आहे, असे म्हणता येईल. परंतु ही गोष्ट आपण समजून घेतली नाही, आणि संकुचितपणा व आपसातील भांडणे यातच आपण गुंतून राहिलो तर आजचा दिवस आपल्याला शुभ ठरणार नाही.

आपण येथून घरी जाऊ व आपापल्या कामास लागू. परंतु आपण या देशात जन्माला आलो आहोत तर आपले कर्तव्य काय हा विचार आपण नेहमी कामधंदा करीत असताना आपल्या मनात सतत जागृत राहील अशी मला आशा वाटते. जगाला थक्क करणारा आणि भारताला स्वातंत्र्य मिळवून देऊन पुढे नेणारा असा तो कोणता महापुरुष आपल्या देशात जन्माला आला होता? त्याने काय कार्य केले? त्याने आपल्याला काय शिकविले? त्याने दाखविलेल्या मार्गाने आपण जात आहोत की नाही?—हे प्रश्न तुम्ही आपल्या मनाला विचारा. त्यापासून तुमचे काही अकल्याण होणार नाही, कल्याणच होईल, याविषयी खात्री बाळगा.

कोणताही मानव किंवा कोणताही देश चिखलातून जाऊन श्रेष्ठ होत नाही. गुडघे टेकून आणि मान खाली घालून आपणाला पुढे जावयाचे नाही, अभिमानाने छाती पुढे काढून आणि खरे बोलून सत्याच्या मार्गाने आपण पुढे जात

राहिलो तरच आपले सामर्थ्यही वाढेल आणि जगातील आपली प्रतिष्ठाही वाढेल. त्या वेळी आम्हाला विरोध करण्याची हिंमत कोणाही शत्रूला होणार नाही. एवढया गोष्टी तुम्ही लक्षात ठेवा. एवढी खूणगाठ मनाशी बांधून आजचा दिवस साजरा करा, म्हणजे मग भारताची प्रतिष्ठा कितीतरी वाढलेली तुम्हाला दिसून येईल. त्या योगे भारताचे सारे प्रश्न काही एकदम सुटणार नाहीत, परंतु ते सुटण्याच्या मार्गावर असतील आणि आमच्या आम जनतेच्या अडचणी कमी होतील.

शेवटी एक गोष्ट लक्षात ठेवा. आमच्या शक्तीप्रमाणे आम्ही कित्येक वर्षांपूर्वी भारताच्या स्वातंत्र्याची मशाल वर धरली होती. आमच्या वाडवडिलांनी ती आम्हाला दिली होती. आम्ही आमच्या शक्तीप्रमाणे ती पुढे नेली. पण आता हळूहळू आमचा काळही संपत चालला आहे. यापुढे ती मशाल, ती ज्योत वर धरून ती तेवत ठेवण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे. तुम्ही भारताची लकरे आहात, भारताचे रहिवासी आहात—मग तुमचा धर्म कोणताही असो, तुमचा प्रांत कोणताही असो! ती ज्योत अभिमानाने तेवत ठेवणे हे तुमचे कर्तव्य आहे. ती ज्योत आहे स्वातंत्र्याची, सातंत्र्याची आणि सत्याची! लक्षात ठेवा, माणसे येतात आणि जातात. परंतु राष्ट्रे अमर असतात. त्याच्यात जोपर्यंत प्राण असेल, हिम्मत असेल तोपर्यंत ती कधी नष्ट होत नाहीत. म्हणून तुम्ही ही मशाल सतत तेवत ठेवा. एक हात थकून मागे सरला तर तिला तेवत ठेवण्यासाठी हजार हात सदैव तयार असले पाहिजेत.

1948

जय हिंद !

# प्रत्येकाने आपापले काम करावयाचे आहे

आपण जरा शांत व्हा. दोन वर्षांपूर्वी मी या लाल किल्ल्यावर हा तिरंगी झेंडा फडकविला होता. तुमच्या आमच्या जीवनातील दोन वर्षे निघून गेली आणि भारताच्या हजारो वर्षांच्या इतिहासात दोन वर्षांची भर पडली. या हजारो वर्षांमध्ये दोन वर्षांचा काळ म्हणजे काही फार मोठा काळ नव्हे. त्याचे काही फारसे महत्त्व नाही. परंतु या दोन वर्षांमध्ये तुम्ही आम्ही, आपल्या साऱ्या देशाने पुष्कळच वऱ्यावाईट गोष्टी पाहिल्या; अनेक आनंदोत्सव साजरे केले आणि पुष्कळ दुःखही भोगले.

आपण सारे चार दिवसाचे पाहुणे आहोत. आपापले काम करून आपण पुढे जाणार. परंतु जे काम आपण करतो ते चांगले असेल, मजबूत असेल, तर ते काम चालत राहील, ते कायम राहील–मग आपण राहू किंवा न राहू! कितीही लोक आले आणि गेले तरी आपला हा देश कायम राहणार आहे, चालत राहणार आहे. आपल्यासमोर मोठमोठे प्रश्न आहेत, समस्या आहेत, त्यात आपण अडकलो आहोत. ते प्रश्न आपल्याला रेटत आहेत. त्यांच्याशी आपण दोन हात केले पाहिजेत. ते समजून घेतले पाहिजेत; कारण जोपर्यंत आपण ते प्रश्न सोडवीत नाही, आणि आपल्या देशातील कोट्यवधी लोकांचे जीवन योग्य प्रकारे चालत नाही, तोपर्यंत आपले काम पूर्ण होणार नाही परंतु अधून-मधून आपण आपले तात्कालिक प्रश्न थोडा वेळ बाजूला ठेवून आपल्या देशात व जगात काय चालले आहे, कोणत्या मोठ्या घटना घडत आहेत हेही पाहिले पाहिजे. आपली वैयक्तिक दुःखे विसरून देशाचे स्मरण केले पाहिजे.

तुम्हाला आठवत असेल की एके काळी एका महापुरुषाच्या प्रकाशाने आपली अंतःकरणे उजळून निघाली होती. महात्माजींची शिकवण ऐकून त्याचा आवाज आमच्या कानात आणि हृदयात दुमदुमला होता; आणि आपण, या देशातील कोट्यवधी लोक आपल्या सामान्य घरगुती गोष्टी विसरून, आपसातील भांडणे विसरून, आपल्या कुटुंबांनाही विसरून, आपली संपत्ती व मालमत्ता यांची पर्वा न करता मैदानात उतरलो होतो. त्या वेळी आपल्या फायद्याचा, आपल्या हुद्याचा किंवा आपल्या नोकरीचा प्रश्नच उपस्थित होत नसे. जर कोणती स्पर्धा चालत असे तर ती हीच की देशाची सेवा जास्त कोण करतो; देशाला स्वातंत्र्याच्या दिशेने जास्त दूरवर कोण नेतो ते आमचे एक स्वप्न होते. कधी-कधी तर वेड्यासारखे आपण त्या स्वप्नाच्या मागे धावलो. त्या स्वप्नाला साकार बनविण्याची धडपड आपण केली. देशाचे स्वातंत्र्य आणि त्या स्वातंत्र्याबरोबरच

देशातील कोट्यवधी लोकांचे स्वातंत्र्य, दुःख व दारिद्र्य यापासून त्यांची सुटका—हा या देशापुढील सर्वांत मोठा प्रश्न होता. आपण देशाला राजकीय दृष्ट्या स्वतंत्र केले. परंतु त्यानंतर आपणापुढे एक फार मोठा प्रश्न शिल्लक राहिला तो म्हणजे, आपल्या जनतेला या स्वातंत्र्याचा फायदा पूर्णपणे कसा मिळवून देईल? परंतु नंतरच्या काळात दुसरी गडबड झाली.

ही गडबड कोणती ते, तुम्हांला माहीत आहे. पाकिस्तानातून 50-60 लाख निर्वासित आमच्या देशात आले आणि त्यांच्यावर हजारो आपत्ती आल्या. या मोठमोठ्या संकटांना आम्ही कसे तोंड दिले ते तुम्ही जाणताच. आम्ही काही गोष्टी चांगल्या केल्या, काही वाईट केल्या. आमच्याकडून काही चुका झाल्या तर काही बाबतीत आम्हाला यश मिळाले. अशा प्रकारे ठेचा खात-खात आपण पुढे गेलो. कशी का होईना, आपण आगेकूच केली. कारण आपले सामर्थ्य इतके होते की संकटेही आपल्याला अडवू शकली नाहीत. गेल्या दोन वर्षांतील घटनांचे तुम्ही निरीक्षण कराल तर तुम्हाला अनेक वाईट गोष्टी दिसून येतील, असे मला वाटते. परंतु तरीहि हा एवढा प्रचंड देश गंभीरपणे आगेकूच करीत आहे, आपले स्वातंत्र्य मजबूत बनवीत आहे, असे तुम्हाला आढळून येईल. या देशात हजारो उणीवा असतील, हजारो चुका त्याने केल्या असतील, तरीही त्याचे स्वतःचे असे मूलभूत सामर्थ्य आहे, आत्मविश्वास आहे. तो त्याला पुढे नेत आहे. ज्याने आपल्याला या स्वातंत्र्याकडे आकर्षित केले, आपल्याला स्वातंत्र्य मिळवून दिले, ते सामर्थ्य कोणते? जेव्हा आपण एका प्रचंड साम्राज्याविरुद्ध छाती काढून उभे राहिलो, तेव्हा आपण कशावर विसंबून होतो?

एखादा देश आपल्याला मदत करील या आशेने आपण परक्या देशाकडे पाहिले नव्हते; किंवा शस्त्रास्त्रांकडेही पाहिले नव्हते. आपण स्वतःवरच विसंबून राहिलो. आपल्या अंतःकरणाच्या सामर्थ्यावर, आपल्या धैर्यावर विसंबून, आपल्या एका थोर नेत्यावर भरवसा ठेवून आणि शेवटी भारतावर विश्वास ठेवून आपण पुढे सरलो. आपण पुढे गेलो आणि एका मोठ्या शक्तीशी सामना दिला. तिला आपण खाली पाडले, चीत केले. तर मग आता आपल्याला कशाची भीती? आपण का घाबरावे? का अस्वस्थ व्हावे?

आपल्यासमोर मोठमोठ्या समस्या आहेत, आर्थिक प्रश्न आहेत, हे खरे आहे. आपल्या लाखो निर्वासित बांधवांचे व्यवस्थित पुनर्वसन अद्यापि झालेले नाही. त्यांना आपल्याला स्थायिक करायचे आहे, त्यांचे प्रश्न सोडवावयाचे आहेत, हेही खरे. पण त्याचबरोबर आपल्याला पुढे नेणारे ते जुने सामर्थ्यही आपल्यापाशी नाही काय? ते सामर्थ्य कधी-कधी मूठभर व्यक्तींना पुढे घेऊन जाई आणि ती मूठभर माणसे साऱ्या देशावर प्रभाव पाडून संपूर्ण देशाचे भाग्य बदलून

टाकीत असत. हे जे सामर्थ्य पूर्वी आपल्यामध्ये होते, ज्याने या देशात क्रांती घडवून आणली, इतकी उलथापालथ केली ते आजच्या स्वतंत्र भारतात कमी झाले आहे काय ? मला तर असे वाटते की ते सामर्थ्य या देशात विद्यमान आहे, इतकेच नव्हे तर ते पूर्वीपेक्षाही जास्त आहे. परंतु आमची मने विचलित होतात, आमची दृष्टी इकडे-तिकडे भटकते आणि मोठ्या गोष्टींचा विसर पडून आपण क्षुल्लक गोष्टीत गुरफटतो.

या वेळी आपला हा भारत देश जगाच्या मैदानावर मोठ्या देशाबरोबर एक मोठा खेळ खेळत आहे. आपण एका मोठ्या देशाचे मोठे नागरिक आहोत. म्हणून आपले मन व बुद्धी हीही मोठी असली पाहिजेत. क्षुद्र माणसे मोठी कामें करीत नसतात. क्षुद्र माणसांना मोठे प्रश्न सोडविता येत नसतात. आरडाओरड करून, घोषणा करून, तक्रारी करून, हरकती घेऊन किंवा दुसऱ्यांना दोष देऊन प्रश्न सुटत नसतात. आपल्यापैकी प्रत्येक स्त्रीपुरुषाने आपापले कर्तव्य बजावले तर त्यात आपले कल्याण आहे, आपल्या देशाचे कल्याण आहे. याच्या उलट प्रत्येक माणूस पार असे समजू लागला की जे काही करावयाचे असेल ते दुसऱ्याने करावे, आपण फक्त बघत राहाणार, तर हा देश पुढे जाऊ शकणार नाही. प्रत्येकाने आपापले काम करावयाचे आहे. आपले सैन्य आहे, त्याने आपले कार्य धैर्याने व शौर्याने केले पाहिजे आणि ते तसे करीतही आहे. आपल्या विमानात आणि जहाजावर काम करणारे जे नवजवान आहेत त्यांनीही धैर्याने काम केले पाहिजे. याच्याशिवाय सरकारी नोकरी करणारे इतर पुष्कळ लोक आहेत. त्यांच्यापैकी काही मोठ्या हुद्यावर आहे., काही लहान हुद्यावर आहेत. त्यांची वेगवेगळी कर्तव्ये आहेत. त्यांनी ती पार पाडली आणि आम जनतेने आपले कर्तव्य बजावले तर सर्व काही व्यवस्थित होईल. प्रत्येकजण आपापल्या मार्गाने गेला आणि आपण एकमेकांशी निर्भयपणे सहकार्य केले तर भारत किती वेगाने आगेकूच करतो, हे तुम्ही पाहाल. परंतु पुष्कळ वेळा प्रत्येकजण आपल्या कामाकडे पाहाण्याऐवजी दुसऱ्याच्या कामाकडे पाहातो त्यामुळे त्याचेही काम होत नाही आणि दुसऱ्याचेही होत नाही.

म्हणून आजच्या प्रसंगी माझी तुम्हाला एक विनंती आहे. एके काळी सैन्या-शिवाय, शस्त्रास्त्राशिवाय, बाहेरच्या मदतीशिवाय, पैशाशिवाय या देशाच्या स्वातंत्र्याचे युद्ध आपण लढलो. तो काळ तुम्ही आठवा. ते युद्ध कोणी केले होते ? या देशात मोठमोठे पुढारी होते. महात्माजी हे आपले फार मोठे पुढारी होते. परंतु अखेर या देशाच्या स्वातंत्र्याची लढाई तुम्ही-आम्ही, आमच्या लोकांनी, सामान्य लोकांनी, अत्यंत गरीब लोकांनी केली होती. त्या युद्धाचे ओझे त्यांच्या-वरच पडले होते. त्यात ते कसे विजयी झाले ? —आपल्या हिंमतीने, आत्म-

विश्वासाने आणि आपल्या देशावरील व आपल्या पुढाऱ्यांवरील विश्वासाने. त्या वेळेपेक्षा आज आपले सामर्थ्य किती जास्त आहे, याची तुम्हीच कल्पना करून पाहा. बाहेरच्या शत्रूला तोंड देण्याचे व अंतर्गत शत्रूशी सामना देण्याचे सामर्थ्य स्वतंत्र भारताजवळ कितीतरी अधिक आहे. अशा स्थितीत आपण हवालदील झालो, तक्रारी करू लागलो आणि आत्मविश्वास गमावून बसलो तर ते विचित्रच नव्हे काय ?

तुम्ही स्वत:वर विश्वास ठेवा आणि आपल्या देशावर विश्वास ठेवा. आमचा आमच्या देशावर आणि देशाच्या भवितव्यावर विश्वास नसता तर 'गेल्या तीस-चाळीस वर्षांत आम्ही जे काही लहान-मोठे कार्य केले ते आम्ही करू शकलो असतो, असे तुम्हाला वाटते काय ? आमच्यासमोर एका महापुरुषाचा प्रकाश होता. महात्माजींचा प्रकाश ! तो आमच्या अंतःकरणांना प्रकाशमान करीत होता. आमच्यासमोर एक तारा होता. तो होता भारताच्या भवितव्याचा ! स्वतंत्र भारताच्या भवितव्याचा ! तो आम्हाला आकर्षून घेत होता. त्याच्याकडे पाहून आमचे सामर्थ्य वाढत होते, धैर्य वाढत होते. कोणतेही संकट आले तरी ते फुलासारखे हलके वाटत होते. तर मग आज आपले सामर्थ्य वाढलेले असताना आपण दुबळेपणा का दाखवावा ? आपसात का भांडावे ?

मूलभूत मुद्दा हा आहे. एखाद्या बाह्य शक्तीला किंवा सत्तेला घाबरण्याचे कारण नाही. आपले मन योग्य रीतीने कौल देत नसेल तर आपण दुबळे ठरू. आपसात दुफळी असेल तर आपण दुर्बळ बनतो. ही गोष्ट तुम्ही चांगली लक्षात ठेवा. कारण आपणा सर्वांच्या, आपल्या देशाच्या परीक्षेची ही वेळ आहे. तसे पाहिले तर परीक्षेची, कसोटीची वेळ ही नेहमीच असते—विशेषतः आजकालच्या जगात. एक मोठे कार्य आपण केले; परंतु ते काम अर्धेच होते. दुसरे मोठे काम अजून शिल्लक आहे. ते म्हणजे या देशाची आर्थिक स्थिती सुधारणे, या देशातील जनतेच्या अडचणी दूर करणे.

या काही लहान-महान गोष्टी नाहीत आम्ही आमचे सारे सामर्थ्य पणाला लावले तरीही कदाचित हे काम पूर्ण होणार नाही. तरीपण आम्ही आमचे कर्तव्य करणार. आमच्या मागून येणारी मंडळी ते पुढे चालू ठेवतील; कारण देशाची कामे कधी संपत नसतात. देशातील लोक येतात व जातात; परंतु देश अमर असतो, जनता अमर असते. सांगावयाचे तात्पर्य हेच की ते मोठे कार्य अजून शिल्लक आहे, ते पूर्ण करावयाचे आहे. त्या बाबतीत तुम्ही दोन-तीन गोष्टी लक्षात ठेवा. पहिली गोष्ट ही की तुमचे एक निश्चित धोरण असले पाहिजे. अर्थात

जोपर्यंत देशात शांतता नसेल, काम करण्याची संधी नसेल, तोपर्यंत तुम्हाला तुमचे धोरण अमलात आणता येणार नाही. आपल्या देशात काही वाट चुकलेले तरुण हुल्लडबाजी करतात, दगेधोपे करतात, कधी-कधी बाँबही टाकतात. ज्याला थोडीतरी अक्कल आहे, बुद्धी आहे, असा माणूस अशा प्रकारच्या देशद्रोही गोष्टी कशा करू शकतो, याचेच मला आश्चर्य वाटते. तुमचे धोरण काहीही असले तरी देशात दंगेधोपे, गुंडगिरी चालू असेल तर तुम्ही ते अमलात आणू शकणार नाही. हुल्लडबाजी व दगेधोपे यामुळे देशाचे पतनच होणार. देशातील गरिबी तुम्ही कशी दूर करणार ?

आपल्या स्वतंत्र देशात कायदे बदलण्याचे, इतकेच काय पण सरकार बदलण्याचेही काही मार्ग आहेत. त्या शांततापूर्ण मार्गांनी वाटेल ते करण्याचा तुम्हाला, देशाला हक्क आहे. परंतु जर काही लोक दुसऱ्या मार्गाने, हिंसेच्या मार्गाने जात असतील तर त्यावरून अनेक गोष्टी सिद्ध होतात. पहिली गोष्ट अशी की त्या लोकांचा लोकशाहीवर विश्वास नाही. दुसरी गोष्ट अशी की देशाची जनतेची स्थिती बिघडावी, तिच्या अडचणी वाढाव्यात असे त्यांना वाटते कदाचित दहा-वीस वर्षांनी जनतेची उन्नती होईल असे त्यांना वाटत असावे; परंतु आज तरी त्यांच्या कारवायांमुळे जनतेवरील आपत्ती वाढणार हे नक्कीच आहे

अशा प्रकारच्या दंगाधोप्यांनी व हुल्लडबाजीने आपण देशाची सेवा करीत आहोत, असे आमच्या काही तरुणांना वाटते, हे पाहून मी थक्क होतो त्यापेक्षाही अधिक आश्चर्याची गोष्ट अशी की काही लोक "आमचा या हुल्लडबाजीला विरोध आहे" असे म्हणतात परंतु दंगेधोपे व हुल्लडबाजी करणाऱ्या लोकांशी ते राजकारणामध्ये सहकार्य करतात. याचे कारण काय? याचे कारण एवढेच की आपला काही लहानसा फायदा व्हावा, एखादी निवडणूक जिंकता यावी, एवढाच हेतू त्यांच्या मनात असतो निवडणुकीत जय-पराजय हे असावयाचेच. परंतु तुमच्या-आमच्यासमोर जे प्रश्न आहेत ते निवडणुकीपेक्षा, निवडणुकीतील जय-पराजयापेक्षा फार महत्त्वाचे आहेत. प्रश्न साऱ्या भारताचा आहे. अशा वेळी आपण आपल्या वैयक्तिक फायद्यासाठी, किंवा आपल्या पक्षाच्या फायद्यासाठी भारताला विसरलो तर, क्षुद्र गोष्टीत अडकून मोठ्या प्रश्नाकडे, देशाकडे दुर्लक्ष केल्याच्या या आपल्या अपराधाचा जाब आपण कोणाला देणार ? म्हणून माझी अशी इच्छा आहे की ज्या वेळी देशातील लोक दगेधोपे करणार नाहीत, हुल्लडबाजी करणार नाहीत, शांततापूर्ण मार्गाचा अवलंब करतील, तेव्हाच देश प्रगती करू शकेल. ही पहिली गोष्ट तुम्ही नीट समजावून घ्यावी.

दुसरी गोष्ट अशी की आपण मोठ्या समस्यांचा विचार करावा. लहान-सहान गोष्टींत गुरफटून जाऊ नये. कारण आपण लहान प्रश्नात गुंतून पडलो

अवलंब करून जगाच्या शांततेला हातभार लावणे आम्हाला शक्य होईल. जगात अशातऱ्हा माजली, युद्ध झाले, तर सारे-जग नाश पावेल आणि आमच्या देशाचेही अतोनात नुकसान होईल, हे उघड आहे.

आज जागतिक युद्ध ही काही सामान्य गोष्ट राहिलेली नाही. ते साऱ्या जगाचा नाश करील. म्हणून होईल तितके हे युद्ध टाळण्याच्या कामी आपले वजन खर्च करणे, हे आमचे धोरण आहे. जगातील कोणा एका मोठ्या गटा-विरुद्ध उभ्या असलेल्या दुसऱ्या एका मोठ्या गटात सामील न होण्याचे हे जे धोरण आम्ही अनुसरले आहे, त्यायोगे आम्हाला जागतिक शांततेला हातभार लावता येईल आणि आज जगातील देशांमध्ये परस्परांविषयी जे वैर आहे तेही कदाचित आम्हाला थोडेफार कमी करता येईल.

थोड्यात दिवसांत जगातील एका फार मोठ्या सामर्थ्यवान व प्रसिद्ध देशाला मी भेट देणार आहे, हे तुम्ही कदाचित् ऐकले असेलच. तुमच्या वतीने, आपल्या देशाच्या वतीने, प्रेमाचा व मैत्रीचा संदेश घेऊन मी जाईन; कारण आपले स्वातंत्र्य अबाधित ठेवून आम्हाला त्याची मैत्री हवी आहे. इतर देशांशीही आपली मैत्री असावी, अशी आमची इच्छा आहे. मी तिकडे जाणार आहे याचा अर्थ आम्हाला त्यांच्याशी मैत्री करावयाची आहे. परंतु त्याचा अर्थ इतर देशांशी आम्हाला वैर करावयाचे आहे, असा मुळीच नाही. आम्हाला सर्वच देशांशी मैत्री करावयाची आहे.

आपल्या आशिया खंडात अलीकडे खूप घडामोडी झाल्या आहेत. आमच्या देशात शांती नांदत आहे. परंतु गेल्या दोन-तीन वर्षांत नाना आशिया खंडात मोठमोठ्या घटना घडत आहेत. आजच्या वर्तमानपत्रात तुम्ही वाचले असेल की आशियातील एका लहानशा परंतु प्रसिद्ध देशात एक उठाव झाला आहे. त्यावर मी काही भाष्य करीत नाही. मला तुम्हाला एवढेच सांगावयाचे आहे की देशाच्या कामात थोडीशी जरी ढिलाई झाली आणि शांततेचा मार्ग सुटला तरी तेथे कोणतेही काम व्यवस्थित होऊ शकत नाही. त्या देशाचा घात होतो व तो दुर्बळ बनतो. आशियातील आणखी एका फार मोठ्या प्रसिद्ध व पुरातन देशामध्येही खूप उलथापालथ झाली आहे व होत आहे. त्या बाबतीत आमचे म्हणणे काय? आमचे म्हणणे हेच की त्या देशातील रहिवासी ज्या मार्गाने जाऊ इच्छितात, त्या मार्गाने त्यांनी जावे. इतर देशांच्या कारभारात, त्यांच्या स्वातंत्र्यात, त्यांच्या राज्यपद्धतीत, त्यांच्या आर्थिक प्रणालीत हस्तक्षेप करण्याचा आम्हाला जरुरी नाही ते काम आमचे नव्हे. त्या बाबतीत स्वत: त्यांनीच काय ते ठरवावयाचे आहे आम्हाला प्रत्येकाशी मैत्री करावयाची आहे.

कोणत्याही देशातील जनता तिच्या देशासाठी जो मार्ग निवडील तो त्या देशासाठी योग्य आहे, असे आम्ही मानतो. स्वातंत्र्य हे काही कोणी बळजबरीने देत नसतो. ते आपल्या मनातून आलेले असले पाहिजे.

म्हणून आजच्या या प्रसंगी आपण जगात चाललेल्या या गोष्टीकडे डोळस-पणे पाहावे, त्यापासून बोध घ्यावा. नंतर आपल्या या महान देशाकडे पहावे आणि त्यापासून धडा घ्यावा.

सध्या आपल्या येथे एक घटना परिषद कार्य करीत आहे. भावी भारताची घटना बनविण्याचे काम ती करीत आहे. थोड्याच महिन्यांत आपला देश प्रजा-सत्ताकाचा नवा पोशाख परिधान करील. एक नवी राज्यघटना या देशात चालू होईल. हे चांगले आहे. ही घटना उत्तम बनली पाहिजे, हे खरे. परंतु सरते-शेवटी देश काही कायदेकानू आणि कागदावर लिहिलेल्या गोष्टी यांनी बनत नसतो. जनतेची हिम्मत, शौर्य व काम करण्याची शक्ती यांनी देश बनत असतो. कायदेपंडित कायदे तयार करतात व घटनापंडित राज्यघटना बनवितात. परंतु वस्तुतः इतिहास लिहिला जातो शूरांच्या हातांनी, अंतःकरणांनी व बुद्धीने. आता प्रश्न हा आहे की या भारताचा इतिहास आपल्या रक्ताने, आपल्या अश्रूंनी आपल्या परिश्रमाने व आपल्या बुद्धिमत्तेने लिहिण्याची हिम्मत तुमच्या-आमच्यात किती आहे? ती हिंमत आपल्यात असेल तर राज्यघटनाही चांगली बनेल आणि सर्व काही ठीक होईल. पण जर आपल्यात ते सामर्थ्य नसेल, आपण दुबळे असू, क्षुद्र गोष्टीत गुरफटून गेलेले आणि परस्पराशी सहकार्य न करणारे असू तर आपण अगदी कुचकामाचे आहोत तसे असेल तर राज्यघटना आपल्याला काय वाचव-णार? किंवा कागदावर लिहिलेला कायदा आमच्या काय कामी येणार?

परंतु माझा भारतावर विश्वास आहे. या भारताच्या भवितव्याविषयी माझी खात्री आहे. यापुढे भारताचे सामर्थ्य वाढणार आहे, यात शंका नाही. परंतु हे सामर्थ्य काही केवळ लष्करी सामर्थ्य असणार नाही. अर्थात एका मोठ्या देशाजवळ लष्करी सामर्थ्यही असले पाहिजे, हे खरे; परंतु वस्तुतः त्याची कार्य करण्याची क्षमता, परिश्रम करण्याची शक्ती हेच त्याचे खरे सामर्थ्य असते. आपल्या या देशातील दारिद्र्य नाहीसे करावयाचे असेल तर ते काम कायदे-कानूनी, आरडाओरडा करून किंवा तक्रारी करून होणार नाही त्यासाठी परि-श्रमच करावे लागतील. आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या परिश्रमानेच ते साध्य होईल. आपल्यासमोर आराम नाही. स्वराज्य आले, स्वातंत्र्य आले, याचा अर्थ आता आपण आराम करण्याची वेळ आली, असे तुम्ही समजू नका. उलट परिश्रम करण्याची ही वेळ आहे. परंतु या परिश्रमात आणि दुसऱ्या प्रकारच्या परिश्रमात फार मोठा फरक आहे. दुसऱ्या प्रकारचे परिश्रम हे गुलामांनी केलेले श्रम

असतात; तर पहिल्या प्रकारचे परिश्रम हे स्वतंत्र देशाच्या नागरिकांनी नव-निर्मितीसाठी केलेले परिश्रम असतात. आपल्याला आपले घर बांधावयाचे आहे, आपल्या देशाची बांधणी करावयाची आहे, भावी पिढयांसाठी एक मजबूत इमारत उभारावयाची आहे. हे परिश्रम शुभ आहेत, चांगले आहेत, मनाला आवडणारे आहेत. या निर्मितीमध्ये आपण ठेवलेली प्रत्येक वीट, प्रत्येक दगड कायम राहाणार आहे. लक्षात ठेवा, आपण सर्व मरून जाऊ परंतु या विटा आणि दगड टिकून राहातील. शेकडो वर्षांनंतरही एक स्मारक म्हणून ते राहातील. जगाला आणि आपल्या भावी पिढयांना ते सांगतील की एके काळी स्वतंत्र भारताचा पाया असा घातला गेला आणि मग अशा प्रकारे परिश्रम करून, घाम गाळून व रक्त आटवून भारताची ही इमारत उभारली गेली.

सारांश, परिश्रम करणे, काम करणे, या स्वतंत्र भारताची इमारत उभी करणे हे तुमचे-आमचे काम आहे या वेळी जे मोठे प्रश्न आहेत ते सोडविण्याची जबाबदारी आपल्यावर आहे. उदाहरणार्थ, अन्नधान्याचा प्रश्न घ्या. तो सोडवावयाचा म्हणजे अन्नधान्याचे उत्पादन वाढविले पाहिजे, अन्नाची नासाडी करता कामा नये. जो कोणी अन्नाची नासाडी करीत असेल, केवळ भपक्यासाठी मेजवान्या वगैरे देऊन अन्नाची उधळपट्टी करीत असेल तो आपल्या देशाचा भयंकर गुन्हा करीत आहे. लाखो लोक उपाशी असताना जर कोणी मेजवान्या देऊन अन्नाची नासाडी करीत असेल तर त्याहून अधिक वाईट गोष्ट कोणती असेल? म्हणून आपण आपल्यावर ताबा ठेवला पाहिजे, स्वतंत्र राष्ट्राच्या जबाबदाऱ्या ओळखल्या पाहिजेत, स्वतंत्र मानवाप्रमाणे पुढे गेले पाहिजे, मान ताठ करून, छाती पुढे काढून आरडाओरडा न करता, खांद्याला खांदा लावून, शिस्तीत आगेकूच केली पाहिजे. अशा प्रकारे आपण चालू लागलो, शिस्तीत काम करू लागलो तर या भारताचे प्रश्नही सुटतील आणि तुमचे-आमचे प्रश्नही सुटतील.

तुमच्या-आमच्या समस्या तर सुटणारच आहेत. अन्य प्रकारे सुटल्या नाहीत तरी तुमची-आमची वेळ भरली की त्या आपोआपच सुटतील. पण आपल्याला या भारताचे स्मरण ठेवले पाहिजे तीच महत्त्वाची गोष्ट. भारत ही एक अमर वस्तू आहे. तिचा कधी नाश होणार नाही. आज या काळात जन्माला आलेले आपण लोक कोणती कर्तबगारी करून दाखविणार? भारताची सेवा कशी करणार? त्याला पुढे कसे नेणार? हे प्रश्न तुम्ही स्वतःला विचारा आणि त्याप्रमाणे कामाला लागा.

1949 जय हिंद!

म्हणून काढावीत. जर कोणी तसे करीत असेल तर त्याला अडविले पाहिजे, त्याला तोंड दिले पाहिजे, हे उघड आहे. आपल्या देशात स्वातंत्र्याच्या नावावर काही लोक फार दंगेधोपे करतात. त्यांनी खूप उपद्रवही दिलेला आहे. देशाला खूप दमकवून वठविण्याचा प्रयत्नही केला आहे. त्यांना प्रतिकार करण्यात आला; आणि आमच्यांत कितीही उणीवा असल्या तरी या देशाचे अंतःकरण भक्कम आहे, त्यामुळे आपण यशस्वी झालो आणि देश आगेकूच करीत राहिला. काही लोकांनी असे जाहीर केले की आजचा स्वातंत्र्य-दिवस कोणी साजरा करू नये, पंधरा ऑगस्टच्या कार्यक्रमात कोणी भाग घेऊ नये. हे लोक आणखी एक पाऊल पुढे जाऊन म्हणाले की या कार्यक्रमात अडथळे आणले पाहिजेत. आता तुम्हीच विचार करा की, कसल्या मेंदूतून ही कल्पना निघाली असावी ? कसल्या अंतःकरणांत ही भावना उत्पन्न होत असावी ? तिचा दर्जा काय ? हा काय विचार-स्वातंत्र्याचा प्रश्न आहे ? कोणत्याही पक्षाने कोणतेही मत बाळगावे, असा का हा मुद्दा आहे ? हा तर उघड उघड भारताच्या स्वातंत्र्यावरील हल्ला आहे. जे लोक हे सारे करीत आहेत, ते कोणीही असोत, कोणत्याही पक्षाचे असोत, आपण त्यांचा जोरात प्रतिकार केला पाहिजे. आणि त्यांना कचऱ्याप्रमाणे झाडून टाकले पाहिजे. याचा अर्थ काय? दर वेळी आपआपसातील दुही आणि भांडणे यांच्याच गोष्टी करणारे आणि मिळालेले स्वातंत्र्य पुरेसे नाही म्हणून त्याचाच नाश करावयास उठलेले हे लोक आपल्या देशात आहेत. मोठी विचित्र गोष्ट आहे. त्यांच्या मेंदूत काही तरी विकृती असली पाहिजे, किंवा त्यांच्या अंतःकरणात काही तरी बिघाड झालेला असला पाहिजे. ही गोष्ट आपण ओळखली पाहिजे. याचा अर्थ काय ? याचा अर्थ एवढाच की आज जगावर काय संकटे कोसळतील ते कळेनासे झाले आहे, अशा वेळी आपण आपसातील सारे भेदभाव नष्ट केले पाहिजेत. तसे करणे हे तुमचे, माझे व प्रत्येक भारतीयाचे कर्तव्य आहे. लोकांमध्ये मतभेद आहेत, मतभेद असण्यात काही गैर नाही. तुम्हाला वाटले तर तुम्ही माझ्याशी भांडा, मी तुमच्याशी भांडेन. परंतु जेव्हा साऱ्या भारताचा प्रश्न येतो तेव्हा तुम्ही भारतीय आहात, मी भारतीय आहे, भारताचा प्रत्येक नागरिक भारतीय आहे. ही गोष्ट ज्याला मान्य नसेल तो भारतीय नाही. त्याने दुसऱ्या कोणत्याही देशात जाऊन राहावे.

म्हणून गेल्या कित्येक वर्षांपासून ऐक्याच्या कोणत्या पायावर आपण उभे आहोत. याचा तुम्ही विचार करा. या देशात वेगवेगळ्या जाती आहेत, विभिन्न धर्मांचे लोक आहेत, वेगवेगळ्या प्रांतांचे रहिवासी आहेत. त्यांच्यांतील ऐक्यावरच आपला हा देश उभा नाही काय ? परंतु काही पक्ष या जनतेमध्ये दुहीची बीजे पेरीत आहेत, भांडणे लावीत आहेत. धार्मिक भांडणे किंवा दंगे हे काही धार्मिक नसतात. धर्माशी त्यांचा काही संबंध नसतो. धर्माचे नाव घेऊन राजकीय भांडणे केली जातात. दुही माज-

विणे, भांडणे लावणें, प्रांतीयता वाढविणे, वगैरे गोष्टीमुळे देश सामर्थ्यवान बनतो की कमकुवत होतो, याचा तुम्हीच विचार करा. मतभेद असणे ही काही वाईट गोष्ट नाही. उलट ती स्वागतार्ह आहे. तुमच्या-आमच्यात, भारतात राहणाऱ्या लोकांमध्ये कितीही मतभेद असेनात का ! किंबहुना वेगवेगळी मते असावीत व मतभेद व्यक्त व्हावेत, असेच मला वाटते. भारतातील लोकांनी डोळे बंद करून एकस्वराने बोलावे, कोणाला बुद्धी किंवा भावना नसल्याप्रमाणे सर्वांच्या तोंडून एकच गोष्ट बाहेर पडावी असे मला मुळीच वाटत नाही. आपापले म्हणणे मांडण्याचा आपल्याला हक्क आहे. परंतु भारताच्या स्वातंत्र्याविरुद्ध ब्र काढण्याचा मात्र कोणाही भारतीयाला हक्क नाही. भारताच्या ऐक्याला, भारताच्या इतिहासाला ज्यायोगे धक्का पोचेल अशा गोष्टी बोलण्याचा, स्वातंत्र्याच्या मूलभूत सिद्धान्ताविरुद्ध आवाज उठविण्याचा, कोणाही भारतीयाला अधिकार नाही. कारण जेव्हा तो असे करतो तेव्हा त्याची इच्छा असो किंवा नसो, त्याला कळो किंवा न कळो, तो भारताचा व भारतीय स्वातंत्र्याचा द्रोह करीत असतो. या मूलभूत गोष्टी आपण समजून घेतल्या पाहिजेत. कारण काळ मोठा नाजुक आहे. या वेळी आपण आपल्या देशात दृढपणे टिकून राहिलो नाही तर या जगात आपल्याला प्रगती करता येणार नाही.

आपल्यासमोर पुष्कळ अडचणी आहेत. आज जगाची स्थिती मोठी विचित्र झालेली आहे. आशियाच्या एका कोपऱ्यात लढाई चालू आहे. ही लढाई जरी एका लहानशा देशात चाललेली असली तरी ती मोठी भयंकर आहे. ती किती दिवस चालेल, ती इतरत्र पसरेल की त्या देशापुरतीच मर्यादित राहील, हे कोणीच सांगता येत नाही. ती वाढू नये, जगभर ती आग पसरू नये, अशी आमची धडपड आहे. ती शक्य तितक्या लवकर थांबावी असा आमचा प्रयत्न आहे. परंतु आमचा प्रयत्न काही जगाला गवसणी घालू शकत नाही. काय होईल कोण जाणे. परंतु आपल्याला एक गोष्ट करता येईल. आपण धैर्याने आपल्या देशाला सावरावे, आपले सामर्थ्य एकवटलेले राखावे, देशाला सन्मार्गाने न्यावे आणि जगाला आग लागली तरी आपल्या देशाला वाचवावे. तसे झाल्यास आपण जगाला वाचविण्याच्या कामीही मदत केली, असे होईल, परंतु त्यासाठी आमच्यात ऐक्य असले पाहिजे.

म्हणून आपण आपल्या देशाचा विचार करावा. आपले प्रश्न खूप मोठे आहेत. प्रत्येक माणसाच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचा प्रश्न अन्नाचा असतो. गेल्या दोन-तीन वर्षांत आपण पुष्कळ धडपड केली, आहे. पुष्कळ गोष्टी केल्या आहेत. धान्याच्या, तुमच्या अन्नाचवडच्या वार्ताही केल्या. परंतु आज काय स्थिती आहे ? मद्रास, बिहार वगैरे प्रांतात पुष्कळ अस्वस्थता आहे हे तुम्ही ऐकले असेल. अशा काही विचित्र बातम्या छापून येतात की त्या वाचून जिवाचा थरकाप होतो. सारांश काय की पुष्कळच काळजी करण्यासारखी परिस्थिती आहे.

परंतु या गोष्टीचा जितका बाऊ करण्यात आलेला आहे तितका करण्याची जरूरी नाही. त्यायोगे घबराट निर्माण होते. अन्नाची समस्या हा आपला सर्वांत मोठा व महत्त्वाचा प्रश्न आहे. हा प्रश्न का उपस्थित झाला आहे? आपल्या देशातील सर्व लोकांना पुरेल इतके अन्नधान्य निर्माण होत नाही. याची अनेक कारणे आहेत—दुसरे महायुद्ध झाले, पाकिस्तान निर्माण झाले, देशातील अन्न-धान्याचे उत्पादन करणारे भाग पकिस्तानात गेले, लोकसंख्या वाढली इ. पुष्कळ गोष्टी आहेत. आता एखादा देश, विशेषत: आपला भारतासारखा देश, आपल्याला लागणारे अन्न पुरेशा प्रमाणात निर्माण करीत नसेल तर तो एक प्रकारे दुसऱ्यांच्या ताब्यात जातो; कारण त्याला धान्यासाठी इतराकडे तोंड वेंगाडावे लागते इतरांकडून धान्य आणण्यापायी आपल्याला खूप पैसाही द्यावा लागतो. परंतु त्या-पेक्षाही अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपण दुर्बळ बनतो, दुसरे लोक आपल्याला दडपू शकतात व आपले स्वातंत्र्य धोक्यात येते. त्यांत पुन: दुर्दैवाने उद्या जर महायुद्ध सुरू झाले तर इतर देशातून आपल्या देशात धान्यही येऊ शकणार नाही आणि आले तरी ते फार थोडे येईल. तेव्हा आपले काय होईल? म्हणून आपली सारी व्यवस्था आपण आपल्या घरीच केली पाहिजे, हे उघड आहे. आपल्याला लागणारे धान्य आपण उत्पन्न केले पाहिजे; आणि एखादा विशिष्ट प्रकारचा आहार मिळत नसेल तर दुसऱ्या प्रकारचा आहार घेण्याची सवय आपण लावली पाहिजे. मला अमुक पदार्थ खाण्याची सवय आहे, दुसरा पदार्थ मी खात नाही, असे तुम्ही मला सांगावे किंवा मी तुम्हाला सांगावे, अशी स्थिती आज नाही. इतर मार्ग बंद झाले की जे काही मिळेल ते आपल्याला खावे लागेल. म्हणून आपण दुसऱ्या प्रकारच्या आहाराचीही सवय लावली पाहिजे आणि मोठ्या प्रमाणावर अन्नधान्याचे उत्पादनही केले पाहिजे शिवाय आपण अन्नाचा एक कणही वाया घालवता कामा नये. या बाबतीत पुष्कळ चर्चा झालेली आहे, या पुढेही होणार आहे आणि जास्त कडक पण होणार आहे. आपण असे म्हटले होते की दोन वर्षांच्या अवधीत आम्ही बाहेरून धान्य आणणे बंद करणार आहोत, पुरेसे धान्य आमच्या देशातच उत्पन्न करणार आहोत, आणि काही तुटवडा पडला तरी तो सहन करणार आहोत. ही गोष्ट तुम्ही समजून घ्या. लक्षात ठेवा, आपण जे म्हटले होते, आपला जो कार्यक्रम होता, जे धोरण होते, ते आजही कायम आहे आणि कितीही अडचणी आल्या तरी त्या धोरणाप्रमाणेच आपण चालणार आहोत.

अन्नधान्याच्या बाबतीत आज भारताची मोठी विचित्र स्थिती आहे. एका दृष्टीने तुम्ही पाहिलेत तर अधिक धान्य पिकविण्याचा आपला जो कार्यक्रम होता तो यशस्वी होत आहे, यात शंका नाही. देशातील अन्नधान्याचे उत्पादन वाढले आहे, आणि पुढील एक-दीड वर्षांत ते आणखी वाढेल. तो कार्यक्रम उत्तम

प्रकारे चालू आहे. परंतु त्याचबरोबर काही आपत्तीही आपल्यावर कोसळत आहेत. कोठे पूर येतात तर कोठे अवर्षण पडते. विशेषत: मद्रास व बिहार प्रांतात या गोष्टी घडल्या आहेत; सौराष्ट्रांतही तीच स्थिती आहे. शिवाय आपल्याजवळ एवढा धान्यसाठा नाही की एखाद्या ठिकाणी दुष्काळ पडल्यास तावडतोब तेथे धान्य पाठविता येईल. अजून आपण तितके स्थिर झालो नाही त्यामुळे आपली अडचण होते. तरी सुद्धा बिहार असो, मद्रास असो की बंगाल असो, प्रत्येक ठिकाणी पुरेसे धान्य पोचविण्यात आलेले आहे. ते धान्य खेडो-पाडी नेऊन पोचविण्यात अडचणी आल्या असतील, दोन-चार दिवस जास्त लागले असतील. परंतु धान्य सगळीकडे पोचले आहे. प्रत्येक प्रांतात दोन-तीन महिने पुरेल एवढे धान्य असेल तर काळजी करण्याचे विशेष कारण नाही. अर्थात काळजी करावी लागेल ती इतर काही गोष्टींची. पहिली अशी की कोठेहि अशा प्रकारची अडचण झाली असेल तर ती आमच्या गैरव्यवस्थेची खूण आहे. तो आमच्या सरकारचा गलथानपणा आहे, हे मी मान्य करतो. आपण ते मान्य केलेच पाहिजे. त्यावर पांघरूण घालण्यात किंवा ती जबाबदारी टाळण्यात काही अर्थ नाही. उलट त्यापासून आपण बोध घेतला पाहिजे काळजी करण्यासारखी दुसरी गोष्ट अशी की दुसऱ्यांच्या अडचणीचा गैरफायदा घेऊन भरमसाट पैसा मिळविण्याचा प्रयत्न करणारे पुष्कळ लोक आपल्या देशात आहेत—मग ते व्यापारी असोत, दुकानदार असोत की आणखी कोणी असोत. ते स्वार्थी हेतुने अन्नधान्याची साठेबाजी करतात. जास्त पैसे मिळावेत म्हणून, अन्नटंचाईच्या वेळी उपयोगी पडावे म्हणून ते धान्य-साठे दडवून ठेवतात. तुम्हीच विचार करा, दुसऱ्याच्या अडचणीचा गैरफायदा घेऊन भरमसाट पैसा मिळवायच्या वृत्तीला काय म्हणावे? या लोकांची गणना कोणत्या प्रकारात करावी? हे सारे सहन करणे आपल्याला कसे शक्य होईल? यावर तुम्ही म्हणाल की दोनतीन वर्षांपूर्वी जवाहरलालने म्हटले होते की जे कोणी अशा गोष्टी करीत असतील त्यांना कडक शिक्षा झाल्या पाहिजेत. हे बोलतात पुष्कळ, पण त्याची अमलबजावणी केव्हा होणार? तुम्ही असे विचारले तर ते तुमचे विचारणे योग्यच ठरेल. मला स्वत:लाच लाज वाटते की आम्ही असे दुबळे कसे झालो? काही लोकांनी अन्नधान्याचीच नव्हे तर इतर वस्तूंचीही साठेबाजी करावी, भाव वाढवावेत आणि आम्ही निरुपायाने, नाइलाजाने हताशपणे ते पाहात राहावे, आम्हाला काहीच करता येऊ नये ही शरमेची गोष्ट नाही काय? या दिल्ली शहरात, भर बाजारात, उघड-उघड या गोष्टी चालू आहेत, याचा अर्थ काय? कोणीही उठावे आणि लोकांच्या अडचणींचा गैरफायदा घेऊन भरमसाट पैसा मिळवावा, लक्षाधीश बनावे—मग तिकडे लोक उपासमारीने मरेनात का?—ही गोष्ट आम्ही का सहन करावी? तुम्ही का सहन करावी? कोणीही का सहन करावी? असे का व्हावे? आपण

याला कोण तोंड देणार ? अर्थात या बाबतीत पहिले कर्तव्य सरकारचे आहे हे उघड आहे. परंतु सरकारने कितीही कडक कायदे केले तरी जोपर्यंत ते जनतेला मान्य नसतील व जनतेकडून संपूर्ण सहकार्य मिळणार नाही, तोपर्यंत त्यांची अंमलबजावणी होऊ शकत नाही. आपण जर असा निश्चय केला की या गोष्टीचा नायनाट केल्याशिवाय आम्ही राहणार नाही—मग तिला काळाबाजार म्हणा, साठेबाजी म्हणा, भरमसाट भाववाढ म्हणा, की दुसरे काही म्हणा—तर आपण तिला खात्रीने आळा घालू शकू. तुम्ही-आम्ही मिळून निर्धार केला तर ही गोष्ट नक्कीच थांबेल; आणि जर कोणी त्यानंतरही ती चालू ठेवील तर त्याला कडक शिक्षा भोगावी लागेल.

तुम्ही वृत्तपत्रांत वाचले असेल की गेल्या दोन-चार दिवसांपूर्वी आपल्या संसदेत हा प्रश्न आला होता. या गोष्टीना आळा घालण्यासाठी तीन दिवसांपूर्वी तेथे एक ठराव मंजूर झाला आहे आणि काल सायंकाळी सुमारे सात वाजता एक कायदाही पास करण्यात आला आहे. तो तुम्हाला वृत्तपत्रांत वाचावयास मिळेल. थोड्याच दिवसात त्या कायद्याची अमलबजावणी सुरू होईल. आम्ही काय काय करणार आहोत, भाववाढीला कसा आळा घालणार आहोत, यासंबंधी तपशीलवार कायदेकानू तुम्हाला वाचावयास मिळतील. त्यावरून आम्ही काय करणार आहोत ते तुम्हाला कळेल. आम्ही म्हणजे आपल्या केंद्रीय सरकारने काही कायदे केले आहेत, काही अधिकार घेतले आहेत एखादा प्रांत कमकुवत असेल तर तेथेही आम्हाला काम करता येईल अशा वेतानेते अधिकार घेतले आहेत. याचे कारण असे की साऱ्या भारतात एका पद्धतीने काम व्हावे एकीकडे खूप जोरात काम चालले आहे आणि दुसरीकडे ढिलाई आहे, असे होऊ नये. परंतु मी तुम्हाला सांगितल्याप्रमाणे या बाबतीत आम्हाला तुमचे साह्य हवे आहे कारण आम जनतेची संमती व सहकार्य नसेल तरही गोष्ट होऊ शकणार नाही. हे काम करणारे सरकारी लोक नोकर वगैरे, नीट काम करीत नाहीत, ते स्वतःच कधी-कधी प्रलोभनाना बळी पडतात अशी तुम्ही तक्रार कराल. तुमची तक्रार चूक आहे असे म्हणता येणार नाही परंतु त्या लोकाना आपण अधःपातापासून वाचविले पाहिजे, त्यापासून परावृत्त केले पाहिजे ते नीट काम करीत नसतील तर त्याना काढून टाकून त्याच्या जागी दुसरे लोक नेमले पाहिजेत. असो. हे सारे मी तुम्हाला अधामधर्धी बोलताना सांगितले; कारण हा पहिला प्रश्न आहे प्रत्येक देशाच्या दृष्टीने अन्नाचा प्रश्न हा नेहमीच पहिला प्रश्न असतो. त्याच्याशी संबंधित गोष्टीच मी तुम्हाला सांगितल्या. गरजेच्या वस्तूचे भाव वाढणे ही अगदी अयोग्य गोष्ट आहे. कोरियात युद्ध सुरू झाले, युद्धाची चर्चा सुरू झाली की तेवढीच संधी साधून येथे वस्तूचे भाव वाढवावयाचे याचा अर्थ काय ? हे सारे थांबले पाहिजे.

इतरेही पुष्कळ प्रश्न आपल्यासमोर आहेत. साऱ्या भारताचे प्रश्न आहेत, दिल्ली शहराचेही आहेत. आपल्या निर्वासितांचा प्रश्न आहे. हा प्रश्न सोडविण्याचे थोडेफार प्रयत्न झाले. तो थोडाफार सुटला आहे. हळूहळू तो सुटेल. परंतु दुःखाची गोष्ट ही की पुष्कळ लोकांना या पावसाळ्यात फार हालअपेष्टा सहन कराव्या लागत आहेत. यापूर्वी त्यांना कडक उन्हाळ्याचाही त्रास सोसावा लागला होता. दिवसा-मागून दिवस चालले आहेत परंतु त्यांच्या साऱ्या अडचणी काही दूर होत नाहीत. या बाबतीत माझे तुम्हाला असे सांगणे आहे की तुम्ही विचार करा. हा प्रश्न संपूर्णपणे नुसत्या सरकारकडून सुटणार नाही. तुमच्या, आमच्या, सबंध देशाच्या व विशेषतः निर्वासित बंधु-भगिनींच्या सहकार्यानेच हा प्रश्न सुटू शकेल. सरकारनेच सर्व काही करावे, या अपेक्षेने सरकारकडे डोळे लावून बसणे योग्य नव्हे; कारण सरकारला साऱ्या गोष्टी करता येणे शक्यच नाही. निर्वासितांचा प्रश्न आम्ही हाती घेतला. येथे तो थोडाबहुत सोडविलाही. पण इतक्यात तो तिकडे बंगालमध्ये निर्माण झाला आणि त्याने भयंकर उग्र रूप धारण केले. चार महिन्यांपूर्वी पाकिस्तानशी या बाबतीत आपला एक करार झाला होता, हे तुम्हाला माहीत असेल. त्या करारासंबंधी खूप चर्चा झाली. अजूनही काही लोक म्हणतात की ती आमची चूक झाली. त्या बाबतीत आपल्याला यश मिळालेले नाही. परंतु ही चर्चा निरर्थक आहे. आपण हा प्रश्न सोडविण्याचा निर्धार केला तर तो नक्कीच सुटेल. या वेळी मी तपशीलात शिरत नाही. परंतु मी तुम्हाला प्रामाणिकपणे, अगदी मनापासून सांगू इच्छितो की बंगालचा (बंगाली निर्वासितांचा) प्रश्न जरी अत्यंत अवघड असला, त्रासदायक असला, तरी तो सुटत चालला आहे, असे माझे मत आहे. अर्थात भविष्यकाळी काय होईल किंवा काय होणार नाही या बाबतीत मी तुम्हाला कसे आश्वासन देऊ शकेन? ते सारे तुमच्या-आमच्या व इतर लोकांच्या सामर्थ्यावर आणि दुबळेपणावर अवलंबून आहे. परंतु तेथे एखादी गोष्ट होऊ शकत नाही म्हणून आपण नाउमेद व्हावे आणि तेथील परिस्थिती सावरण्याऐवजी ज्यायोगे बंगालवर संकट येईल आणि भारताचा नाश होईल अशा मार्गाने आपण चालू लागावे, हे मान्य करण्यास मात्र मी एक क्षणभरही तयार नाही.

असो. हे मोठमोठे प्रश्न आपल्यासमोर आहेत. निर्वासितांचा प्रश्न, बंगाली निर्वासितांचा प्रश्न, अन्नधान्याचा प्रश्न, आणि असेच इतरही अनेक मोठमोठे प्रश्न आहेत परंतु या सर्वांच्या मुळाशी असलेला मूलभूत प्रश्न म्हणजे देशाच्या आर्थिक उन्नतीचा प्रश्न आहे. हे सारे प्रश्न आपण कसे सोडवणार? तुम्ही-आम्ही मिळूनच हे करू शकू. स्वतंत्रपणे तुम्हाला ते करता येणार नाही किंवा एकटे सरकारही ते करू शकणार नाही. सरकारात जे दोष असतील, ज्या उणीवा असतील त्यांच्याकडे तुम्ही आमचे लक्ष वेधा, त्यांचा निषेधही करा, आणि वेळ

पडल्यास तुम्ही आजचे सरकार काढून टाका, बदलून टाका. तसे करण्याचा तुम्हाला पूर्ण अधिकार आहे. हा अधिकार तुम्हाला सखलाभ होवो. परंतु एक गोष्ट लक्षात ठेवा की सरकार आणि देश या दोन गोष्टी अगदी वेगळ्या आहेत- त्यांची गल्लत करू नका; सरकारी धोरणाचा निषेध किंवा तक्रार करताना ज्यायोगे भारताची मुळे कमकुवत होतील, त्याचा पाया खिळखिळा होईल अशी कोणतीही गोष्ट तुमच्या हातून घडता कामा नये. या बाबतीत तुम्ही सावध राहिले पाहिजे; कारण सामान्यतः लोक ही गोष्ट लक्षात घेत नाहीत. सरकार येते व जाते. आमच्यासारखे लोक येतात व जातात. आमचाही काम करण्याचा काळ हळूहळू संपुष्टात येत आहे.

थोड्या दिवसांनंतर तुम्ही निवडणुकीत मतदान करणार आहात, याची आठवण मी तुम्हाला करून दिली. तुम्ही निवडणुकीत भाग घ्या किंवा घेऊ नका; पण आम्ही काही सत्तेच्या खुर्चीवर कायमचे बसून राहाणार नाही. जेव्हा दुसरी मंडळी येतील तेव्हा आम्हाला आनंदाने व समाधानाने खुर्च्या सोडाव्या लागतील. परंतु जोपर्यंत ती जबाबदारी आमच्यावर आहे, ती सूत्रे आमच्या हातात आहेत तोपर्यंत आम्हाला कमकुवतपणा दाखविता येणार नाही. आमच्यामध्ये जेवढी बुद्धी आहे, आमच्या बाहूंत जेवढे सामर्थ्य आहे, त्याचा उपयोग त्या मार्गाने जाण्यासाठी आम्ही करणार आहोत. धोका बाहेरचा असो की अंतर्गत असो, मी तुम्हाला पुनः सांगतो की भारत स्वतंत्र आहे. स्वतंत्र भारताचा वाढदिवस, वर्धापनदिन आपण साजरा करीत आहोत पण स्वातंत्र्या-बरोबर जबाबदारी येत असते. ही जबाबदारी केवळ सरकारची नव्हे, तर प्रत्येक स्वतंत्र व्यक्तीची असते. या जबाबदारीची तुम्हाला जाणीव नसेल, तुम्हाला भारतीय जनतेला ही जबाबदारी कळत नसेल, तर तुम्हाला स्वातंत्र्याचा अर्थ नीट कळलेला नाही आणि संकट आल्यास तुम्ही या स्वातंत्र्याचे संरक्षण करू शकणार नाही, असे म्हणावे लागेल. आपल्यावर बाहेरून हल्ला झाला, लष्करी हल्ला झाला, तर त्याला तोंड देण्यास आपल्याजवळ आपले सैन्य आहे, आपली विमाने आहेत, आपली जहाजे आहेत आणि आपले बहादुर नवजवान आहेत. ते त्या हल्ल्यापासून भारताचे रक्षण करतील. आपल्याजवळ शानदार फौज आहे, बहादुर फौज आहे विमाने व जहाजे यांवर काम करणारे खबरदार व शूर नवजवान आणि अधिकारी आहेत. हे सर्व ठीक आहे. परंतु अखेरीस कोणत्याही देशाचे रक्षण सैन्य करीत नसते किंवा विमानेही करीत नसतात. रक्षण करीत असते देशातील हिम्मत. देशाचे सामर्थ्य देशाचे रक्षण करते. जो पर्यंत देशातील प्रत्येक स्त्रीपुरुष स्वतःला भारताचा शिपाई समजणार नाही, तोपर्यंत देश पूर्णपणे सुरक्षित राहू शकणार नाही. गेली तीस-बत्तीस वर्षे जेव्हा आम्ही स्वातंत्र्यासाठी लढत होतो तेव्हा आम्ही एखादा खास गणवेश, शिपायाचा

पोशाख, धारण केलेला नव्हता. परंतु आम्ही स्वतःला भारताच्या स्वातंत्र्याचे शिपाई समजत होतो आणि निर्भयपणे एका मोठ्या सत्तेशी दोन हात करीत होतो. एका साम्राज्याशी आम्ही लढत होतो. लोक थक्क होत असत. कधी ते हेटाळणीने आम्हाला हसत तर कधी त्यांना आश्चर्य वाटे की हे काय गौडबंगाल आहे? हे मूठभर लोक, दुबळे लोक, यांच्याजवळ शस्त्र नाही की अस्त्र नाही, आणि हे निघालेत एका मोठ्या सत्तेशी, मोठ्या साम्राज्याशी दोन हात करायला ! आश्चर्याची गोष्ट अशी की त्या वेळी आमच्या मनात कसलीही भीती नव्हती; कारण आमच्या त्या थोर पुरुषाकडून, नेत्याकडून आम्ही असे शिकलो होतो की भिऊन भागत नाही, आणि आम्ही मोठ्या धैर्याने व स्वतःला भारताच्या स्वातंत्र्याचा एक शिपाई समजून सामना दिला. ते वातावरण पुनः एकदा निर्माण करा, तो रंग पुनः एकदा येऊ द्या. तसे जर आपण केले तर आपल्याला आतून काही भय उरणार नाही किंवा कोणत्याही बाह्य गोष्टींची भीती वाटणार नाही.

तेव्हा आजच्या या प्रसंगी, भारतीय स्वातंत्र्याच्या वाढदिवशी या मूलभूत गोष्टीचे स्मरण आपण करू या आणि क्षुद्र गोष्टी विसरून जाऊ या. मूलभूत गोष्ट म्हणजे देशाचे ऐक्य. या देशात जितक्या जातीजमाती आहेत, धर्म आहेत, त्या सर्वांना सगळे अधिकार असतील, विकासाचे सर्व दरवाजे सर्वांना उघडे असतील, तरच हा भारत सामर्थ्यवान बनेल व तो प्रगती करू शकेल. या स्वातंत्र्यात सहभागी असलेले सगळे लोक जर आपसात भांडू लागतील तर ते एकमेकांना, कमकुवत बनवितील आणि शेवटी स्वातंत्र्याला दुर्बल बनवितील, हे तुम्ही नक्की समजा. म्हणून आपण एकजुटीने काम केले पाहिजे. आपल्या पुढे जे काही प्रश्न असतील—मग ते अन्नधान्याचे असोत की दुसरे कसले असोत—त्यांना सर्वांनी मिळून तोंड दिले पाहिजे, ते सोडविले पाहिजेत आणि कोणत्याही परिस्थितीत भयभीत होता कामा नये. घाबरलेला माणूस कुचकामाचा असतो आपत्ती मोठी असेल तर तिला तोंड देण्यासाठी हिंमतही मोठी हवी. मोठे संकट आले की दुर्बल बनून हातपाय गाळून रडत बसता कामा नये.

असो. या तिसऱ्या वाढदिवसाच्या प्रसंगी मी तुमचे पुनः एकदा अभिनंदन करतो; आणि येत्या वर्षी जी संकटे येतील त्यांना आपण धैर्याने, निर्भयपणे तोंड देऊ, कोणत्याही आपत्तीला न घाबरता तिचे स्वागत करू, तिला तोंड देऊ व तिला नेस्तनाबूत करू अशी आशा बाळगतो.

1950 जय हिंद !

## मानवाचे परिश्रम हीच त्याची खरी संपत्ती

जय हिंद! जरा मला तुमचाही आवाज ऐकू द्या. माझ्यावरोबर तुम्हीही म्हणा, जय हिंद!

हा प्रिय ध्वज फडकविण्यासाठी आज पाचव्यांदा मी या ठिकाणी, या लाल किल्ल्याच्या तटावर आलो आहे. चार वर्षांपूर्वी पहिल्यांदा मी येथे आलो आणि तुम्हीही आला होता. आपण लाखो लोक येथे जमलो होतो आणि आपण हा जुना व नवा झेंडा येथे वर चढविला होता. या दिल्ली नगरीने शेकडो, हजारो वर्षांपासून नाना प्रकारची चित्र-विचित्र दृश्ये पाहिली आहेत. हिच्या समोर एखाद्या पुस्तकाप्रमाणे भारताचा इतिहास लिहिला गेला आहे. या दिल्ली नगरीने हे एक नवे चित्र पाहिले. एक नवी गोष्ट हिच्यासमोर घडली. एका नव्या राष्ट्राची जागृती हिने पाहिली. चार वर्षांपूर्वी या लाल किल्ल्याच्या तटावर किंवा याच्या जवळ तो प्रसंग साजरा करण्यासाठी आपण जमलो होतो, हे योग्यच होते; कारण या दिल्लीतील प्रत्येक दगड-विटेप्रमाणे या लाल किल्ल्याच्या प्रत्येक विटेत व प्रत्येक दगडात भारताचा इतिहास भरलेला आहे. या शहराने भारताचे वैभव पाहिले व भारताचे पतनही पाहिले; भारताची प्रगती पाहिली व त्याची अधोगतीही पाहिली. सान्या गोष्टी या दिल्लीच्या स्मरणात, आठवणीत आहेत. ही सारी जुनी चित्रे आहेत. त्यामुळे आज या राष्ट्राने एक नवीन रूप धारण केले असता ते दिल्ली नगरीने व या लाल किल्ल्याने पाहावे व त्याच्याशी याचाही काही संबंध जोडला जावा, हे योग्यच होते.

चार वर्षांपूर्वी तुम्ही-आम्ही येथे जमलो होतो. या शहरात व भारतातील प्रत्येक खेड्यात व नगरात आनंदोत्सव साजरा करण्यात आला होता; कारण आपल्या दीर्घ प्रवासातील एका मुक्कामावर आपण येऊन पोचलो होतो. आपली जी जुनी अभिलाषा होती जिच्यासाठी आपण संघर्ष केला होता, जिच्यासाठी आपण एका मोठ्या बलाढ्य साम्राज्याशी लढलो होतो व त्यात विजयी झालो होतो, ती आपली अभिलाषा पूर्ण झाली होती. त्यामुळे आपण आनंदोत्सव साजरा करणे योग्यच होते. आपण आनंदोत्सव साजरा केला परंतु तो करीत असतानाच अशा काही घटना घडल्या की त्यामुळे आपल्या डोळ्यात अश्रू आले. केवळ आमच्याच नव्हे तर कोट्यवधी लोकांच्या डोळ्यातून अश्रू आले; कारण आपले लाखो बांधव आपत्तीत सापडले होते. त्याची खूण अजूनही आहे. आपापल्या घरातून हुसकून लावले गेलेले आमचे कितीतरी निर्वासित बांधव

या दिल्लीत व भारताच्या इतर भागात आहेत. त्यांची दुःखे पाहून आमच्या डोळ्यात अश्रू आले. परंतु त्यापेक्षाही जास्त अश्रू येथील घटनांमुळे आमच्या डोळ्यांतून वाहिले. आमच्या देशांत भावाभावांत दंगे झाले, आम्हाला आमच्या उच्च सिद्धांतांचा विसर पडला, आम्ही आमच्या शेजाऱ्यावर हात टाकला; आणि गेल्या काही वर्षांत आम्ही ज्या मूलभूत गोष्टी शिकलो होतो त्यांचा आम्हाला विसर पडला, या गोष्टीचे आम्हाला जास्त दुःख झाले. भारताचे स्वतःचे असे एक वैभव होते. आपले थोर नेते महात्मा गांधी यांनी ते जगापुढे ठेवले होते. ते वैभव जमीनदोस्त झाले, याचा आपल्याला खेद वाटला. आमच्या शेजाऱ्यांनी काय करावे? मोठी खेदाची गोष्ट होती ती. पण जबाबदारी त्यांची होती. परंतु आम्ही आमच्या सिद्धांतापासून ढळलो, पतित झालो, याचेच दुःख आम्हाला होते. असो. चार वर्षांपूर्वीचे ते चित्र जेव्हा नजरेसमोर येते तेव्हा या सगळ्या गोष्टी आठवतात. चार वर्षे निघून गेली. चार वर्षांचा काळ हा काही फार मोठा कालखंड नव्हे—विशेषतः एका राष्ट्राच्या जीवनात तरी तो फार मोठा काळ नव्हे. परंतु मला तर असे वाटते की ही चार वर्षे केवळ चार वर्षे नव्हती, तर जवळ जवळ एक पुरे आयुष्यच खर्ची पडले; कारण या चार वर्षांत तुम्हाला, आम्हाला, देशातील लोकांना जे अनुभव आले, ज्या संकटांना तोंड द्यावे लागले त्याच्यामुळे हा चार वर्षांचा अवधी खूप मोठा वाटतो.

परंतु नंतर मी विचार करतो की, आमच्यासमोर एखादी मोठी परीक्षा, अग्निपरीक्षा, नसती, संकटाच्या तराजूत आपण तोलले गेलो नसतो तर काय झाले असते? आजही मला असे दिसते की आपल्यापैकी पुष्कळ लोक गाफील आहेत. या वेळी जगाची काय स्थिती आहे, आपल्या देशाची काय स्थिती आहे, याचा त्यांना विसर पडतो देशाचे काहीही होवो, आपले सुख टिकले पाहिजे, आपला स्वार्थ साधला पाहिजे, असे त्यांना वाटते. आज ही अशी स्थिती आहे. तर मग आपल्याला अग्निदिव्यातून जावे लागले नसते तर काय झाले असते? तर सारे राष्ट्र गाफील राहिले असते. संपूर्ण राष्ट्र सुखासीनतेत व स्वार्थात बुडून जाणे; आपले कर्तव्य काय, आपले सिद्धांत कोणते आणि आपल्या भोवती कोणते धोके आहेत, याचा त्याला विसर पडणे याहून अधिक भयंकर गोष्ट ती कोणती? कारण हीच खरी दुर्बलता ; तिच्यापुढे इतर दोष काहीच नव्हेत.

आपण आपले स्वातंत्र्य कसे मिळविले? आपण निर्माण केलेले ते सामर्थ्य कोणते होते? ते एक आंतरिक, आत्मिक सामर्थ्य होते. जे शत्रूसमोर कधी झुकत नाही आणि कसलेही संकट आले तरी त्याला भीत नाही, असे ते सामर्थ्य होते. हे सामर्थ्य महात्माजींनी आमच्या अंतःकरणात ओतले. आम्ही तर दुबळ्या मनाचे

आपसांत भांडणारे, सामान्य लोक होतो. परंतु त्यांनी आपल्या उदाहरणाने, आपल्या शब्दांनी, आपल्या कृतीने व शक्तीने आम्हाला हा धडा शिकविला की आपल्याला उच्च आचरण ठेवावयाचे आहे, आपल्याला एकजुटीने राहावयाचे आहे, कारण ऐक्यातच सामर्थ्य असते. आपल्याला या देशाला सामर्थ्यवान बनवावयाचे आहे. ज्यातील चाळीस कोटी लोक एकजुटीने एका दिशेने जातात, एकमेकांना साह्य करतात व कोणी शत्रू असल्यास त्याला तोंड देतात, असा देश तयार करावयाचा आहे, असे त्यांनी आम्हाला शिकविले. त्यातून आमचे सामर्थ्य वाढले. ते सामर्थ्य कोणाचे होते? ते एखाद्या मोठ्या शस्त्राचे नव्हते, तर आमच्या कोट्यवधी जनतेच्या अंत:करणाचे, आमच्या हार्दिक ऐक्याचे सामर्थ्य होते. आता ते सामर्थ्य कमी झाले असेल आणि तुमच्याजवळ एखादे बाह्य सामर्थ्य असेल तर ते आपल्याला फार दूर घेऊन जाऊ शकणार नाही. म्हणून विशेषत: आजच्या दिवशी आपण मागे वळून पाहाणे आवश्यक आहे. कोणत्या गोष्टीमुळे आपण दुर्बळ बनतो? कोणत्या गोष्टींनी भारताचा अध:पात केला व त्याला गुलाम बनविले? आणि कोणत्या गोष्टींनी भारताला पुन: वर उठविले, आमचे सामर्थ्य वाढविले व शेवटी आम्हाला स्वातंत्र्य मिळवून दिले?

हा गोष्टींचे आपल्याला सतत स्मरण राहिले पाहिजे कारण काही लोकांना असे वाटते की आता आपण स्वतंत्र झालो आहोत, एक काम पूर्ण झाले आहे, आता आम्ही आमच्या देशात काहीही करू वाटल्यास आम्ही आपसात युद्ध करू किंवा अन्य मार्गांनी आपली शक्ती वाया घालवू. परंतु हे चूक आहे. लक्षात ठेवा, स्वातंत्र्य ही अशी गोष्ट आहे की तुम्ही गाफील राहिलात तर ती निसटून जाईल. स्वातंत्र्य जाऊ शकते, ते धोक्यात येऊ शकते—विशेषत: आजकालच्या जगामध्ये! आजकालचे जग हे एक भयंकर धोक्याचे, कठोर व निर्दय जग आहे दुबळ्यावर ते दया करीत नाही. जे राष्ट्र, जी जनता दुर्बळ बनते ती त्याच्यासमोर कोसळून पडते.

परंतु सामर्थ्य म्हणजे तरी काय? एखाद्या देशाचे सैन्य, त्याची सामग्री, त्याची विमाने, त्याची जहाजे हे त्याचे सामर्थ्य असते आपल्या दृष्टीने आनंदाची व अभिमानाची गोष्ट ही की आपले सैन्य फार चांगले आहे आमच्या सैन्यातील सैनिक, उंच आकाशात विमाने घेऊन जाणारे किंवा सागराच्या लाटांवर संचार करणारे आपले नवजवान शूर आहेत, भक्कम आहेत ते भारताचे व्यवस्थित रक्षण करू शकतात. परंतु मोठ्यात मोठे किंवा शूरात शूर सैन्यही देशाचे रक्षण करीत नसते अखेरीस रक्षण करतात तो त्या देशाच्या लोकांची मने. म्हणून ती मने भक्कम आहेत की नाहीत, ती क्षुद्र गोष्टीत गरफटलेली आहेत की मोठ्या गोष्टींचा विचार करणारी आहेत, ती एकमेकांशी झगडतात की एकोप्याने राहातात, यावरच सर्व अवलंबून असते. सैन्याच्या मागेही हेच सामर्थ्य असते आणि तेच देशाला मजबूत बनवीत असते. आता तुम्हीच बघा की देशातील लोक काम करणारे आहेत की आराम करणारे? विचित्र

स्थिती आहे. पूर्वी खूप जोरात कामे चालत असलेली मी पाहिली आहेत. स्वातंत्र्य-युद्धात जास्त काम कोण करतो, याची स्पर्धा चाले. पण आता पाहावे तर पूर्वी काम करणारी काही माणसे आता त्या कामाची आठवण काढून आराम करतात. जेव्हा कामापेक्षा आराम जास्त होतो, उत्साहाऐवजी सुस्ती येते, तेव्हा राष्ट्र दुर्बळ बनते. म्हणून आपण त्या मूलभूत गोष्टीकडे वळून पाहिले पाहिजे. आज पहाटे आपले राष्ट्र-पती राजघाटावर गेले होते, मीही गेलो होतो, इतरही काही लोक गेले होते. आम्ही काही केवळ एक कर्तव्य म्हणून तेथे गेलो नव्हतो. तर त्या जुन्या स्मृतीतून आपल्या अंतःकरणाला व बुद्धीला काही सामर्थ्य मिळावे म्हणून गेलो होतो. ती स्मृती तर सदैव ताजीच असते. तरीपण ती सतत समोर ठेवणे, त्या सिद्धांतांचे व त्या शिकव-णुकीचे स्मरण करणे चांगले असते. म्हणून मी तेथे गेलो. त्या वेळी ते जुने चित्र माझ्या डोळ्यासमोर उभे राहिले. वर्षानुवर्षे ऐकलेले व आता कानी न पडणारे ते शब्द माझ्या कानात घुमले. मी तेथे गेलो आणि तेथूनच येथे तुमच्यासमोर येऊन हजर झालो. माझे मन भारताच्या सद्यःस्थितीकडे वळले. या देशात राहाणारे आपण सगळे—तुम्ही व आम्ही—एका नावेत बसलो आहोत. ही नाव हलली तर आपण सारे हलतो. ती नाव बुडाली तर आपण सारे बुडणार. देशाचा नाश झाला तर काही लोक बचावतील असे कोणी समजू नये. देश पुढे गेला तर सारेच लोक पुढे जातील.

म्हणून आपले नाते काय, आपला संबंध काय ते आपण ओळखले पाहिजे तुम्ही आपसात वाटेल तेवढा वाद घाला. वेगवेगळे पक्ष, निवडणुकी वगैरे गोष्टी वेगळ्या आहेत. परंतु सदासर्वकाळ टिकणारे असे आपले एक नाते आहे विशेषतः आज जगात धोके निर्माण झाले आहेत; आपल्या देशातही नाना प्रकारची बाह्य व अंतर्गत संकटे घिरट्या घालीत आहेत. अशा वेळी आपण क्षुद्र गोष्टी गाडन टाकणे, आपसात ऐक्य निर्माण करणे व स्वत:ला सामर्थ्यवान बनविणे हे जास्तच निकडीचे होऊन बसते. लक्षात ठेवा, या देशात चाळीस कोटी लोक आहेत. ही चाळीस कोटी देवमाणसे नाहीत हे अगदी उघड आहे. त्यातील काही कचखाऊ आहेत, काही भ्याड आहेत तर काही देशद्रोही सुध्दा आहेत. देशात सर्व प्रकारची माणसें असतात. या गोष्टीला आपण भिता कामा नये दंगेधोपे करविण्यासाठी परदेशातील लोकही येऊ शकतात. अखेर देशात शांतता व ऐक्य राखल्यानेच देश बलिष्ठ बनतो, हे प्रत्येकाला माहीत आहे. काही लोक मूर्खपणाने, अज्ञानाने भाडण करतात परंतु काही लोक—मग ते बाहेरून आलेले असोत की देशातील असोत—देश कमजोर व्हावा या हेतूने जाणूनबूजून दंगेधोपे घडवून आणतात

आज पहाटे किंवा काल रात्री या दिल्लीतच असा एक दगा घडवून आणण्याचा कोणीतरी प्रयत्न केला होता, असे मी ऐकले तेव्हा अशा दंगलखोर लोकांच्या आहारी आपण जाणार नाही याची काळजी तुम्ही घेतली पाहिजे. तुम्हाला राग येईल अशी

एखादी घटना घडली—अशा पुष्कळ गोष्टी असतात की ज्या आपल्याला आवडत नाहीत व आपण रागान बेभान होतो—तर तुम्ही तावडतोब हे ओळखा की भाडे लावून देशाच्या कोणातरी दुष्ट इसमाने ती घडवून आणली आहे; आणि तिच्यापासून तुम्ही दूर राहा. किंबहुना अशा गोष्टी शांततेने व आत्मविश्वासाने जेथल्या तेथे दाबून टाकण्याचाच प्रयत्न आपण केला पाहिजे.

आपल्या या चौथ्या वाढदिवसांच्या प्रसंगी पुढील नव्या वर्षाचे स्वागत आपण कसे करणार त्यासंबंधी विचार केला पाहिजे. आपल्या देशासमोर खूप मोठमोठे प्रश्न आहेत. आमच्या मनांत मोठ्या आकांक्षा होत्या आम्ही नाना प्रकारचे आराखडे बनविले होते. त्यांपैकी एक काम पूर्ण झाले. भारत स्वतंत्र झाले; यानंतर आता आपल्याला दुसरे युद्ध करावयाचे आहे. हे युद्ध मुख्यतः भारतातील दारिद्र्याशी, भारतातील बेकारीशी करावयाचे आहे. त्यात आपण एकदा पुढे गेलो यशस्वी झालो की सारे राष्ट्र, भारतातील तीस-चाळीस कोटी लोक हळूहळू वर उठतील, त्यांचे त्रास, हाल कमी होतील. आम्हाला हे युध्द करावयाचे होते परंतु दुर्दैवाने आम्ही नाना प्रकारच्या आपत्तीत, अडचणीत सापडलो आणि त्या दिशेने आम्हाला प्रगती करता आली नाही. स्वातंत्र्य मिळाले, राजकीय स्वातंत्र्य मिळाले, त्याचा थोडफार फायदा लोकांना मिळाला यांतही शंका नाही, परंतु सर्वांत दुःखाची गोष्ट ही की स्वातंत्र्याचा जो खरा फायदा राष्ट्राला मिळावयास हवा होता तो पूर्णपणे मिळाला नाही. तुम्हाला, भारताच्या रहिवाशांना पुष्कळच हाल सोसावे लागले. मी तुम्हाला काय सांगू? किती हाल झाले ते तुम्ही जाणताच. वस्तूंचे भाव वाढले. त्याचा परिणाम सर्वांवर झाला—मग ते पगारदार नोकर असोत की इतर कोणी असोत भाव वाढतच आहेत. अन्नधान्याचा प्रश्न आहे. धान्याच्या तुटवड्यामुळे शिधानियंत्रण वगैरे कितीतरी गोष्टी पुढे आल्या तुम्हाला त्रास झाला. तुम्ही, देशातल्या बहुसंख्य लोकांनी त्याबद्दल तक्रार केली. तुमची तक्रार योग्यच होती. कारण त्रास झाल्यावर तक्रार करावीच लागते. पण आम्ही त्यात गुंतून पडलो. जगात घडलेल्या घटनांमुळे परिस्थिती बिघडली. तिकडे कोरियात युद्ध सुरू झाले की त्याचा परिणाम इकडे वस्तूंच्या किंमतीवर होतो त्यावाबतीत आमचे काही चालत नाही अमेरिकेत एखादी गोष्ट घडली तर तिचा परिणाम येथील वस्तूंच्या किंमतीवर होतो.

परंतु त्याचबरोबर आणखी एक गोष्ट आहे. ती आपल्या आंतरातील गोष्ट आहे. आपल्या देशातील काही लोकांनी स्वार्थांध बनून देशाचे अहित करून स्वतःचा फायदा करून घेतला. हे चक्र आहे. या प्रवृत्तीला प्रतिबंध करणे दडपून टाकणे प्रत्येक सरकारचे कर्तव्य आहे, हे उघड आहे. जितक्या कडकपणे, जितक्या यशस्वीपणे हे व्हावयास हवे होते तितके ते झाले नसेलही ; परंतु हेही लक्षात ठेवा

की अशा प्रकारच्या मोठ्या प्रश्नांमध्ये जनतेचे संपूर्ण सहकार्य व साह्य नसेल तर एकटे सरकार फार काही करू शकत नाही. काळा बाजार वगैरे ज्या गोष्टी पसरतात त्यांना सरकार कायद्याने प्रतिबंध करू शकते हे खरे, परंतु अखेर जनतेच्या मदतीनेच त्याला पूर्णपणे आळा घालणे शक्य असते. म्हणून जी गोष्ट आज राष्ट्राला दाबून टाकीत आहे, संकटात लोटीत आहे तिला आळा घालण्याचे उपाय तुम्ही व आम्ही मिळून शोधून काढावयाचे आहेत.

काही दिवसांपूर्वी आपण एक योजना आखली, हे तुम्हाला माहित असेल. राष्ट्रीय योजना, पंचवार्षिक योजना. भारतातील दारिद्र्य व बेकारी यांच्या विरुद्ध सुरू केलेल्या युद्धात जय मिळविण्याचे एक साधन म्हणजे पंचवार्षिक योजना. आपल्या देशात जास्त काम कसे होईल, उत्पादन कसे वाढेल, आणि जनतेपर्यंत जाऊन पोचणारी संपत्ती मोठ्या प्रमाणावर कशी निर्माण होईल याचा विचार या योजनेत केलेला आहे. हे फार मोठे काम आहे. मूठभर लोकांकडून ते होण्यासारखे नाही. चाळीस कोटी लोकांसाठी असलेली ही योजना खूप विचारविनिमय केल्यानंतर तयार झाली आहे. अजून तिच्यावर शेवटचा हात फिरवायचा आहे. तिचा कच्चा आराखडा तयार झाला आहे. तुम्हालाही तो पाहाता येईल, वाचता येईल व आपला सल्ला देता येईल. सर्वांच्या सल्ल्याचा विचार करून महिन्या-दोन महिन्यात ती पक्की केली जाईल. या योजनेतील पुष्कळशा गोष्टी सरकारी पातळीवरून करण्यात यावयाच्या आहेत—मग ते सरकार दिल्लीचे केंद्रीय सरकार असो की प्रत्येक प्रांतचे प्रांतीय सरकार असो. परंतु आमच्या या मोठ्या योजनेत एका गोष्टीचा आवर्जून उल्लेख करण्यात आलेला आहे. ती अशी की या योजनेचा मूलभूत आधार जनतेचे सहकार्य हा आहे. जनतेने सहकार्य केले नाही, कोट्यवधी लोक कामाला लागले नाहीत तर केवळ सरकारच्या हातून योजनेतील काम पूर्ण होणार नाहीत. काही लोक सांगतात की बाहेरून मदत घेऊ व काम करा. आम्ही बाहेरून मदत घेण्यास तयार आहोत अट एवढीच की त्यायोगे आमच्यावर कसलेही बंधन येता कामा नये. खरे म्हणजे आम्हाला बाहेरून थोडीफार मदत मिळालीही आहे

परंतु तुम्ही लक्षात ठेवा, मदतीसाठी—मग ती मदत पैशाची असो की इतर गोष्टींची असो—इतर देशावर फार अवलंबून राहिल्यास त्यायोगे राष्ट्र कमकुवत बनते. जे राष्ट्र दुसऱ्यांवर फार अवलंबून राहाते, ते अपंग बनते तुम्ही सरकारी अधिकाऱ्यांवर विसंबून राहणे आणि प्रत्येक गोष्ट सरकारनेच करावी अशी अपेक्षा बाळगणे चूक आहे त्यातल्या गोष्टी करणे सरकारचे कर्तव्यच आहे. परंतु ही प्रवृत्ती जुनी आहे—इंग्रजांच्या जमान्यातील आहे ! इंग्रजांच्या राज्यात काही खुशामतखोर लोक इंग्रज अधिकाऱ्यांना म्हणत की, 'तुम्हीच आमचे मायबाप !' हे तुम्हाला माहित आहे. असो मी तुम्हाला सांगतो की आता या देशात अशा प्रकारचे 'मायबाप' रा

शब्द वापरला आहे. ते ; सगळे एका विशिष्ट प्रकारचे काम करीत असतात. हे कामही आवश्यक असते. परंतु देश पुढे जातो हजार गोष्टींनी, हजार कामांनी. शिवाय प्रत्येक जण कानावर लेखणी ठेवून कचेरीत कसा बसू शकणार ? काम नसेल तर त्याला आम्ही नोकरी कशी देणार ? परंतु देशात पुष्कळ कामे आहेत. प्रत्येकाने नोकरीकडे डोळे लावून बसण्याऐवजी एकमेकांच्या सहकार्याने काम केले पाहिजे, स्वतः काही उत्पन्न केले पाहिजे.

आता थोड्याच दिवसांत एक मोठी निवडणूक व्हावयाची आहे. तुमच्या समोर नाना प्रकारच्या गोष्टी मांडल्या जातील. सांगितल्या जातील. या वेळी मी त्यांत शिरत नाही. तसे करणे योग्यही होणार नाही. या प्रसंगी मी फक्त एवढीच आशा करतो की तुम्ही सारे देशवासी शांततेने, सहकार्याने व शहाणपणाने वागाल; दंगाधोपा किंवा फसवाफसवी होणार नाही. निवडणुकीच्या वेळी फसवाफसवी व बनवाबनवी फार चालते. तुम्ही त्यात सापडणार नाही व इतरांनाही अडकू देणार नाही, असे मी समजतो. आपल्या येथे होणारी निवडणूक ही जगाच्या इतिहासातील एक फार मोठी घटना ठरणार आहे. कारण आजच्या जगात कोणत्याही देशातील लोकशाही पद्धतीच्या निवडणुकीत इतके—17-18 कोटी लोक भाग घेत नाहीत. इतकी मोठी गोष्ट आहे ही. आपली ही एक मोठी परीक्षाच आहे. या परीक्षेत आपण उत्तीर्ण झालो तर आपली शक्ती खूप वाढेल. जर आपण अयशस्वी झालो तर आपण दुबळे होऊ आणि विशेष म्हणजे ज्या वेळी खूप धोके वाढलेले आहेत, अशा वेळी आपण दुबळे होऊ.

तुम्ही जरा जगाकडे दृष्टी फिरवा. धोक्यांनी भरलेले हे आजचे जग आहे. कोरिया एक लहानसा देश आहे. एक वर्षापूर्वी तेथे अशी भयंकर लढाई झाली की तो देश जवळजवळ नेस्तनाबूत झाला. अगदी नाश झाला त्याचा. काही लोक म्हणतात की आम्ही कोरियाला वाचविण्यासाठी, त्याला स्वतंत्र करण्यासाठी तेथे गेलो आहोत. परंतु सरतेशेवटी ज्याला स्वातंत्र्याची गरज आहे असा माणूसच कदाचित कोरियात उरणार नाही. त्या लढाईत बहुसंख्य लोकांचा नाश होण्याचीच शक्यता आहे. ही आहे आजच्या जगाची स्थिती. [illegible] युद्धात पडावयाचे नाही, जगातील देशामध्ये शांतता राखावयाची, हे आमचे परराष्ट्रीय धोरण आहे. त्या धोरणाप्रमाणे आपण चालत आहोत. आमचा [illegible] आहे. आम्ही इतरांना आमच्या मताप्रमाणे वागावयास भाग पाडू इच्छित नाही. [illegible] आम्ही मारीत नाही. तसे करण्याची आमची इच्छा नाही. इतर लोकांनी त्यांच्या-त्यांच्या मार्गांनी जावे, आम्ही आमच्या मार्गाने जाऊ. परंतु [illegible] जग हे एक संघटित जग आहे. त्याचे तुकडे पाडता येणार नाहीत, वेगवेगळे पाडून विचार करता येणार नाही. त्यामुळे नाइलाजाने आम्हालाही

जगाच्या प्रश्नाची दखल घ्यावी लागते व आपले मत द्यावे लागते. जगांत शांतता कशी राहील, हीच गोष्ट नजरेसमोर ठेवण्याचा आम्ही सतत प्रयत्न केला आहे; कारण आजकाल युद्धापेक्षा अधिक भयंकर व विनाशकारक अशी दुसरी कोणतीच गोष्ट नाही. जर यदाकदाचित जागतिक युद्ध पेटले, नव्या पद्धतीचे युद्ध सुरू झाले, तर जगात जी काही प्रगती झालेली आहे, राष्ट्रांची जी उन्नती झालेली आहे ती सारी धुळीला मिळेल आणि पुनः जग जंगलीपणाच्या दिशेने वाटचाल करू लागेल. ही तर महाभयंकरच गोष्ट आहे. आम्ही जगाला विनाशापासून परावृत्त करू इच्छितो. कारण जगात जे काही घडते त्यात आम्ही भाग घेतला किंवा न घेतला, कमी भाग घेतला किंवा जास्त भाग घेतला तरी त्याचा परिणाम आमच्यावर जगातील प्रत्येक देशावर, झाल्याखेरीज राहात नाही.

म्हणून आम्ही हे परराष्ट्रीय धोरण स्वीकारले. सर्व देशांशी मैत्री ठेवून आपण आपल्या मार्गाने चालत राहावे, असा आम्ही प्रयत्न केला. काल-परवा पर्यंत, चार वर्षांपूर्वीपर्यंत या हिंदुस्थानचाच एक भाग असलेला व आता वेगळा बनलेला आपला जो शेजारी देश आहे त्या पाकिस्तानशीही आपली मैत्री असावी अशी आमची इच्छा होती, तशी आम्ही धडपडही केली. हिंदुस्थानचा एक तुकडा वेगळा व्हावा, याचे आम्हाला दुःख झाले, परंतु आमच्या संमतीने, मान्यतेने ती गोष्ट घडली होती. तसे केल्याने कदाचित भविष्यकाळी आपण एकत्र येऊ, निदान अधिक मैत्रीने राहू शकू, या कल्पनेने आम्ही त्याला मान्यता दिली. रोज जी अंतर्गत भांडणे होत होती, ती आमच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गात अडथळा आणीत होती. ती कमी करणे जरूर होते. आम्ही जे काही केले ते चूक असो की बरोबर असो, आम्ही त्या गोष्टीला मान्यता दिली आहे आणि तिला चिकटून राहावयाचे आहे. तुम्ही ही गोष्ट नीट समजून घ्या की जे लोक ही वस्तुस्थिती मान्य करीत नाहीत आणि आपल्याला काहीतरी उलथापालथ घडवून आणावयाची आहे असे म्हणतात ते आपल्या देशाची किंवा अन्य कोणाचीच सेवा, हित करीत नाहीत. कारण त्याचा अर्थ होतो सगळीकडे आपसातील भांडणे व दंगेधोपे माजविणे. म्हणून जे घडले आहे ते कायमचे आहे असे समजले पाहिजे. अशा प्रकारे आम्ही आमच्याकडून प्रयत्न केला परंतु तुम्हाला माहीतच आहे की दुर्दैवाने गेल्या चार वर्षांत पाकिस्तानचे सरकार व आमचे सरकार यांच्यामध्ये खूप तणातणी राहिली, पुष्कळ मोठमोठे प्रश्न उपस्थित झाले. त्या प्रश्नांत शिरण्याचा हा प्रसंग नव्हे. परंतु या वेळी कानावर युद्धाच्या भेरीचे आवाज येत आहेत, आणि काही लोक धावरून तर काही आवेशात येऊन जोरजोरात लढाईच्या गोष्टी करीत आहेत. पाकिस्तानातून लढाईच्या धमक्या कानांवर येतात. आम्ही त्या पुष्कळ ऐकल्या. त्यामुळे—अर्थात आम्हाला युद्ध नको आहे—देशाला तयार ठेवणे हे आमचे कर्तव्य आहे. देशाने सर्व प्रकारे तयार राहिले

नाहीत दुसऱ्या कोणीतरी आपल्याला काही द्यावे, सरकारने किंवा नगरपालिकेने काही करावे, अशी अपेक्षा तुम्ही नेहमी बाळगावी असे आम्हाला वाटत नाही. सरकार अथवा नगरपालिका ही त्यांची कामे नीट पार पाडीत नसतील तर त्यांच्यावर तुम्ही अवश्य टीका करा. तो तुमचा हक्क आहे. टीका करा, आपले मत व्यक्त करा. परंतु ते सारे विस्तारीत करा. मात्र त्याचबरोबर आपण स्वतः काय करणार आहोत त्याचाही विचार तुम्ही केला पाहिजे. इतरावर टीका कोणालाही करता येते परंतु आपण काय करू शकतो याचा विचार मात्र फार थोडे लोक करतात.

आपण मोठमोठ्या योजना बनवितो. त्यांच्यापायी अतोनात पैसा खर्च होतो हा पैसा कोठून येणार? पैसा काही आभाळातून पडत नाही. तुम्हीच कराच्या रूपाने पैसा देता. आपण इतर देशांकडून कर्ज घेतले तर ते कर्ज फेडावे लागते. त्याचे एक ओझे असते. तर मग ज्या मोठमोठ्या गोष्टी आपल्याला करावयाच्या आहेत त्या आपण कशा करणार? त्याचे पुष्कळ मार्ग आहेत. काही थोडी मोठी कामें वगळल्यास प्रत्येक खेड्यातील व प्रत्येक शहरातील प्रत्येक व्यक्तीने थोडेथोडे काम केले तरी पुष्कळ कार्य होऊ शकेल. मी तुम्हाला एक उदाहरण देतो. अगदी अनुभवसिद्ध उदाहरण आहे. आपल्या अनेक प्रांतांत, विशेषतः ग्रामीण भागात तेथील लोकांनी श्रमदानाने रस्ते तयार करावेत, असा कार्यक्रम आम्ही आखला आहे तुम्हाला माहीतच आहे की खेड्यांतून रस्ते फार कमी आहेत. त्याप्रमाणे आपण घरे बांधली, पचायत-घरे बांधली. कोठे कोठे लहान कालवे खोदले, लहान शाळा बांधल्या हे सारे स्वतःच्या श्रमाने केले, सरकारी पातळीवर नव्हे. सरकारकडून काही मदत मिळाली असेल, काही सामान मिळाले असेल पण ती गोष्ट वेगळी. अशाच प्रकारे त्या लोकांनी हजारो मैल लांबीचे रस्ते स्वतःच्या फायद्यासाठी श्रमदानाने तयार केले. आता आम्ही मोठे मोठे आराखडे बनवीत आहोत. योजना आखीत आहोत, अमुक ठिकाणी सडका बांधावयाच्या आहेत. त्यासाठी पन्नास लाख किंवा एक कोटी रुपये लागतील. तर आणा एक कोटी रुपये. आमच्या कचेऱ्यातून आराखडे तयार होतात, मोठमोठ्या फाइली तयार होतात, त्यावर मोठमोठे शेरे मारले जातात. परंतु ते रस्ते किंवा शाळा तयार होत नाहीत. झाल्या तरी फार वेळ लागतो. अशी ही पद्धत आहे. सरकार फार हळू चालते. सरकारी कार्यपद्धतीतील ही अडचण आहे. परतु लोकांनी स्वतः कामे केली व त्यात सरकारकडून थोडीफार मदत मिळाली तर थोड्याच दिवसात आपण साऱ्या भारताचे स्वरूपच पालटून टाकू. युरोपातील देशाकडे पाहा. चीनकडे पाहा. तेथील लोकांनी आपल्या परिश्रमाने किती कामे केली आहेत. गावच्या लोकांनी ठरविले की आम्ही आमच्या गावातले रस्ते तयार करतो, शाळा बांधतो, पंचायत-घर बांधतो, आणि त्याप्रमाणे त्यांनी करूनही दाखविले. या कामाच्या बाबतीत गावागावात चढाओढी सुरू झाल्या आणि अशा प्रकारे सगळे लोक मैत्रीपूर्ण चढाओढीने पुढे गेले.

तेव्हा आमची ही जी पंचवार्षिक योजना तयार झालेली आहे ती वरून अमलात आणण्याची एखादी सरकारी गोष्ट आहे असे समजू नका. ती सरकारी तर आहेच; परंतु ती प्रत्येक व्यक्तीची आहे, आणि सर्व लोकांनी तिला हातभार लावला तर आपल्याला बाहेरच्या पैशाची किंवा मदतीची जरूर लागणार नाही. लक्षात ठेवा, हा जो पैशाचा गाजावाजा होत असतो, त्यामुळे आपली डोकी फिरली आहेत. ती धंदेवाईक बनली आहेत. पैशाच्या बाबतीत आपला बराच गैरसमज झाला आहे. आजच्या जीवनात पैसा ही एक अपरिहार्य गोष्ट बनली आहे ही खेदाची गोष्ट आहे. वस्तुत. माणसाची खरी संपत्ती म्हणजे त्याचे परिश्रम, त्याची बुद्धी, त्याची लायकी व हातापायांनी काम करण्याची त्याची क्षमता. आपण आपल्या परिश्रमाने संपत्ती निर्माण करतो. सोने, चांदी ही काही वीत नसतात परंतु आजकाल लोक तसे समजू लागले आहेत आणि काही मंडळी त्याप्रमाणे वागतातही. परंतु खरी सपत्ती म्हणजे माणसाचे परिश्रम. आपल्या देशात सोने चांदी भरपूर नसली तरी धट्टीकट्टी व काम करणारी माणसे तर भरपूर आहेत ना? तर मग त्यांच्या त्या कामातून, त्यांच्या परिश्रमातून आपण नवी संपत्ती का निर्माण करू नये? ही सपत्ती त्यांनाही मिळेल ,आणि देशालाही पुढे नेईल. या पद्धतीने आज चीन देश प्रगती करीत आहे. त्याला दुसरे कोणते देश मदत करीत आहेत? ते लोक मोठ्या आवेशाने मेहनत करतात. अमेरिका हा एक श्रीमंत देश आहे. पण त्याची श्रीमंती कोठून येते, याचा तुम्ही कधी विचार केला आहे काय? ती काही बाहेरून येत नाही, आभाळातून पडत नाही. ती तेथील लोकांच्या परिश्रमातून निर्माण होते, त्याच्या योग्यतेमुळे ती येते. कोणताही देश शेवटी इतरांच्या नव्हे, तर आपल्या स्वत.च्या श्रमावर, बाहुबलावर पुढे जात असतो.

यामुळे कधी-कधी मी विचार करतो तेव्हा मला असे दिसून येते की आपल्या देशातील काही लोकांच्या डोक्यातून जुन्या, गुलामगिरीच्या कल्पना अद्यापि निघून गेलेल्या नाहीत. त्यामुळे आपण दर खेपेस वरती, सरकारकडे पाहातो. सर्व काही सरकारने करावे असे आपल्याला वाटते. आपण नुसते वाट बघत बसतो, किंवा रागावतो, किंवा स्वत ला दुर्दैवी समजून गप्प राहातो. सरकारी कचेऱ्यांचे उबरठे झिजविण्याऐवजी आपण एक कुदळ घेऊन का[...] खोदावे, काही काम करावे, स्वत चे शरीर घट्टेकट्टे बनवून काही उत्पन्न क[...] असे आपल्याला वाटतच नाही. खरी अडचण अशी आहे की सरकारी [...]नो बनण्यात व त्याची कामे करण्यातच मोठेपणा आहे, असे आमच्या [...] वाटते. अशा लोकांची संख्या पूर्वी थोडी कमी होती. आता ती पुष्कळ [...]ढली आहे. अर्थात सरकारी कर्मचारी चागले असतात. कर्मचारी म्हणजे पांढर[...] शेक कचेऱ्यातून काम करणारे, अथवा लहान-मोठे अधिकारी याना उद्देशून मी हा

पाहिजे, कसलाही धोका पत्करता कामा नये. आम्हाला असे वाटते की आमचा देश जय्यत तयार राहिला तर कदाचित लढाई होणार नाही; कारण जे लोक तयार नसतात त्यांच्यावर हल्ले होतात. लोक तयार असतील तर हल्ले थांबतात

अशा प्रकारे लढाई थोपविता येईल या कल्पनेने आम्हाला जी काही तयारी करणे योग्य वाटले ती आम्ही केली. परंतु त्याचबरोबर मी तुम्हाला व साऱ्या देशाला वारंवार अशी विनंती केली आहे की ज्या योगे युद्ध होणार आहे असे लोकांना वाटेल, निष्कारण दहशत पसरेल, काळजी वाटेल व आपल्या कामात अडथळा येईल अशी कोणतीही गोष्ट आपल्या शहरात किंवा अन्यत्र केली जाता कामा नये. पाकिस्तानी शहरांतून अशा कारवाया चालू आहेत; परंतु आम्ही येथे तसे वातावरण निर्माण करू इच्छित नाही. तुम्ही व इतर लोकांनी आमचा सल्ला ऐकला, तसले वातावरण निर्माण केले नाही आणि शांतपणे, स्वस्थ चित्ताने आपली कामे करीत राहिलात याबद्दल मी तुमचा आभारी आहे. केवळ या दिल्ली शहरातच नव्हे तर पूर्व पंजाबातही अगदी सरहद्दीपर्यंत जरी तुम्ही गेलात, तरी आमचे देशबांधव मुळीच विचलित न होता, निश्चित मनाने शहरात, कारखान्यात, शेतात आपापले काम करीत आहेत असे तुम्हाला दिसून येईल—अगदी थेट भारताच्या सरहद्दीपर्यंत! ही आनंदाची गोष्ट आहे हे सामर्थ्याचे लक्षण आहे. आमच्या शांतताप्रियतेची ती खूण आहे.

ही स्थिती तुम्ही कायम ठेवा. आजच्या प्रसंगी, विशेषत: या महत्त्वाच्या दिवशी, आमच्या देशाला कोठेही व कसलेही युद्ध नको आहे ही गोष्ट मी पुन: एकदा स्पष्टपणे सांगू इच्छितो. विशेषत: पाकिस्तानशी आमचे वैमनस्य राहावे किंवा युद्ध व्हावे अशी आमची मुळीच इच्छा नाही; कारण तुम्हाला किंवा पाकिस्तानवाल्यांना कितीही राग आला तरी पाकिस्तानातील लोक कालपर्यंत आमचे बांधव होते, याच देशाचे रहिवासी होते, ही गोष्ट विसरून चालणार नाही. हजारो नाती, हजारो संबंध होते ते या चार-पाच वर्षांत कसे सुटतील? आणि का सुटावेत? आमची भाषा एक, आमची राहणी एक, आमचा इतिहासही पुष्कळ अंशी सारखाच. तर मग त्यांनी व आम्ही एकमेकांशी अशी दिशाभूल का करून घ्यावी? आपसात का भांडावे? एकमेकांचा नाश करण्याची धडपड का करावी?

या साऱ्या प्रकारांत आमची शक्ती विनाकारण वाया जात आहे आणि पूर्वीच्या मार्गाने जाऊन पाकिस्तानही आपली शक्ती व्यर्थ वाया घालवीत आहे. याचा जेव्हा मी विचार करतो तेव्हा मला आश्चर्य वाटते. म्हणून या वेळी मी तुम्हाला अगदी स्पष्टपणे सांगू इच्छितो की आपण शांततेने राहावे, पाकिस्तानशी

आमचे संबंध शांततेचे असावेत आणि पाकिस्तानी लोकांशी आमची मैत्री व्हावी, अशी आमची इच्छा आहे. तो आमचा दृढ सिद्धांत आहे व त्यासाठी आमची धडपडही चालू आहे. माझा हा आवाज पाकिस्तानी लोकापर्यंत जाऊन पोचेल आणि जगालाही तो ऐकू जाईल, अशी मला आशा वाटते. एखाद्या वेळी तुम्हांला एखाद्या गोष्टीचा भयंकर राग येईल, तुमच्या तळपायाची आग मस्तकाला जाईल. परंतु तेव्हाही आपला हा क्रोध एका राष्ट्राविरुद्ध, जमातीविरुद्ध आहे, असे तुम्ही समजू नका. पाकिस्तानात एका व्यक्तीने किंवा दहा जणांनी, शंभर जणांनी, अथवा हजार जणानी चूक केली तर त्याचा अर्थ असा नव्हे की तुम्ही कोटयवधी लोकांना आपले दुष्मन समजावे. आपल्या भारतातील लोक चूका करीत नाहीत काय? म्हणून काही एखादा विशिष्ट भारतीय आपला शत्रु आहे असे तुम्ही समजत नाही. चुकीच्या मार्गाने जाणारे पुष्कळ वाईट लोक जसे तिकडे आहेत तसे ते इकडेही आहेत. म्हणून आपण आपल्याकडून जय्यत तयारीत राहावे; कारण तयार राहिल्यामुळे आपण सुरक्षित राहातो व युद्धाला आळा घालतो. परंतु त्याचबरोबर इतर देशाशी मैत्री करण्यासाठीही आपला हात सदैव पुढे असला पाहिजे आम्ही कोणाला धमकी देऊ इच्छित नाही, कोणाला आवळलेली मूठ किंवा ठोसा दाखवू इच्छित नाही. आम्ही हात पुढे करतो मैत्रीसाठी. पाकिस्तानी लोकांशी हस्तांदोलन करण्यासाठी आम्ही आमचा हात पुढे केलेला आहे. तो आजही पुढे केलेला आहे व उद्याही पुढे केलेलाच राहील. दुसऱ्या बाजूने आम्हाला भटकविण्याचा कितीही प्रयत्न झाला तरी आम्ही आमच्या या सिद्धान्ताला चिकटून राहू. अर्थात आमच्या देशावर कोणी हल्ला केला तर मात्र संपूर्णपणे आपले रक्षण करणे व त्यासाठी तयार राहणे, आमचे कर्तव्यच आहे.

महात्माजींनी आमच्यासमोर जे सिद्धांत ठेवले होते व ज्याचे अनुसरण करून आपण देशाला स्वातंत्र्य मिळवून दिले त्या जुन्या सिद्धांताचे स्मरण आपण आजच्या दिवशी विशेषपणे केले पाहिजे. तो मार्ग जर आपण सोडला तर आपली काय स्थिती होईल? तसे झाल्यास आपल्यावर काय काय सकटे कोसळतील याची मला तरी पूर्ण कल्पना आहे गांधीजीनी दाखविलेला मार्ग हाच आपल्या दृष्टीने एकमेव मूलभूत व अचूक मार्ग आहे, याविषयी माझी खात्री आहे. त्याच मार्गाने आपल्याला जावयाचे आहे

या झेंड्याखाली मी उभा आहे तुम्हालाही हा ध्वज दिसत आहे. हा एक प्रिय ध्वज आहे, तो सुंदर आहे. यात इतर पुष्कळच गोष्टी आहेत. एक गोष्ट अशी की ही आमच्या स्वातंत्र्ययुद्धाची एक खूण आहे, स्मृती आहे. याच्या खाली उभे राहून आम्ही कितीदा प्रतिज्ञा घेतली, आणि आम्ही आमच्या सिद्धांतांना चिटकून राहू, भारताचे रक्षण करू व त्याला स्वतंत्र बनवू अशी शपथ घेतली आम्ही

भारतात ऐक्य ठेवू, एकोप्याने राहू व कधीही क्षुद्रपणा करणार नाही, अशी आमची प्रतिज्ञा होती. अशा प्रकारे आमच्या स्वातंत्र्ययुद्धाची व त्यातील बलिदानांची आठवण करून देणारी ती एक खूण आहे, स्मृतिचिन्ह आहे. त्याचबरोबर त्यात एक नवे चिन्हही आहे. तुम्हाला माहीत आहे की आपला जो जुना झेंडा होता तो तसाच ठेवून त्यात आपण थोडा फरक केला. तो फरक कोणता ? या ध्वजाच्या मधोमध एक चक्र आले. या चक्राने माझ्या भारताचा, गेल्या कित्येक हजार वर्षांचा इतिहास या ध्वजात आणून ठेवला आहे. कारण हे चक्र म्हणजे भारताचे हजारो वर्षांपूर्वीचे प्रतीक आहे. ते भारताच्या युद्धप्रियतेचे प्रतीक नसून त्याच्या शांतताप्रियतेचे प्रतीक आहे. आपल्याला सत्याच्या व धर्माच्या मार्गाने जावयाचे आहे याचे स्मरण भारतीयांना सतत राहावे म्हणून आपण ते घेतले आहे. हे प्रतीक खूप प्राचीन आहे. सम्राट अशोकाच्याही आधीचे. परंतु ते सम्राट अशोकाच्या नावाशी विशेषेकरून संबद्ध आहे. म्हणून ते घेतल्यामुळे या ध्वजाशी हजारो वर्षांचा इतिहास संबद्ध झाला आहे; आणि हजारो वर्षांपासून आपल्यासमोर असलेल्या ज्या ध्येयाकडे भारतातील थोर पुरुषांचे डोळे लागून राहिलेले होते ते ध्येय या ध्वजामध्ये आलेले आहे. अशा प्रकारे यात हजारो वर्षांचा प्राचीन काळही आला आहे आणि स्वातंत्र्ययुद्धाचा गेल्या चाळीस-पन्नास वर्षांचा आधुनिक काळही आला आहे. यात वर्तमानकाळ आला आहे आणि कालांतराने येणारा, आम्ही कोठे जाणार आहोत ते दाखविणारा भविष्यकाळही आला आहे. जुन्या काळापासून आपण धडा घेतला पाहिजे त्यातील चांगल्या गोष्टींचे स्मरण ठेवले पाहिजे. परंतु आपली दृष्टी मात्र पुढे, भविष्यकाळाकडे, येणाऱ्या काळाकडे असली पाहिजे.

त्याच्यासाठी आपल्याला तयार व्हावयाचे आहे, बलिष्ठ व्हावयाचे आहे सामर्थ्यवान बनावयाचे आहे. जी जी संकटे व आपत्ती येतील त्यांना धीर न सोडता, दृढपणे तोंड द्यावयाचे आहे भारताचे भवितव्य उज्ज्वल आहे, याविषयी माझी खात्री आहे. याचा अर्थ असा नव्हे की आपण इतर देशांवर स्वाऱ्या करून त्यांना जिंकून घ्यावे. तो काळ आता गेला. जो देश इतर देशांना दडपून टाकू इच्छितो, आपल्या ताब्यात घेऊ इच्छितो तो कितीही मोठा असला तरी आजच्या काळात तो बदनाम होतो व शेवटी त्याचा पराभव होतो.

म्हणून इतर राष्ट्रांना दडपून टाकण्यात काही मोठेपणा नाही. आपण आपल्या देशाला वर आणावे, इतर देशांशी मैत्री करावी, आपला फायदा करून घ्यावा व जगाचाही फायदा करावा, यात मोठेपणा आहे या मार्गाने आपल्याला जावयाचे आहे. आजकालच्या जगातील व भारतातील या नाजुक प्रसंगी आपल्याला

कोणत्याही गोष्टीला तयार राहावयाचे आहे व एकोप्याने पुढे जावयाचे आहे कारण आपण सर्वजण सहप्रवासी आहोत. आपण एका प्रवासाला निघालो आहोत. अशा वेळी वाटेतच आपण एकमेकांशी भांडू लागलो तर आपण पुढे कसे जाणार?

असो. आता मी तुम्हाला 'जयहिंद' करून माझे भाषण संपवितो. त्यानंतर तुम्हीही तीन वेळा माझ्याबरोबर 'जय हिंद' म्हणावे, अशी माझी इच्छा आहे.

जय हिंद!
जय हिंद!
1951 जय हिंद!

भारतात ऐक्य ठेवू, एकोप्याने राहू व कधीही क्षुद्रपणा करणार नाही, अशी आमची प्रतिज्ञा होती. अशा प्रकारे आमच्या स्वातंत्र्ययुद्धाची व त्यातील बलिदानांची आठवण करून देणारी ती एक खूण आहे, स्मृतिचिन्ह आहे. त्याबरोबर त्यात एक नवे चिन्हही आहे. तुम्हाला माहीत आहे की आपला जो जुना झेंडा होता तो तसाच ठेवून त्यात आपण थोडा फरक केला. तो फरक कोणता ? या ध्वजाच्या मधोमध एक चक्र आहे. या चक्राने मान्या भारताचा, गेल्या कित्येक हजार वर्षांचा इतिहास या ध्वजात आणून ठेवला आहे. कारण हे चक्र म्हणजे भारताचे हजारो वर्षांपूर्वीचे प्रतीक आहे. ते भारताच्या युद्धप्रियतेचे प्रतीक नसून त्याच्या शांतताप्रियतेचे प्रतीक आहे. आपल्याला सत्याच्या व धर्माच्या मार्गाने जावयाचे आहे याचे स्मरण भारतीयांना सतत राहावे म्हणून आपण ते घेतले आहे. हे प्रतीक खूप प्राचीन आहे. सम्राट अशोकाच्याही आधीचे. परंतु ते सम्राट अशोकाच्या नावाशी विशेषेकरून संबद्ध आहे. म्हणून ते घेतल्यामुळे या ध्वजाशी हजारो वर्षांचा इतिहास संबद्ध झाला आहे; आणि हजारो वर्षांपासून आपल्यासमोर असलेल्या ज्या ध्येयाकडे भारतातील थोर पुरुषांचे डोळे लागून राहिलेले होते ते ध्येय या ध्वजामध्ये आलेले आहे. अशा प्रकारे यात हजारो वर्षांचा प्राचीन काळही आला आहे आणि स्वातंत्र्ययुद्धाचा गेल्या चाळीस-पन्नास वर्षांचा आधुनिक काळही आला आहे. यात वर्तमानकाल आला आहे आणि कालांतराने येणारा, आम्ही कोठे जाणार आहोत ते दाखविणारा भविष्यकाळही आला आहे. जुन्या काळापासून आपण धडा घेतला पाहिजे त्यातील चांगल्या गोष्टींचे स्मरण ठेवले पाहिजे. परंतु आपली दृष्टी मात्र पुढे, भविष्यकाळाकडे, येणाऱ्या काळाकडे असली पाहिजे.

त्याच्यासाठी आपल्याला तयार व्हावयाचे आहे, बलिष्ठ व्हावयाचे आहे सामर्थ्यवान बनावयाचे आहे. जी जी संकटे व आपत्ती येतील त्यांना धीर न सोडता, दृढपणे तोंड द्यावयाचे आहे. भारताचे भवितव्य उज्ज्वल आहे, याविषयी माझी खात्री आहे. याचा अर्थ असा नव्हे की आपण इतर देशांवर स्वाऱ्या करून त्यांना जिंकून घ्यावे. तो काळ आता गेला. जो देश इतर देशांना दडपून टाकू इच्छितो, आपल्या ताब्यात घेऊ इच्छितो तो कितीही मोठा असला तरी आजच्या काळात तो बदनाम होतो व शेवटी त्याचा पराभव होतो.

म्हणून इतर राष्ट्रांना दडपून टाकण्यात काही मोठेपणा नाही. आपण आपल्या देशाला वर आणावे, इतर देशांशी मैत्री करावी, आपला फायदा करून घ्यावा व जगाचाही फायदा करावा, यात मोठेपणा आहे. या मार्गाने आपल्याला जायचाचे आहे. आजकालच्या जगातील व भारतातील या नाजुक प्रसंगी आपल्याला

असंख्य लोकांच्या डोळ्यांतून अश्रू वाहात आहेत त्यांचे किती अश्रू आपण पुसले? किती अश्रू कमी केले? या देशाच्या प्रगतीचे खरे मोजमाप हेच. आपण किती इमारती उभारल्या किंवा किती मोठी कामे केली यावरून देशाची प्रगती मोजता येणार नाही. कारण अखेर हा देश म्हणजे तरी काय? हिमालय पर्वत किंवा कन्याकुमारी म्हणजे काही भारत नव्हे. या देशात राहाणारे छत्तीस कोटी लोक—स्त्रिया, पुरुष व मुले—म्हणजेच हा देश या छत्तीस कोटी लोकांचे कल्याण-अकल्याण हेच या देशाचे कल्याण-अकल्याण. शिवाय या देशातील लहान मुले म्हणजेच हा देश; कारण तुमचा-आमचा आपल्या वयाच्या लोकांचा काळ आता संपत चालला आहे.

आम्ही आमचे कर्तव्य केले—मग ते बरे असो की वाईट असो. आमचा काळ आता संपत चालला. आता इतरांनी पुढे यावयाचे आहे. आमच्यात जेवढी शक्ती होती, आमच्या बाहूत व हातात जेवढे सामर्थ्य होते, त्याप्रमाणे आम्ही स्वातंत्र्याची ज्योत वर उचलून धरली, तिला खाली पडू दिले नाही, तिचा कधी अपमान होऊ दिला नाही. आता प्रश्न असा आहे की ही ज्योत डौलात तेवत ठेवण्याचे देशाची सेवा व उन्नती करण्याचे सामर्थ्य तुमच्यात, कोट्यवधी भारतीय लोकांत तरुणांत व लहान मुलांत किती आहे? या देशातील लाखो आपद्ग्रस्त लोकांचे अश्रू आपल्याला कसे पुसता येतील, त्यांचे दुःख कसे दूर करता येईल त्यांना कशी प्रगती करून घेता येईल या गोष्टींकडे आपण विशेषेकरून नेहमी लक्ष दिले पाहिजे. यापुढे आमच्या नव्या सेनेला, म्हणजे आपल्या मुलांना योग्य शिक्षण घेण्याची, स्वतःचे शरीर, मन व बुद्धी घडधाकट ठेवण्याची संधी कशी मिळेल हे आपण पाहिले पाहिजे. कारण असे झाले तरच ती मोठेपणी या देशाचे ओझे योग्य प्रकारे वाहू शकतील. ही मोठी कामे आहेत, महत्त्वाची कामे आहेत. निव्वळ कायदेकानू केल्याने किंवा सरकारी हुकमाने ती होणार नाहीत. अर्थात या बाबतीत सरकारची जबाबदारी सर्वांत अधिक आहे, हे खरे, परंतु या देशातील सारे नागरिक जोपर्यंत त्यांत सामील होणार नाहीत, साह्य व सहकार्य करणार नाहीत तोपर्यंत सरकार आपली जबाबदारी पार पाडू शकणार नाही. कारण सर्व जनतेचे सहकार्य नसेल तर एवढे मोठे कार्य एकटया सरकारकडून होणे शक्य नाही. तुमचे मत काहीही असो, आर्थिक, राजकीय किंवा इतर काही बाबतीत मतभेद असले तरी, मूलभूत काम आमचे व तुमचे आहे. आपण ते एकोप्याने करावयाचे आहे. अर्थात काही गोष्टी अशा आहेत की त्या जाणून घेतल्या पाहिजेत त्यांच्यात-आमच्यात जोपर्यंत गैरसमजाची भिंत आहे, तोपर्यंत त्यांचे आपले मीलन होऊ शकणार नाही. त्या गोष्टी कोणत्या? आपण सारे एकजुटीने काम करू शकतो, केले पाहिजे; कारण आपण सारे या भूमीचे लेकरे आहोत.—मग आपला धर्म कोणताही असो, प्रांत, पेशा अथवा काम कोणतेही असो. हे सर्वांचे कर्तव्य आहे. सर्वजण या स्वातंत्र्याचे भागीदार आहेत ते स्वातंत्र्य कायम ठेवण्याची

# स्वातंत्र्याची ज्योत तेवत ठेवू या

आज स्वतंत्र भारताचा पाचवा वाढदिवस आहे. पाच वर्षांपूर्वी या ठिकाणी, या जुन्या दिल्लीत आपण जमलो होतो, आणि याच लाल किल्ल्याच्या तटावर आपण हा झेंडा फडकाविला होता. हे भारतातील एका नव्या युगाचे प्रतीक होते. त्या घटनेला पाच वर्षे झाली. या पाच वर्षांत कितीतरी बरे-वाईट प्रसंग घडले. पुष्कळ गोष्टी आपण केल्या, पुष्कळ केल्या नाहीत, करावयाच्या राहून गेल्या. आज पुन: आपण येथे जमलो आहोत. आपले कर्तव्य काय? आपल्याला एक थोर वारसा मिळाला. पाच वर्षांपूर्वी या देशातील आपण कोट्यवधी लोक एका थोर परंपरेचे वारसदार बनलो. तिचे नाव आहे हिंदुस्थान, भारत, इंडिया. ती एक विशाल वस्तू आहे. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत. परंतु ती यापेक्षाही अधिक काहीतरी आहे. कारण तिची पाळेमुळे हजारो वर्षांपर्यंत मागे गेलेली आहेत. ही हजारो वर्षांची कहाणी, इतिहास हजारो वर्षांचे वैभव, हजारो वर्षांची संकटे आपल्याला वारसा म्हणून मिळाली आहेत. या दीर्घ इतिहासामध्ये या आजच्या जमान्यात राहाणाऱ्या आम्हा भारतीयांचे कर्तव्य काय, हा प्रश्न आहे. या इतिहासामध्ये आपण कोणता भाग घेणार? काय लिहिणार? आपल्यानंतर येणारी मुलेबाळे व त्यांची मुले या काळाकडे वळून पाहातील तेव्हा त्यांना काही तरी अभिमानास्पद दिसावे, यासाठी आपल्या या शानदार वारसामध्ये आपण काय भर घालणार आहोत?

कोणत्याही देशाच्या इतिहासात पाच वर्षे हा काही फार मोठा काळ नव्हे. परंतु या पाच वर्षांतही जगात व आपल्या देशात मोठमोठ्या घटना घडल्या आहेत. मोठमोठी संकटेही आपण झेलली आहेत. अर्थात आम्ही काय केले व काय केले नाही हे इतिहासकार लिहितील. आपले कर्तव्य मागे पाहणे हे नसून पुढे पाहणे हे आहे. आपल्या कानावर जो आवाज येत आहे तो अर्धवट राहिलेल्या कामाचा आवाज आहे. जे काम अपूर्ण राहिले आहे ते आपल्याला पूर्ण करावयाचे आहे. तीच महत्त्वाची गोष्ट आहे.

देशाचे काम कधी पूर्ण होत नसते. तुमचे-आमचे काम काय? या देशात हजारो कामे आहेत. आपण हजार कामे केली तरी हजारो शिल्लक राहातील. आपण एखादी नवी इमारत बांधली, एखादी नवी शाळा बांधली, एखादे नवीन मोठे कार्य केले तर त्यावरून आपल्या कामाचा अंदाज बांधणे बरोबरच होईल. परंतु आपल्या कामाची खरी कसोटी ही आहे की या देशात राहाणाऱ्या ज्या

म्हणून आपण मोठ्या कार्याकडे पाहिले पाहिजे. एखाद्या प्रांताचा, जातीचा, जमातीचा किंवा धर्माचा विचार आपण करू नये. लोकांनी आपापला व्यवसाय करावा, आपापल्या धर्माप्रमाणे चालावे. परंतु प्रत्येकाचा सर्वात मोठा पेशा, सर्वात मोठा धर्म व सर्वात मोठे कर्तव्य भारत हे आहे. या मोठ्या कुटुंबातील छत्तीस कोटी लोकांची सेवा करावयाची आहे. त्यांना पुढे न्यावयाचे आहे. जे आपद्ग्रस्त असतील, खाली पडलेले असतील त्यांना वर उठवावयाचे आहे, या दृष्टीने सतत विचार केला पाहिजे. भारतातील ज्या माणसाच्या डोळ्यांत अश्रू असतील त्या प्रत्येकाच्या डोळ्यांतील अश्रू आपल्याला कसे पुसता येतील याचे सतत चिंतन करणे, हे आपले कर्तव्य आहे. अलीकडे आपल्या देशावर पुष्कळ आपत्ती कोसळल्या. निसर्गानेही आपत्ती पाठविल्या. गेल्या काही वर्षांत अवर्षण पडली, भूकंप झाले, इतरही पुष्कळ गोष्टी घडल्या. ते सारे तुम्हाला माहितच आहे. यंदा आपण थोडेफार सावरलो. या गोष्टींवर आपण ताबा मिळविला; आणि इतर वर्षांपेक्षा यंदा आपली स्थिती थोडी अधिक चांगली झाली. पाऊस-पाणीही बरे झाले. या देशातील अन्नाची व वस्त्राची स्थिती या वेळी काहीशी चांगली आहे. परंतु तुम्ही लक्षात ठेवा की हा एक फार मोठा देश आहे; आणि या मोठ्या देशामध्ये एखादा भाग असा असतोच की जेथे काही ना काही आपत्ती आलेली असते. यंदा देशाच्या अधिकांश भागात चांगला पाऊस पडला, बहुतेक पीकपाणी चांगले आहे, अन्नधान्यांचे उत्पादन समाधानकारक आहे. परंतु काही भागातील परिस्थिती मोठी विकट आहे. उदाहरणार्थ उत्तर-प्रदेशातील गोरखपूर, आझमगड, देवरिया व बस्ती हे जिल्हे, बिहारमधील काही जिल्हे, बंगालमधील सुंदरबनचा प्रदेश, मद्रासचा रायलसीमा भाग, म्हैसूरमधील काही जिल्हे, काही राजस्थानातील व काही सौराष्ट्रातील या भागात पुष्कळच उपासमार चालू आहे. तेथे गरिबीही खूप आहे व अन्नधान्यांचाही तुटवडा आहे. त्यांना सर्व प्रकारे मदत करणे हे आपले कर्तव्य आहे. ही मदत नुसती तात्कालिक नसावी. त्या लोकांना स्वतःच्या पायावर उभे राहाता येईल व आपण सगळे मिळून पुढे जाऊ शकू अशी व्यवस्था केली पाहिजे. कारण भारताचे 36 कोटी लोकांचे जे एक मोठे कुटुंब आहे त्यातील आपण सगळे सहप्रवासी आहोत. खांद्याला खांदा लावून, एका दिशेने, शिस्तीत आपल्याला पुढे जावयाचे आहे. काही लोकांना जर असे वाटत असेल की त्या मंडळींना मागे ठेवून आपण पुढे जाऊ, तर त्यांचा तो गैरसमज आहे; कारण जे मागे राहतील त्यांचे मागासलेपण इतरांच्या प्रगतीत अडथळा आणील, त्यांना पुढे जाऊ देणार नाही.

मी आताच तुम्हाला सांगितले की आपल्यापुढे तीन धोके आहेत. हिंसेचा प्रचार करणारे लोक हा पहिला धोका. स्वार्थीपणाने, व्यापारात किंवा इतर बाबतीत, काळाबाजार करून, अप्रामाणिकपणाने, लाच देऊन अथवा घेऊन,

व वाढविण्याची जबाबदारी सर्वांवर आहे. नाही कोणावर? ती अमक्यावर नाही असे मी म्हणू शकत नाही. परंतु काही मार्ग चुकीचे आहेत. ते आम्हाला चुकीच्या दिशेने नेतात. ते आहेत यादवीचे, हिंसेचे मार्ग. आजकाल पुनः कुठून-कुठून असे आवाज ऐकू येऊ लागले आहेत की आपसात भांडून, दंगेधोपे करून या देशाची व जनतेची प्रगती आम्ही करू. हे बोलणे एक तर अडाणीपणाचे आहे. किंवा जाणून-बुजून देशाचा नाश करणारे आहे.

तुम्ही-आम्ही आपसातील यादवीपासून सावध राहिले पाहिजे—मग त्या यादवीला देण्यात आलेले नाव कितीही मोठे का असेना, अथवा ती देशाच्या हिताची आहे असेही सांगितले जात का असेना. यादवीचेही नाना प्रकार आहेत, मोठ-मोठी नावे आहेत. जसे 'आम्ही शेतकऱ्यांच्या हितासाठी झगडत आहोत, किंवा येथील कामगारांच्या कल्याणासाठी हे करीत आहोत'. परंतु भाडणतंटे, दंगेधोपे व रक्तपात केल्याने शेतकऱ्यांचे हित होणार नाही किंवा कामगारांचेही पाऊल पुढे पडणार नाही. त्यायोगे देश मात्र रसातळाला जाईल. दुसरे जे लोक तुम्हाला माहीत आहेत ते धर्माच्या नावावर दुफळी माजवितात, जातीयवाद पसरवितात. या प्रकारच्या घटनांपासून तुम्ही चांगला धडा घेतला आहे, तुम्हाला सगळे समजले आहे. या मार्गाने देश प्रगती करू शकणार नाही; उलट त्यामुळे आपली दुर्बळता वाढेल. आपले सारे सामर्थ्य वाढण्याऐवजी उलट खर्ची होईल. या गोष्टीपासून आपण सावध राहिले पाहिजे. तिसरा गट आहे स्वार्थांध लोकांचा. ते पैशाच्या हव्यासाने काळाबाजार करतात व नाना प्रकारची फसवाफसवी करतात. वाईट मार्गांनी पैसा मिळवून हे लोक इतरांचे व देशाचे नुकसान करतात. देशाला विनाशा-कडे नेणारे हे तीन मार्ग आहेत. आपण ते नीट ओळखले पाहिजेत.

आपण एका मोठ्या देशाचे रहिवासी आहोत. देश महान आहे. त्याचा इतिहास महान आहे. मोठ्या देशात राहणारे लोक मोठ्या मनाचे असले पाहिजेत मोठ्या मार्गाने आपल्याला जावयाचे आहे—वाकून नव्हे, चुकीच्या पद्धतीने नव्हे, लबाडीने नव्हे. डौलात आपण भारताला स्वतंत्र केले डौलाने आपल्याला पुढे जावयाचे आहे, डौलाने ही भारतीय स्वातंत्र्याची ज्योत घेऊन पुढे जावयाचे आहे. आणि आपले हात थकतील तेव्हा ती इतरांकडे द्यावयाची आहे तरुण हात तिला वर उचलून धरतील; आणि मग आम्ही आमचे काम पूर्ण करून मातीत मिसळून जाऊ. परंतु जोपर्यंत या हातात, या शरीरात, ताकद आहे, तोपर्यंत ती ताकद या देशाला पुढे नेण्यात, या देशातील कोट्यवधी लोकांची सेवा करण्यात आपण वापरू या. ही ताकद संपली की आपले कामही संपले. मग आमचे काय होईल याची आम्हाला चिंता नाही; कारण दुसरे लोक पुढे येतील

 44152

तर त्याने आपल्या आचरणाने आपण आपल्या शेजाऱ्याच्या धर्माचा मान ठेवतो हे दाखवून दिले पाहिजे ही आहे भारताची हजारो वर्षांपासून चालत आलेली संस्कृती. आजकाल काही अडाणी लोक मागतात त्याप्रमाणे द्वेषावर, भांडणांवर आधारलेली संस्कृती ही भारतीय संस्कृती नव्हे. शिवाय तुम्ही आजकालच्या युद्धग्रस्त जगाकडे पाहा. जिकडे तिकडे लढाईची चर्चा व लढाईची तयारी. मोठी विचित्र परिस्थिती आहे. कोणत्या वेळी हे संकट जगावर कोसळेल आणि निम्मे जग नेस्तनाबूत होईल, काही सांगता येत नाही. आपला देश दुबळा आहे. आम्ही शांततेच्या बाजूने आवाज उठविला. त्या दृष्टीने प्रयत्न केला व शेवटपर्यंत प्रयत्न करीत राहू. परंतु जेव्हा आपण आपल्या देशात एकजुटीने आगेकूच करू, तेव्हाच आपल्याला काही भरीव कामगिरी करता येईल.

युद्धाची चर्चा सर्वंत्र जगभर चालू आहे. परंतु एका नवीन प्रकारच्या युद्धाकडे मी तुमचे लक्ष वेधू इच्छितो. हे युद्ध आज दक्षिण आफ्रिकेत चालू आहे. त्याचा आपल्या भारताशी थोडाफार संबंध आहे; कारण तेथील रहिवाशांनी जो मार्ग स्वीकारला आहे तो या देशातील एका महापुरुषाने आम्हाला शिकविला होता—असहकाराचा व सत्याग्रहाचा मार्ग. त्या ठिकाणी आज एक मोठी सैद्धांतिक लढाई चालू आहे. 'मानव तितुका एकच आहे की नाही ? माणसामाणसांत भेद आहे काय ? एका जातीने दुसऱ्या जातीला, एका रंगाच्या लोकांनी दुसऱ्या रंगाच्या लोकांना दडपून टाकावे काय ? हा मोठा प्रश्न तेथे उत्पन्न झाला आहे. हा लढा भारतीयांनी चालविलेला नाही. ते तर तेथे अगदी थोडे आहेत खुद्द तेथे राहाणाऱ्या, आफ्रिकी लोकांनीच महात्माजींच्या त्या मार्गावरून आगेकूच सुरू केली आहे. तेथील स्त्रीपुरुषांनी शांततेने हे काम चालविले आहे भारतातून तिकडे गेलेल्या लोकांचेही स्थानिक लोकांना या बाबतीत संपूर्ण सहकार्य आहे, याचा मला आनंद वाटतो तुम्ही सारे, नव्हे भारतातील प्रत्येकजण त्यांच्याकडे पाहील व त्यांच्याविषयी महानुभूती बाळगील, अशी माझी खात्री आहे. ही आमची कार्यपद्धती आहे. या पद्धतीने आम्ही आमचे स्वातंत्र्य मिळविले; आणि यापुढेही आपसातील बेबनाव व भांडणतंटे सोडवताना याच मार्गाने आपण जाऊ अशी मी आशा करतो.

आपण या सर्व गोष्टी लक्षात ठेवा. आजच्या प्रसंगी आपण पुन: एकदा अशी प्रतिज्ञा करू या की, "आम्ही या देशाला पुढे नेऊ". याचाच अर्थ असा की आम्ही स्वतःला पुढे नेऊ. अशा प्रकारे आपण भारताच्या या प्राचीन संस्कृतीला पुढे नेऊ आणि जगात शांतता स्थापन करण्याच्या कामी संपूर्ण सहकार्य देऊ. विशेषत: भारताच्या दारिद्र्याची प्रचंड समस्या सोडविण्यासाठी सारी शक्ती पणाला लावून आपण काम करू हे फार मोठे काम आहे. त्यामुळे ते पूर्ण करणे

वाममार्गीनो पैसा मिळविणारे लोक हा दुसरा धोका. जातीयवाद हा तिसरा धोका. जातीयवादाचा काय परिणाम होतो याचा इतका मोठा अनुभव आपल्याला आला असतानाही काही लोक मतिभ्रष्ट होऊन जातीयवादाची कास धरतात, त्या दृष्टिकोणातून विचार व कार्य करतात, ही किती विचित्र गोष्ट आहे. दुसऱ्या धर्माच्या लोकांचा अपमान करणे, त्यांना शिव्याशाप देणे ही मोठी अभिमानाची गोष्ट आहे, आणि त्या मार्गाने आपण आपल्या धर्माची उन्नती करू असे त्यांना वाटते.

नुकतीच, काही दिवसांपूर्वी एक घटना घडली. अलाहाबादच्या एका वृत्तपत्रात काही मजकूर छापून आला अगदी मूर्खपणाचा व असत्य असा तो मजकूर होता. तो वाचून कोणालाही रागच यावा. राग अशासाठी की असे लिहू शकणारा, इतका अडाणी माणूस आपल्या या भारतात आहे. बरे, त्याच्या त्या अडाणीपणाला काही लोकांनी काय उत्तर दिले? वस्तुत: एका माणसाने चूक केली होती, त्याबद्दल त्याला जी काही शिक्षा देता येईल ती दिली जावी एवढेच कोणीही म्हटले असते, परंतु त्या ऐवजी काही अडाणी लोकांनी असे जाहीर केले, की या घटनेबद्दल त्यांचा राग, निषेध व्यक्त करण्यासाठी ते 15 ऑगस्टच्या समारंभात भाग घेणार नाहीत. हे काय उत्तर झाले? कोणाही भारतीयाला कोणत्याही कारणास्तव असे म्हणता येईल काय? विचार करण्यासारखी गोष्ट आहे. या समारंभात सामील होण्याची काही कोणावर सक्ती नवते परंतु ज्यायोगे भारताच्या स्वातंत्र्याला डाग लागेल, या झेंड्याची शान कमी होईल, आजच्या शुभ दिवशी अशुभ प्रदर्शन केल्यासारखे होईल अशी गोष्ट करणे अगदी अयोग्य आहे. ती करणाऱ्याच्या अंत:करणाला कोणत्याही गोष्टीबद्दल कितीही दु:ख झालेले असले तरी असे करणे कोणालाही शोभत नाही. आपण हे विसरता कामा नये की आपण सगळे मिळून पुढे जात असतो; आणि कोट्यावधी लोकांमध्ये हजारो वाईट माणसे, चुकीच्या मार्गाने जाणारी माणसे, अडाणी माणसे असणारच त्यांच्या एका चुकीखातर जर आपण आपला मार्ग सोडून दिला तर सारा देशच कुठल्या कुठे वाहवत जाईल.

44152

तर त्याने आपल्या आचरणाने आपण आपल्या शेजाऱ्याच्या धर्माचा मान ठेवतो हे दाखवून दिले पाहिजे. ही आहे भारताची हजारो वर्षांपासून चालत आलेली संस्कृती. आजकाल काही अज्ञाणी लोक सांगतात त्याप्रमाणे द्वेषावर, भांडणांवर आधारलेली संस्कृती ही भारतीय संस्कृती नव्हे. शिवाय तुम्ही आजकालच्या युद्धग्रस्त जगाकडे पाहा. जिकडे तिकडे लढाईची चर्चा व लढाईची तयारी. मोठी विचित्र परिस्थिती आहे. कोणत्या वेळी हे संकट जगावर कोसळेल आणि निम्मे जग नेस्तनाबूत होईल, काही सांगता येत नाही. आपला देश दुबळा आहे. आम्ही शांततेच्या बाजूने आवाज उठविला. त्या दृष्टीने प्रयत्न केला व शेवटपर्यंत प्रयत्न करीत राहू परंतु जेव्हा आपण आपल्या देशात एकजुटीने आगेकूच करू, तेव्हाच आपल्याला काही भरीव कामगिरी करता येईल.

युद्धाची चर्चा सर्वत्र जगभर चालू आहे. परंतु एका नवीन प्रकारच्या युद्धाकडे मी तुमचे लक्ष वेधू इच्छितो. हे युद्ध आज दक्षिण आफ्रिकेत चालू आहे. त्याचा आपल्या भारताशी थोडाफार संबंध आहे; कारण तेथील रहिवाशांनी जो मार्ग स्वीकारला आहे तो या देशातील एका महापुरुषाने आम्हाला शिकविला होता—असहकाराचा व सत्याग्रहाचा मार्ग. त्या ठिकाणी आज एक मोठी सैद्धांतिक लढाई चालू आहे. 'मानव तितुका एकच आहे' की नाही? माणसामाणसांत भेद आहे काय? एका जातीने दुसऱ्या जातीला, एका रंगाच्या लोकांनी दुसऱ्या रंगाच्या लोकांना दडपून टाकावे काय? हा मोठा प्रश्न तेथे उत्पन्न झाला आहे. हा लढा भारतीयांनी चालविलेला नाही. ते तर तेथे अगदी थोडे आहेत खुद्द तेथे राहाणाऱ्या, आफ्रिकी लोकांनीच महात्माजींच्या त्या मार्गावरून आगेकूच सुरू केली आहे. तेथील स्त्रीपुरुषांनी शांततेने हे काम चालविले आहे भारतातून तिकडे गेलेल्या लोकांचेही स्थानिक लोकांना या बाबतीत संपूर्ण सहकार्य आहे, याचा मला आनंद वाटतो. तुम्ही सारे, नव्हे भारतातील प्रत्येकजण त्याच्याकडे पाहील व त्याच्याविषयी सहानुभूती बाळगील, अशी माझी खात्री आहे. ही आमची कार्यपद्धती आहे. या पद्धतीने आम्ही आमचे स्वातंत्र्य मिळविले; आणि यापुढेही आपसातील वेबनाव व भांडणतंटे सोडवताना याच मार्गाने आपण जाऊ अशी मी आशा करतो.

आपण या सर्व गोष्टी लक्षात ठेवा. आजच्या प्रसंगी आपण पुनः एकदा अशी प्रतिज्ञा करू या की, "आम्ही या देशाला पुढे नेऊ". याचाच अर्थ असा की आम्ही स्वतःला पुढे नेऊ अशा प्रकारे आपण भारताच्या या प्राचीन संस्कृतीला पुढे नेऊ आणि जगात शांतता स्थापन करण्याच्या कामी संपूर्ण सहकार्य देऊ. विशेषतः भारताच्या दारिद्र्याची प्रचंड समस्या सोडविण्यासाठी सारी शक्ती पणाला लावून आपण काम करू. हे फार मोठे काम आहे. त्यामुळे ते पूर्ण करणे

आपल्याला जाय होणार नाही, हे खरे, परंतु जेवढे काही या काळात करता येईल तेवढे तरी अवश्य करू. नंतर हे काम पुढे चालविण्यासाठी आणखी नवजवान पुढे येतील.

म्हणून या वेळी मला तुम्हांला एवढेच मांगावयाचे आहे की आजच्या या प्रसंगी आपण जरा आपली मने साफ करून विचार करू या. आपल्यात काय दोष आहेत ते पाहू या, इतराच्या दोषांकडे आपण पाहू नये, त्याच्यावर टीका करीत बसू नये. स्वतःकडे पाहावे. प्रत्येकजण आपापले कर्तव्य करील तर जग पुष्कळच पुढे जाईल. परंतु इतराच्या कामावर टीका करणे, त्याची निंदा करणे हा जणू आमचा धंदाच झाला आहे. आपण दुसरे काही काम करीत असू किंवा नसू, आमच्यापैकी प्रत्येकाला स्वतःच्या कामाची फिकीर नसते, तर दुसऱ्याच्या, शेजाऱ्याच्या कामाची काळजी असते. त्यामुळे तो शेजारीही काम करू शकत नाही व आपणही करू शकत नाही. म्हणून आपण एकदिलाने काम केले पाहिजे आपण आपल्या सैन्याकडून धडा घेऊ सैन्य हे एका विशिष्ट कामासाठी, देशाची सेवा करण्यासाठी असते. त्यात शिस्त असते. ही शिस्त शिकविली जाते. आपल्या सैन्यात आपल्या देशातील प्रत्येक प्रांताचे लोक आहेत. आपल्या आरमारात, विमानदलात प्रत्येक प्रांताचे व प्रत्येक धर्माचे लोक आहेत. सगळे मिळून धैर्याने, शौर्याने काम करतात, आपसात भांडत नाहीत. आमचे सैन्य म्हणजे भारतीय ऐक्याचा नमुना आहे. अशा प्रकारचे ऐक्य व लष्करी शिस्त देशातील कोट्यवधी लोकांमध्ये आपल्याला निर्माण करावयाची आहे भारताची मोठी कामे करण्याच्या उद्देशाने आपण सुरुवात केली पाहिजे व कामाचा आपापला वाटा उचलला पाहिजे. केवळ इतराच्या, अथवा सरकारच्या भरवशावरच आपण राहू नये. तरच या देशापुढील मोठी कामे पार पडतील. पुन: एकदा तुम्हाला आजचा दिवस सुखाचा होवो. स्वतंत्र भारताचा आजचा हा पाचवा वाढदिवस तुम्हाला व आम्हाला लखलाभ होवो. अर्थात हे महत्कार्य आपण हाती घेतले आणि येत्या वर्षी जोरात काम केले तरच तो सुखाचा ठरणार

या ! माझ्या बरोबर जरा जोराने 'जय हिंद' ची घोषणा तीनदा करा.

जय हिंद !

जरा जोरात म्हणा—जय हिंद !

पुन: एकदा—जय हिंद !

1952

# भेदभावनेच्या भिंती पाडून टाकू या

आज स्वतंत्र भारताचा—म्हणजेच तुमचा, आमचा, सर्वांचा, सहावा वाढदिवस आहे. आपणा सर्वांचा जो पुनर्जन्म झाला होता, त्याचा हा सहावा वाढदिवस आहे. हा दिवस तुम्हाला लखलाभ होवो, देशाला लखलाभ होवो. आजच्या प्रसंगी प्रथम आपण त्या महापुरुषाचे स्मरण करू, ज्याच्यामुळे भारत स्वतंत्र झाला, ज्याने एका कोमेजलेल्या राष्ट्रात प्राण ओतले, ज्याने पुष्कळ अंशी प्राचीन असलेल्या या देशाला फिरून नवीन बनविले. म्हणून आज त्याचे, गांधीजींचे, स्मरण करणे हे आपले आद्य कर्तव्य आहे. पण गांधीजींचे स्मरण म्हणजे काय? ते एक महापुरुष होते. ते येथे, या देशात जन्मले आणि जगात चमकून निघून गेले. परंतु महापुरुषांची स्मृती म्हणजे काय? त्यांनी ज्या गोष्टी आम्हाला सांगितल्या, जी शिकवण दिली, जे आदेश दिले तीच त्यांची स्मृती. त्यांच्या जीवनापासून आपण काय बोध घेतला? त्यांचे सिद्धांत काय होते? ज्यांचे अनुसरण करून हा देश समर्थ बनला आणि स्वतंत्र झाला, त्या मूलभूत गोष्टी कोणत्या होत्या त्यांचे स्मरण आज आपण केले पाहिजे. कारण त्या मूलभूत गोष्टींची आठवण आपण ठेवली नाही तर आपण दुर्बळ बनू आणि जी कामे आपल्याला करावयाची आहेत ती करता येणार नाहीत. आपल्या देशाचा इतिहास हजारो वर्षांचा आहे या हजारो वर्षांच्या अवधीत आपल्या देशाने खूप उच्च स्थान मिळविले आणि वारंवार ठेचा खाऊन तो खालीही पडला. कोणत्या गोष्टीने आपल्या देशाला समर्थ बनविले आणि कोणत्या गोष्टीने दुर्बळ केले, ते आपण लक्षात ठेवले पाहिजे. म्हणून त्या मूलभूत गोष्टी कोणत्या, याचा तुम्ही विचार करा. या वेळी आपले ध्येय कोणते आहे? आपण कोणीकडे चाललो आहोत? कोणत्या मार्गाने आपल्याला जावयाचे आहे? आपण आपल्या सिद्धांतांचे स्मरण सतत ठेवले पाहिजे; कारण चुकीच्या मार्गाने जाऊन कोणी मुक्कामावर पोहचत नसतो. चुकीची गोष्ट करणाऱ्याला चांगले फळ मिळत नसते. ही एक मूलभूत गोष्ट आहे. तिचा विसर आपल्याला पडला तर सारे काम बिघडून जाईल. चांगल्या कार्यांचे फळ आपण पाहिलेले आहे.

सहा वर्षांपूर्वी जेव्हा स्वातंत्र्य आले तेव्हा याच ठिकाणी उभे राहून मी हा झेंडा फडकविला होता. स्वातंत्र्य आले, त्या वेळी आपण आनंदोत्सव साजरा करीत असतानाच एक मोठी आपत्ती आपल्यावर आली. पाकिस्तानात व हिंदुस्थानातील काही प्रांतात ही आपत्ती उद्भवली. तिचा परिणाम म्हणून लाखो आपद्ग्रस्त लोक इकडून तिकडे गेले व तिकडून इकडे आले. त्या वाईट गोष्टींचा

दुष्कृत्यांचा परिणाम आपण आज भोगत आहोत. अशी कोणतीही वाईट गोष्ट नाही की जिचा परिणाम वाईट होत नाही. त्याचप्रमाणे जिचा परिणाम चांगला होत नाही अशी एकही चांगली गोष्ट नाही. म्हणून आपण शांत चित्ताने विचार केला पाहिजे. आपल्यासमोर खूप मोठमोठी कामे आहेत या देशाची, 36 कोटी जनतेच्या देशाची उन्नती करणे, 36 कोटी लोकांचे जीवन सुधारणे, त्यांची दुःखे दूर करणे, ही सारी मोठी कामे आहेत. हजारो वर्षांच्या जुन्या देशाला नवीन बनवावयाचे आहे. आपण कोठे चाललो आहोत, या वेळी आपले कर्तव्य काय, याचा आपण विचार केला पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे आपण आपल्या स्वातंत्र्याचे रक्षण केले पाहिजे. दुसरी गोष्ट अशी की जगातील इतर देशांशी आपण मैत्री केली पाहिजे आणि त्यांच्या सहकार्याने चालले पाहिजे. दुसऱ्या देशाच्या कारभारात आपण ढवळाढवळ करू नये; आणि आपल्या देशाच्या बाबतीतही इतरांना अनुचित हस्तक्षेप करू देऊ नये. अशा प्रकारे आपल्याला आपल्या मार्गाने जावयाचे आहे. तिसरी गोष्ट फार मोठी व महत्त्वाची आहे. ती अशी की आपण आपल्या देशात काय करावे? हे एवढे मोठे कुटुंब आपण कसे सांभाळावे? छत्तीस कोटी माणसांचे हे कुटुंब कसे चालवावे? कुटुंबे कशी चालतात? आपसात भांडून, झगडून, मध्ये भिंती उभ्या करून? या देशात एकमेकांना एकमेकांपासून दूर करणारी जी भिंत आहे ती आपण पाडून टाकली पाहिजे, नाहीशी केली पाहिजे. येथील जातीयवाद नाहीसा केला पाहिजे; कारण तो देशाला कमकुवत बनवितो, देशाच्या मोठ्या कुटुंबाची फाटाफूट करतो, लोकांना एकमेकांचे शत्रू बनवितो आणि आम्हाला खाली पाहावयास लावतो. आपण प्रांतीयताही सोडून दिली पाहिजे. आपण सवतासुभा उभारून प्रांताचे महत्त्व वाढवू लागलो तर देशाचे महत्त्व कमी होते. आपण देशहिताला सर्वश्रेष्ठ स्थान दिले पाहिजे. देश मोठा झाला तर आपण सारे मोठे होऊ, आणि देश मोठा झाला नाही तर कोणीच मोठे होणार नाही—मग आपला प्रांत किंवा जिल्हा कितीही पुढे किंवा मागे असेना का—ही गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे. तिसरी गोष्ट म्हणजे जातीयतेची भिंत ही जुनी गोष्ट आहे, जुना रोग आहे. ही जातीयता आपल्याला वेगवेगळ्या कप्प्यात ठेवून ठेवते, दुर्बळ बनविते व देशाची ऐक्यभावना कमी करते.

हे सारे नाहीसे केले तरच आपण पुढे जाऊ. देशातील कोट्यावधी लोकांना दारिद्र्यापासून मुक्त करावयाचे आहे, आणि बेकारी नाहीशी करावयाची आहे. ही सगळी मोठी कामे आहेत. व्यक्तीप्रमाणे देशाचे सामर्थ्यही केवळ लांब्यारुंद्या बातावरून सिद्ध होत नसते. त्याची आर्थिक शक्ती, चारित्र्य व त्याच्या नागरिकांतील ऐक्यभावना यावरून ते सिद्ध होते. आपण राष्ट्रीय,

स्वातंत्र्य मिळविले. आपल्याला एक प्रकारचे स्वराज्य मिळाले, परंतु ते स्वराज्य अपूर्ण आहे. हे स्वराज्य जेव्हा प्रत्येक व्यक्तीपर्यंत जाऊन पोचेल आणि प्रत्येकाची आर्थिक स्थिती सुधारेल तेव्हाच ते पूर्ण होईल. म्हणून भारतातील दारिद्र्य व बेकारी नष्ट करण्याचे हे मोठे कार्य आपण हाती घेतलेले आहे. प्रत्येकाला काम मिळाले पाहिजे. प्रत्येक स्त्रीपुरुषाने काम करून देशासाठी व स्वतःसाठी संपत्ती निर्माण केली पाहिजे. यानेच आपले सामर्थ्य वाढेल.

जागतिक शांततेसाठी आपल्या शक्तीप्रमाणे प्रयत्न करीत राहाणे हे आपले काम आहे. जगात शांतता नांदावी, युद्धे होऊ नयेत, या दृष्टीने आपण आजपर्यंत धडपड केली. जगाच्या राजकारणात आपला देश काही फार मोठा, महत्त्वाचा भाग घेत नाही, तो घेण्याची आमची इच्छाही नाही. आम्हाला आधी आमचे घर सांभाळावयाचे आहे, व्यवस्थित करावयाचे आहे. तरीपण जे काही थोडे-फार आम्हाला करता आले ते आम्ही केले. त्याची कदर झाली आणि कदर झाल्यामुळे आमच्यावरील जबाबदारीही वाढली. तुम्हाला माहीत आहे की या वेळी आपले काही सैन्य, आपल्या काही पलटणी भारताबाहेर, हजारो मैल दूर कोरियाकडे चालल्या आहेत. हे सैन्य का चालले आहे ? सामान्यतः सैन्ये ही एका देशातून दुसऱ्या देशात लढाईसाठी जात असतात. परंतु आमचे सैन्य लढाईसाठी नव्हे, तर शांततेसाठी जात आहे. इतरांनी बोलावल्यामुळे आपले सैन्य चालले आहे. जे देश आपसात लढत होते ते एका वार्तेत सहमत झाले की भारताला बोलवावे. भारतीय सैन्याला बोलावून त्याच्याकडे काही काम सोपवावे. देशाच्या बाहेर इतरत्र आपण काही जबाबदाऱ्या घ्याव्यात अशी आमची इच्छा नाही. परंतु जेव्हा असे एखादे कर्तव्य येऊन पडते तेव्हा ते आम्हांला पार पाडावे लागते. म्हणून या वेळी आपले सैन्य तिकडे चालले आहे. युद्धाचे जे वातावरण सर्वत्र पसरलेले होते ते आता काही तरी बदलेल की नाही याविषयी जगात पुनः चर्चा सुरू झालेली आहे. ते बदलावे म्हणून प्रयत्न चालू आहेत. परंतु अजूनही काही लोक धमकीच्या स्वरात, भीतीच्या स्वरात बोलत आहेत, हे पाहून मला दुःख होते. जगात मैत्री असावी, मिलाफ असावा असे आपल्याला वाटत असेल तर एकमेकांना धमक्या देऊन, भीती दाखवून ते शक्य होणार नाही. निर्भयपणाने हात पुढे करून मैत्री करावयाची असते; धमकी देऊन नव्हे. म्हणून आता पुनः तडजोडीची बोलणी चालू झाली आहेत. जे देश यात सामील आहेत त्यांनी आपली मनेंही तडजोडीला अनुकूल बनवावीत हे बरे. केवळ बोलण्याने काम होत नसते. ही आपली बाहेरची कर्तव्ये आहेत. ती आम्ही पार पाडीत आहोत. देशातील दारिद्र्य नाहीसे करून आर्थिक स्थिती सुधारणे हे आपले अंतर्गत कर्तव्य आहे. हे सर्वांत मोठे

काम आहे. या महा वर्षांच्या काळात भारतामध्ये अनेक मोठमोठी कामे झाली आणि जेव्हा या सहा वर्षांचा इतिहास लिहिला जाईल तेव्हा या अवधीत काय-काय झाले व काय-काय झाले नाही याची सविस्तर चर्चा त्यात असेल, असे मी मानतो. परंतु त्याचबरोबर हेही खरे आहे की ज्या पुष्कळशा गोष्टी आपण कर इच्छित होतो त्या झाल्येल्या नाहीत. काम खूप मोठे आहे आणि ते करणारी मंडळी कधी-कधी फार लहान वाटतात. परंतु तुम्ही सारेजण कामाला लागलात तर ते कामही हलके होईल. देशातील सारे लोक ते ओझे उचलतील तर देशाचे ओझेही हलके होईल.

एका आठवड्यापूर्वी काश्मीरात काही घटना घडल्या. त्यामुळे आपल्या शेजारच्या देशात, पाकिस्तानात खूप खळबळ माजली आहे. त्या घटनासंबंधी मी तुम्हाला अधिक काही सांगू इच्छित नाही, कारण ते सांगायची ही वेळ नाही परंतु मी तुम्हाला एवढेच सांगू इच्छितो की तुम्ही जरा सावध राहा. खोट्या बातम्यांवर विश्वास ठेवू नका, खोट्या अफवा ऐकू नका, किती खोट्या गोष्टी पसरतात! गेल्या काही दिवसातील पाकिस्तानी वृत्तपत्रे मी वाचली आणि काश्मीरसंबंधी त्यांत किती चुकीच्या बातम्या आल्या आहेत; आमच्या सैन्याने तेथे काय केले यासंबंधी त्यांनी जे काही छापले आहे ते पाहून मी तर थक्कच झालो. मी तुम्हाला खात्रीपूर्वक सांगतो, ठामपणे सांगतो की आपल्या सैन्याने त्या घटनेत काहीही भाग घेतलेला नाही. तर मग या साऱ्या खोट्या प्रचाराचा अर्थ काय? फक्त पाकिस्तानातील, नव्हे तर परदेशातील इतर पत्रकारांनीही या गोष्टी छापल्या आहेत अशा प्रकारे निष्कारण खोट्या गोष्टी पसरविणे हे अयोग्य आहे देशा-देशात वैमनस्य वाढावे म्हणून लोकांना निष्कारण भडकावून देणे बरे नव्हे.

अलीकडे काश्मीरमध्ये ज्या काही घटना घडल्या, त्यांचे मला दुःख वाटते. एका जुन्या सहकाऱ्यापासुन; सहप्रवाशापासून वेगळे होणे, ही दुःखाची गोष्ट आहे. म्हणून माझे तुम्हाला असे सांगणे आहे की अशा प्रसंगी कोणाला दोष देणे बरे नव्हे, योग्य नव्हे. कारण आपल्या एका जुन्या सहकाऱ्याविषयी वाईट बोलावयाचे म्हणजे ते उलटून आपल्यालाच लागणार. अशा घटनांनी दुःख होते; परंतु, कधी-कधी कितीही दुःख झाले तरी आपले कर्तव्य पार पाडावेच लागते. मात्र ते कर्तव्य प्रतिष्ठेच्या मर्यादा सांभाळून, योग्य मार्गाने जाऊन करावे. अनुचितपणे करू नये. तसे करताना आपण आपल्या सिद्धांताचेही स्मरण ठेवावे. मी तुम्हाला सांगितले की, काश्मीरात अशा पुष्कळ गोष्टी घडल्या की ज्यामुळे त्रास झाला. त्याच्या मागेही एक इतिहास आहे. त्याच्या मागे अशा काही घटना आहेत की ज्यांनी काश्मीरी लोकांना भडकाविले. जातीयवादाच्या त्या घटना तुमच्या

या दिल्ली शहरातही घडल्या होत्या, पंजाबातही घडल्या होत्या व इतरत्रही घडल्या होत्या. मोठी विचित्र गोष्ट होती. जे साध्य करण्यासाठी हे सारे घडवून आणण्यात आले त्याच्या उलटच परिणाम झाला. यावरून तुमच्या लक्षात येईल की तुमचा हेतू काहीही असला, तुम्ही कोणत्याही ध्येयाकडे जाऊ इच्छित असला तरी तुम्ही चुकीच्या मार्गाने गेलात तर त्याचा परिणाम वाईटच होतो.

असो. मी तुम्हाला काश्मीरसंबंधी सांगत होतो. आज नव्हे, तर अनेक वर्षांपूर्वी जी गोष्ट मी सांगितली होती तीच आज पुन: सांगू इच्छितो. त्या वेळी आम्ही असे अभिवचन दिले होते की काश्मीरचे भवितव्य ठरविण्याचा हक्क काश्मीरच्या लोकांनाच आहे. त्यानंतरही आम्ही या अभिवचनाचा पुनरुच्चार केला आहे, आणि आजही आमच्या दृष्टीने ही गोष्ट अगदी नक्की आहे की काश्मीरचा जो काही निर्णय शेवटी होईल तो तेथील लोकच करतील. तेथे किंवा अन्यत्र कोठेही जुलूम जबरदस्तीने, बळजबरीने कोणताही निर्णय घेतला जाता कामा नये. गेल्या आठवड्यात काश्मीरमध्ये एक नवे सरकार स्थापन झाले. ते घाईने स्थापन झाले. परंतु जोपर्यंत ते काश्मीरी जनतेचे प्रतिनिधित्व करील तोपर्यंतच ते अधिकारावर राहील हे उघड आहे. अर्थात या वेळी तेथे निवडून आलेले जे कायदेमंडळ आहे त्याने या सरकारला मान्यता दिली तर ठीकच आहे; त्याने मान्यता दिली नाही तर तेथील घटना परिषद दुसरे सरकार बनवील. आपले जे सिद्धांत भारतासाठी आहेत तेच भारताच्या प्रत्येक विभागासाठी आहेत. तेच काश्मीरलाही लागू आहेत. काश्मीरमध्ये अकस्मात हे जे काही घडले त्यामुळे तुम्हाला व इतरांनाही आश्चर्य वाटणे साहजिक आहे; कारण त्याच्या मागचा सारा जुना इतिहास तुम्हाला माहीत नाही. परंतु या बाबतीत पराचा कावळा करण्यात आलेला आहे. खोटानाटा प्रचार करण्यात येत आहे. इतर देशांत, विशेषत: आपल्या शेजारच्या पाकिस्तानात या बाबतीत खूपच गडबड माजली आहे. त्या ठिकाणी जे मनोदर्शन व असंतोषाचे प्रदर्शन करण्यात आले आहे त्याला वस्तुस्थितीचा काही आधार नाही. असो. या ठिकाणी मी कोणावर टीका करण्यासाठी उभा नाही. मला फक्त मुद्दा स्पष्ट करावयाचा आहे. आपण इतक्या सहजासहजी गडबडून गेलो, विचलित झालो, किंवा घाबरलो तर मोठ्या समस्या कधीच सुटणार नाहीत. त्या आपल्याला सोडणारही नाहीत. मी तुम्हाला सावधगिरीचा इशारा देऊ इच्छितो. आज ना उद्या, उद्या ना परवा, आपल्यासमोर, जगासमोर हजारो मोठमोठे प्रश्न येतील. त्या वेळी तुमची, आमची, आपल्या देशाची कसोटी लागेल. आपण धैर्याने, आत्मविश्वासपूर्वक त्यांना तोंड देणार की घाबरून, गडबडून जाऊन धावाधाव करणार

हे त्या वेळी ठरेल. अशा प्रकारे प्रत्येक देशाची परीक्षा होत असते. प्रश्न जितका अधिक अवघड असेल तितके अधिक थंड डोके असले पाहिजे, तितक्याच अधिक शांतपणाने आपण काम केले पाहिजे. काश्मीरच्या बाबतीत काश्मीरचे लोकच निर्णय करतील हा मूलभूत सिद्धांत एकदा आपण मान्य केल्यानंतर वाद-विवाद कसला करावयाचा ? अर्थात हे कसे घडवून आणावयाचे, कोणत्या पद्धतीचा वापर करावयाचा, याविषयी चर्चा होऊ शकेल. पण सिद्धांताविषयी चर्चा होऊ शकणार नाही. काश्मीरचा प्रश्न आमच्यासमोर आला तेव्हापासून आम्ही हेच सांगत आलो आहोत. दुसरी गोष्ट अशी की भारतात काश्मीरचे एक विशेष स्थान आहे. भारताच्या कुटुंबात काश्मीर आले, ही आनंदाची गोष्ट आहे. अभिनंदन. परंतु येथे त्याला एक विशेष स्थान देण्यात आलेले आहे. इतरांना तसे स्थान नाही; कारण भौगोलिक व इतर कारणामुळे त्याला हे स्थान देण्यात आलेले आहे. जे लोक अडाणीपणाने काश्मीरचे स्थानही इतर राज्यांसारखेच असले पाहिजे, अशी आरडाओरड करतात त्यांना परिस्थिती कळत नाही अथवा घटनाही समजत नाहीत, असे म्हणावे लागते. त्यांच्या आरडाओरडीचा परिणाम उलटाच झाल्याचे त्यांना दिसून आले असेल.

पाकिस्तानविषयी मी तुम्हाला आताच सांगितले. काही दिवसांपूर्वी त्यांच्या निमंत्रणावरून मी पाकिस्तानला गेलो होतो. त्या वेळी तेथील सरकारने व जनतेने अत्यंत प्रेमाने माझे स्वागत केले होते. माझ्या अंतःकरणावर त्याचा विशेषतः जनतेच्या प्रेमाचा फार परिणाम झाला. भारतामध्ये तुम्ही मंडळी —बंधुभगिनी व मुले—माझ्यावर प्रेमाचा जसा वर्षाव करता, जवळ जवळ तसेच दृश्य मी कराची शहरात पाहिले. मला वाटले, "मी खरोखरीच एखाद्या परक्या देशात आलो आहे काय? यात आणि आमच्या देशात असा काय मोठासा फरक आहे ? पुष्कळसे तेच जुने चेहरे, पुष्कळसे जुने मित्र, जुने सहकारी येथे पाहिलेले व येथून पळून गेलेले पुष्कळसे लोक तेथे होते. इथलेच चित्र, तेथे होते. फार थोडा फरक होता। सांगावयाचे तात्पर्य हे की आपण एखाद्या परक्या देशात आहोत असे मला वाटलेच नाही. ते एक चित्र होते. त्यानंतर थोड्याच दिवसांनी—कदाचित गैरसमजामुळेही असेल—लोकांचे चित्त गढूळले व चित्र बदलले. यावरून लोकांशी आपण कसे वागतो यावर त्यांचे वागणे अवलंबून असते, ही गोष्ट तुमच्या लक्षात येईल. आम्ही शांत मार्गाने जाऊ, आम्ही इतर देशांशी मैत्री करू, आम्ही पाकिस्तानशीही मैत्रीचे संबंध ठेवू, या आपल्या सिद्धांतापासून तुम्ही-आम्ही ढळता कामा नये. तेथे कितीही गैरसमज पसरो अथवा लोक खवळोत आपण जर योग्य मार्गाने चालत राहिलो तर त्यांचा क्रोधही शांत होईल. कारण पाकिस्तानचे लोक व भारताचे लोक नेहमीच

आपसांत भांडत राहिले, एकमेकांचा द्वेष करीत राहिले, त्याच्यांत तणातणी चालत राहिली तर त्यापासून भारताचा किंवा पाकिस्तानचा काहीही फायदा होणार नाही. द्वेषाचा व भीतीचा परिणाम कधीच चांगला होत नाही. म्हणून तुम्ही भयाला आपला माथी बनवू नका. फार वाईट माथी आहे तो. काही दिवसांनी,—नव्हे उद्याच आमच्या निमंत्रणावरून पाकिस्तानचे पंतप्रधान दिल्लीला येणार आहेत. जसा मी त्यांच्या निमंत्रणावरून कराचीला गेलो होतो तसे ते येत आहेत. म्हणून दिल्लीच्या रहिवाशांनी, या प्राचीन ऐतिहासिक नगरीच्या नागरिकांनी त्यांचे थाटात स्वागत करावे, आणि आपले हृदय किती मोठे आहे त्यांना पाकिस्तानविषयीही किती स्नेह आहे हे दाखवून द्यावे. त्यांच्या येथील मुक्कामात याच लाल किल्ल्यामध्ये दिल्लीच्या नागरिकांतर्फे बहुधा त्यांचे स्वागत करण्यात येईल. इतरत्रही त्यांचे स्वागत होईल.

आजच्या प्रसंगी तुम्ही, आम्ही व साऱ्या देशाने आपल्या या महान सिद्धांतांचे स्मरण ठेवावे, अशी माझी इच्छा आहे. आपण महात्माजींचे स्मरण करावे. आपल्याला जे यश मिळाले आहे त्याच्यासंबंधी तर विचार करावाच परंतु मुख्यतः जे अपयश आले आहे, गेल्या पाच-सहा वर्षांत आपल्या हातून ज्या चुका झाल्या आहेत त्यांचेही स्मरण करावे. कारण त्यापासून आपल्याला धडा शिकता येईल. आपल्या या प्रिय ध्वजाच्या साक्षीने आपण पुन: अशी प्रतिज्ञा करू या की आम्ही या भारताची सेवा करू, एकोपा ठेवू, त्यात असलेल्या विभिन्न धर्मामध्ये ऐक्य व मिलाप स्थापन करू—कारण भारतात सगळे समान आहेत—, देशातून प्रांतीयता घालवून देऊ, जातीयतेच्या व प्रांतीयतेच्या साऱ्या भिंती नष्ट करून टाकू, या देशाला मजबूत बनवू, आणि आमची शक्ती एकमेकांच्या विनाशासाठी न वापरता भारताच्या नवनिर्मितीसाठी वापरू. आम्ही जगातही शांतता राखण्याचा प्रयत्न करू. आम्हाला कोणाशी लढावयाचे नाही. आम्ही सर्वांशी मैत्री करू.

एक युद्ध आपल्याला करावयाचे आहे. ते आपण सारे एकजुटीने मन लावून करू. ते युद्ध आहे भारतातील दारिद्र्याशी. दारिद्र्याची पाळेमुळे येथून खणून काढावयाची आहेत. खूप दिवस चालणारे युद्ध आहे हे. खूप परिश्रम करावे लागतील. घाम गाळावा लागेल. पण ती एक चांगली गोष्ट आहे. त्यायोगे आपल्याला कोट्यवधी भारतीयांची उन्नती करता येईल, त्यांची दु:खे दूर करता येतील. हे फार मोठे काम आहे. आपला पुढील टप्पा गोव आहे, जोपर्यंत आपण तेथे पोचत नाही तोपर्यंत आपल्याला आगेकूच चालू ठेवावयाची आहे. या सिद्धांताचे स्मरण तुम्ही ठेवा. आपण सारे एक दिशेने पुढे जाऊ. देशाची आगेकूच कधी समाप्त होत नाही. एवढ्यापासून

एक टप्पे येत असतात. देश पुढे जात असतो. कारण फक्त देशच अमर असतो तुम्ही-आम्ही येत असतो, जात असतो. भारत अमर आहे. तुमच्या-आमच्या डोळ्यादेखत त्याने प्रगती करावी, एवढीच आमची इच्छा आहे. आपणही त्याची काही सेवा करावी, त्याला पुढे न्यावे, आमच्या मुलाबाळांनी व नातवंडांनी या काळाचे स्मरण ठेवावे,—कित्येक वर्षांनंतर भारत स्वतंत्र झाला आणि आमच्या वाडवडिलांनी अत्यंत परिश्रम करून, धडपट करून आज आम्ही राहात असलेला नवा भारत बनविला, असे त्यांनी म्हणावे—एवढीच आमची इच्छा. जय हिंद !

माझ्या बरोबर तुम्हीही सगळे मिळून, जोरान म्हणा,

जय हिंद !
जय हिंद !
जय हिंद !

1953

# स्वराज्य हे काही अंतिम साध्य नव्हे

नवभारताचा जन्म झाला, आपण स्वतंत्र झालो, त्या गोष्टीला आज सात वर्षे झाली. नवभारताचा हा सातवा वाढदिवस तुम्हाला सुखाचा जावो. आपण दर वर्षी या ठिकाणी, लाल किल्ल्याच्या तटाखाली हा वाढदिवस साजरा करीत असतो; कारण हा वाढदिवस आपणा सर्वांचा आहे, कोटयवधी लोकांचा आहे; कारण या दिवशी भारतात एक नवे जीवन सुरू झाले. देशाने एका नव्या युगात पदार्पण केले भारताच्या इतिहासातही एक नवा अध्याय सुरू झाला. नवा भारत हे सात वर्षांचे एक बालक आहे या सात वर्षांत त्याने काय-काय केले? त्याची वाढ कशी काय झाली? तो कोणाकडे पाहातो? कोणीकडे जाणार तो?—हे मोठे प्रश्न तुमच्यासमोर आहेत तुम्ही आपल्या अंतःकरणात डोकावून पाहाल तर या वे ी भारतात एक नवे जीवन आलेले आहे, तुमच्यावर एक नवीन भार, जबाबदारी आलेली आहे, असे तुम्हाला दिसून येईल. भारताच्या हजारो-लाखो खेड्यापाड्यावर विजेसारखा एक नवा परिणाम झालेला आहे. पूर्वी झोपी गेलेले लोक जागे झाले आहेत, जे जुनाट होते, अडाणी होते तेही काम करू लागले आहेत आणि त्यांचे शरीर, मन व बुद्धी ही नव्या दिशेला झुकली आहेत. असे हे नव्या, आधुनिक भारताचे वातावरण आहे.

आपल्यासमोर पुष्कळ अडचणी आहेत, हे मला माहित आहे व तुम्हीही ते जाणता खूप चिंता आहेत. आपले पुष्कळ बांधव हालात दिवस काढीत आहेत. तरी पण आपण सारे मिळून या मोठ्या प्रवासामध्ये पुढे चाललो आहोत, हे आपल्याला माहीत आहे. सात वर्षांपूर्वी आपला देश स्वतंत्र झाला परंतु स्वराज्य म्हणजे काय? स्वराज्य हा काही प्रवासाचा शेवटचा मुक्काम नव्हे ते काही अंतिम ध्येय नव्हे. स्वराज्य मिळाले म्हणून आपण स्वस्थ बसता कामा नये. स्वराज्य, स्वातंत्र्य आले म्हणजे जबाबदारी संपत नाही ते तर त्या देशाच्या प्रगतीचे पहिले पाऊल असते—एका नव्या प्रवासातील पहिले पाऊल. कोणत्याही देशाचे स्वातंत्र्य हे स्वराज्याने कधी पूर्ण होत नाही; आणि जे राष्ट्र जिवंत असते, चैतन्यपूर्ण असते ते कधी थांबत नाही. ते पुढे-पुढेच जात असते. आपला देश राजकीय दृष्ट्या पूर्ण स्वतंत्र झाला आहे मात्र त्याचे काही लहान तुकडे अजून स्वतंत्र झालेले नाहीत. हे लहान तुकडे कधी कधी त्रास देतात, दुखतात; आणि ज्या वेळी आपला मोठा भूभाग परकीयांच्या गुलामीत होता त्या जुन्या जमान्याचे आम्हांला स्मरण करून देतात त्या लहान प्रदेशातून संघर्षाचे झगड्याचे आवाज ऐकू येतात परंतु आपण जसे राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झालो तसे बाकी राहिलेले हे एक-दोन तुकडेही नक्कीच स्वतंत्र होतील; कारण तसा भारताचा निश्चय आहे भारत जो निश्चय करतो त्याची पूर्तता भारतातील कोटयवधी

लोक घरतात. परंतु मी तुम्हांला सांगितल्याप्रमाणे भारताचे स्वातंत्र्य कोठे थावत नाही, अडत नाही, ते पुढेच जाते. स्वातंत्र्य म्हणजे काही केवळ राजकीय स्वातंत्र्य नव्हे. स्वातंत्र्याचे आणखीही अर्थ आहेत—सामाजिक स्वातंत्र्य आहे, आर्थिक स्वातंत्र्य आहे. देशात ,जर कोठे गरिबी असेल तर त्याचा अर्थ असा की तेथपर्यंत स्वातंत्र्य जाऊन पोचलेले नाही; कोणाला स्वातंत्र्य मिळालेले नाही, म्हणूनच ते दारिद्र्याच्या पाशात अडकलेले आहेत. जे लोक पाशात अडकलेले असतात त्यांचे स्वराज्य कसले? म्हणून जे लोक दारिद्र्यात खितपत पडले आहेत, ते पूर्णपणे स्वतंत्र झालेले नाहीत- त्यांना स्वतंत्र करावयाचे आहे. यचिप्रमाणे जर आपण आपसातील भांडणात अडकलेले असू, आमच्यात वैर असेल, भिंती असतील, आपण एकोप्याने राहात नसू तर आपण पूर्णपणे स्वतंत्र झालो नाही, असे म्हणावे लागेल.

भारताला पूर्णपणे स्वतंत्र व्हावयाचे असेल तर आपल्याला पुष्कळच गोष्टी कराव्या लागतील. भारताला आपल्या कोट्यवधी लोकांची बेकारी नाहीशी करावयाची आहे, दारिद्र्य नष्ट करावयाचे आहे. शिवाय लक्षात ठेवा की आपल्यामध्ये धर्माच्या नावाने, जातींच्या नावाने, प्रांताच्या नावाने ज्या भिंती उभ्या करण्यात आल्या आहेत त्याही आपल्याला नाहीशा करावयाच्या आहेत. एकमेकाविरुद्ध आपले जे पित खवळते त्यावरून आपली मने व बुद्धि ही पूर्णपणे स्वतंत्र झालेली नाहीत—मग वरून कितीही बदल झालेला असेना का—ही गोष्ट स्पष्ट होते. अशाच प्रकारच्या अनेक गोष्टींतून आपली संकुचित मनोवृत्ती दिसून येते. भारतातील एखाद्या गावात कोणत्याही भारतीयाला—मग तो चांभार असो, हरिजन असो अथवा कोणत्याही जातीचा असो—खाण्यापिण्याच्या, राहाण्या-वागण्याच्या बाबतीत स्वातंत्र्य नसेल अडथळे असतील तर तो गाव अजून स्वतंत्र झालेला नाही, अपरिचित आहे, असेच म्हणावे लागेल.

आपल्याला या देशातील प्रत्येक व्यक्तीला स्वतंत्र करावयाचे आहे. देशाचे स्वातंत्र्य हे काही मूठभर लोकांच्या संपत्तेवरून ठरत नसते. देशाचे स्वातंत्र्य हे आम जनतेची राहणी कशी आहे, सर्वसामान्य लोकांना आपली प्रगती, विकास करून घेण्याची संधी कितपत मिळते, सामान्य लोकांना काय आराम व काय सुख आहे, यावरून ठरत असते. याचा अर्थ असा की आपण अजून स्वातंत्र्याच्या मार्गावरून वाटचाल करीत आहोत, आपले ध्येय साध्य झालेले नाही, आपण मुक्काम गाठलेला नाही सतत पुढे जाणाऱ्या एका चैतन्यमय देशाचे ध्येय अजून पूर्णपणे साध्य झालेले नाही. आपल्याला प्रगती करावयाची आहे, पुढे जावयाचे आहे, जगाला पुढे न्यावयाचे आहे. अलीकडे आपल्या देशात परिवर्तन झाले. तुमचे-आमचे पुनरुज्जीवन झाले. जगामध्ये अशीच शांती होत असते. बच्चा, वाईट, नाना प्रकारच्या गोष्टी

असतात. त्यांच्यात बदल होत असतो. गेल्या काही वर्षात आपल्या या महान आशिया खंडात काय-काय घडले, काय-काय घडते आहे? त्याच्यावर शेकडो वर्षे दडपण होते. शेकडो वर्षे त्याच्यावर परक्यांनी राज्य केले. ती परकीय सत्ता नाहीशी झाली आणि काही ठिकाणी ती अजून टिकून राहिली आहे.

या स्थितीची तुम्ही जरा भारताशी तुलना करून पाहा. भारत स्वतंत्र झाल्याला सात वर्षे झाली. आपला शेजारी जो ब्रम्हदेश तेथे तडजोडीने, मैत्रीने हा प्रश्न सोडविण्यात आला. ते देश स्वतंत्र झाले. जे राष्ट्र येथे राज्य करीत होते ते येथून निघून गेले. परकीय सत्ता गेली. आमचे शत्रुत्व इंग्रजांशी नव्हते, त्याच्या सैन्याशी नव्हते, अथवा त्याच्या देशाशीही नव्हते. आमचे भांडण त्याच्या सत्तेशी होते. ती सत्ता येथून गेली तेव्हा आमचे त्याच्याशी काही भांडण राहिले नाही, उलट त्याच्याशी आमची मैत्री झाली. हिंदुस्तान व ब्रम्हदेश यांच्याप्रमाणे आशियातील इतर काही भागावर, काही देशात परकीय सत्ता होती. परंतु त्या वेळी त्याच्या बाबतीत तड-जोडीचा हा मार्ग स्वीकारण्याचे शहाणपण त्यांना सुचले नाही. त्याचा परिणाम काय झाला? सात वर्षे लढाई, सात वर्षे लक्षावधी माणसांचा नाश. आशियातील व युरोपातील देशांची अगदी दुर्दशा झाली आणि जग एका मोठ्या युद्धाच्या तोंडाशी जाऊन पोचले.

कोणत्या गोष्टीतून कोणते दोष निर्माण होतात, बघा परंतु मुख्य दोष आहे युद्ध. हे युद्ध थांबविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एका ठिकाणी भारतामुळे युद्ध थांबविण्याचा हा मार्ग पत्करला गेला आणि त्यामुळे भारताची प्रगती झाली, जगाची प्रगती झाली. ब्रम्हदेश स्वतंत्र झाला. जगाच्या मानाने ब्रम्हदेशाने हातभार लावला. इतरही देश स्वतंत्र झाले. काही अडचणीही आले लक्षात ठेवा, इंडोनेशियात संघर्ष झाला आणि परकीय लोक निघून गेले पण इतर देशातून ते निघून गेले नाहीत. त्या वेळी त्यांना किती हाल सोसावे लागले कारण जगात कोठेही एका देशाने दुसऱ्या देशावर बळजबरीने राज्य करण्याचा काळ आता राहिला नाही. तो काळ बरा असो की वाईट असो, तो आता गेला ज्या लोकांना त्याच काळात अजून राहावयाचे आहे, त्यांना जग कळलेले नाही, जगाचे मन समजलेले नाही. म्हणून या समस्या आपण सोडवावयाच्या आहेत आज आपल्यासमोर उभ्या राहिलेल्या या समस्या जुन्याच आहेत. तुम्ही म्हणाल की भारताचे हे तुकडे म्हणजे काही थोड्या खेड्याएवढे आहेत. परंतु शरीरातील लहानसा भाग जरी दुखत असला तरी त्यामुळे यातना होतातच. वस्तुतः ही समस्या पूर्वीच सुटायला हवी होती. परंतु आम्ही शांततेचा मार्ग स्वीकारला ती तडजोडीने सुटावी, असा प्रयत्न केला एका बाबतीत लौकर निकाल लागेल असे मला वाटते. परंतु दुसऱ्या बाबतीत मात्र बऱ्याच अडचणी येत आहेत. ते काही असो. या समस्या लवकरच सुटणार आहेत, असे तुम्ही समजा. आपले काही सिद्धांत आहेत;

त्या सिद्धांताना चिकटून राहिल्यामुळे आपण लौकर स्वतंत्र झालो, आणि आपले स्वातंत्र्य टिकवून धरले, हे तुम्ही विसरू नका. आपल्याला एकोप्याने आणि अहिंसेच्या व शांततेच्या मार्गाने काम करावयाचे आहे. मी पूर्णपणे अहिंसेच्या मार्गाने जाणारा आहे, किंवा तुम्ही तसे आहात, असे मी म्हणत नाही. आपण सारे दुबळे आहोत आपण घसरतो, पडतो, संपूर्णपणे या मार्गावरून चालू शकत नाही, हे खरे; परंतु आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की आम्ही दुबळे असलो तरी ते सिद्धांत सामर्थ्यवान आहेत जितक्या मर्यादेपर्यंत आपण धैर्याने, शौर्याने या सिद्धांतांना चिकटून राहू, तेवढ्या मर्यादेपर्यंतच आपला देश मजबूत बनेल आणि तेवढ्या मर्यादेपर्यंतच आपला देश या जगाची सेवा करील. या सिद्धांताना चिकटून राहाणे हे काही भ्याडाचे काम नव्हे. आपले हे सिद्धांत जगामध्ये चालविण्याचा आम्ही थोडाफार प्रयत्न केला. तुमची आमची इच्छा असो अथवा नसो, पण आम्हा भारतीयाना जगाच्या या रंगभूमीवरील पात्रे बनावेच लागेल; कारण आपण स्वतंत्र झाल्यापासून जगाचे डोळे आपल्याकडे, आम्हा कोट्यवधी भारतीयाकडे लागून राहिलेले आहेत. हिंदुस्थान हे एक प्राचीन राष्ट्र आहे, त्याने पुष्कळ बरे-वाईट दिवस पाहिले आहेत, गेली तीनशे वर्षे गुलामगिरीत काढून ते आता पुनः स्वतंत्र झाले आहे. अशा दृष्टीने जग आपल्याकडे बघते. या देशाने दोनशे-अडीचशे वर्षांच्या गुलामगिरीपासून कोणता धडा घेतला? तो यापुढे काय करील? कोणीकडे झुकेल? हे प्रश्न जगापुढे आहेत, कारण जवळजवळ चाळीस कोटी लोक जिकडे झुकतील तिकडे वजन वाढेल व त्याचा जगावर परिणाम होईल, हे उघड आहे. जगाच्या लोकसंख्येच्या एकपंचमांश आपण आहोत. म्हणून जगाने आमच्याकडे पाहिले व आम्हीही जगाची थोडीबहुत सेवा करण्याचा प्रयत्न केला. आपण स्वतःला सावरणे, स्वयं सेवा करणे, देशाला मजबूत बनविणे व देशात सौख्य निर्माण करणे, ही जगाची पहिली सेवा. जगाची दुसरी सेवा म्हणजे युद्धाला पायबंद बसावा म्हणून आपल्या शक्तीप्रमाणे जगातील शांततेच्या पारड्यात आपले वजन टाकणे ही होय. आमची शक्ती फार मोठी नाही, हे उघड आहे. जगात मोठमोठे सामर्थ्यशाली देश आहेत, त्यांच्याजवळ प्रचंड सैन्ये आहेत, अगणित सैनिक आहेत, विमाने आहेत. त्यांच्याजवळ अमाप पैसा आहे. त्यांचे शस्त्रांचे साठे नव्यानव्या हत्यारांनी भरलेले आहेत त्यांच्याशी आमची काय तुलना? आम्ही या क्षेत्रात नवीन आहोत. आपले घर कसे सावरायचे याची काळजी आम्हाला लागून राहिली आहे. परंतु आमच्या पाठीशी एक सिद्धांत होता, एक बुद्धी होती, एक धडपड होती. तिच्या मागे एक सावली होती. एका महापुरुषाची सावली ज्याचे नाव गांधी आहे. त्या सिद्धांतानुसार चालत असताना कधी-कधी आमचे पाय अडखळत आणि ठेच लागून आम्ही खाली पडत असू. तरी ही तो सिद्धांत समोर ठेवून आम्ही चालत राहिलो; आणि कोणत्याही देशाशी लढाई न करता आम्ही तो सिद्धांत जगापुढे मांडला

गेल्या काही वर्षांत थोडेफार काम झाले आहे, हे तुम्ही जाणता. आपसात लढणाऱ्या काही देशांनी भारताची आठवण काढली. हे लढणारे देश आपसात इतर कोणत्याच मुद्यावर सहमत होत नव्हते; परंतु भारताचे सहकार्य आपण मागावे, या एका मुद्यावर मात्र त्यांचे एकमत झाले. आपसात लढणाऱ्या त्या दोन्ही देशांनी आमच्यावर, भारतावर विश्वास टाकला आणि आमच्या देशाचे सैन्य परदेशात गेले. आपल्या देशाचे सैन्य जुन्या काळीही अनेकदा बाहेर गेले होते. पण ते कसे? कोणत्या कामासाठी? दुसऱ्या देशाशी युद्ध करण्यासाठी. पण तो जमाना आता गेला. अगदी नाइलाज झाल्याशिवाय, कोणत्याही परिस्थितीत आम्ही इतर देशाशी लढू इच्छित नाही. त्या अर्थाने आपले सैन्य लढायला गेलेले नाही. तर आपला हा सुंदर झेंडा घेऊन, शांततेच्या नावाने, शांततेसाठी ते गेले आहे. लढण्यासाठी नव्हे तर सेवा करण्यासाठी ते कोरियाला गेले आहे. त्यानंतर पुन: एक संदेश आमच्याकडे आला आहे, हे तुम्हाला माहित आहे. तिकडे इंडोचायनात जाऊन आम्ही आणखी एक नवी सेवा करावी, अशी विनंती मोठमोठ्या देशांनी आम्हाला केलेली आहे. तीही आम्ही मान्य केली आहे. काम मोठे आहे, जबाबदारीचे आहे, त्याच्यामुळे कदाचित आम्हाला बराच त्रास होईल, हे खरे. परंतु आम्हाला ते टाळता येणार नाही. सेवा व जागतिक शांतता यासाठी आम्ही ते मान्य केले आहे. या वेळी तेथे आमच्या बरोबर कॅनडा व पोलंड या देशांचे प्रतिनिधीही आहेत. तेथे आमचे लोक गेले आहेत आणि आम्ही तिघांनी मिळून ही जबाबदारी स्वीकारली आहे. थोड्याच दिवसात आपल्या आणखी काही लोकांनाही तिकडे जावे लागेल. काही लष्करी व काही इतर अधिकारी या कामासाठी लागतील. खूप दिवस चालणारे हे काम आहे

तेव्हा भारताचे नाव जगामध्ये या वेळी कोणत्या प्रकारच्या कामामुळे गाजत आहे, याची तुम्हाला यावरून कल्पना येईल. भांडण-तंटा, लढाई झगडा केल्यामुळे नव्हे तर मैत्री, शांतता, मिलाफ घडवून आणणारा देश म्हणून आपले नाव जगात पुढे आले आहे. भारताची व भारतीयांची कीर्ती सदैव याच गोष्टीमुळे—मैत्री, शांतता परस्पर प्रेम यामुळेच—जगभर पसरावी अशी माझी इच्छा आहे. जगात आपण असे नाव मिळवू; पण आपल्या घरात आपण काय करतो तेही पाहिले पाहिजे. आपले सामर्थ्य किंवा दौर्बल्य आपल्या घरातील वर्तणुकीवर अवलंबून असते. आपण घरात म्हणजे देशात त्या सिद्धांताप्रमाणे चाललो तर जगात आपला मान राहील. तसे घडले नाही तर आमच्या शब्दाला काही किंमत उरणार नाही. म्हणून हाच सिद्धांत आपण घरीही लागू केला पाहिजे. आपल्यात कितीही धर्म किंवा जमाती असल्या तरी आपण सर्वांनी मिळून-मिसळून, एकोप्याने, ऐक्याने वागले पाहिजे. जर एखाद्या धर्माचा कोणी माणूस असे समजत असेल की भारतावर आपलाच हक्क आहे, इतरांचा नाही, तर त्याच्याशी भारताचा काही संबंध नाही. भारतीय राष्ट्रीयत्व आणि भारतीय स्वातंत्र्य

नद्यांवरील मोठमोठ्या योजनांसंबंधी तुम्ही ऐकले असेल, पाहिले असेल, मग ती भाकडा-नानगलची योजना असो की दुसरी कोणती असो. त्याही पूर्ण होत आल्या आहेत त्यांच्यापासून जनतेचा फायदा होईल. या पद्धतीने 36 कोटी लोक पुढे जात असतात. तुम्ही खेड्यात जाऊन पाहा. किती नाना प्रकारच्या योजना तेथे सध्या चालू आहेत. इतरही अनेक खेड्यापाड्यांत त्या पोचवावयाच्या आहेत. हळूहळू सार्‍या भारत-वासीयांपर्यंत त्या जाऊन पोचतील. दर वर्षी काही कोटी लोकांपर्यंत या योजनांचे लोण नेऊन पोचविण्याचे सध्या ठरले आहे. येत्या सात वर्षांत भारतातील प्रत्येक खेडे या योजनेत अंतर्भूत व्हावे, अशी कल्पना, अपेक्षा आहे. भारतात सहा लाख खेडी आहेत. आमचा संकल्प काही सामान्य नाही; कारण आपला देशही काही लहान-सहान नाही. आपल्याला मोठमोठी कामे करावयाची आहेत आपल्याला विजय मिळवावयाचा आहे. पण आमचा विजय दुसऱ्या कोणाच्या विरुद्ध असणार नाही कोणाला दाबून टाकून तो मिळवावयाचा नाही, तर आमच्या विजयात इतरांनाही सामील करून घ्यावयाचे आहे. हेच आमच्या भारताचे अंतर्गत धोरण आहे. ज्यांचे दरवाजे सर्वांना उघडे आहेत, सर्व देशातील लोकांना जेथे मुक्तद्वार आहे, अशा थोड्या देशांपैकी आज भारत हा एक देश आहे. याचा अर्थ काय? याचा अर्थ असा की आमचा कोणीही शत्रू नाही.

आमचे पाकिस्तानी बांधव आमच्यावर नेहमी नाराज असतात. त्यांच्यात व आमच्यात नाना प्रकारचे प्रश्न आहेत. परंतु तुम्हाला माहीत आहे, या स्थानावरून मी सांगत हेत आलो आहे की आमच्या मनात लढाईची मुळीच इच्छा नाही. आम्हाला त्यांच्यावर प्रेम करावयाचे आहे, त्यांच्याशी सहकार्य करावयाचे आहे. कारण हिंदुस्थान आणि त्याचा शेजारी पाकिस्तान यांनी एकदिलाने पुढे गेले पाहिजे अशी आमची श्रद्धा आहे. एकमेकांची हानी करून कोणाचाच फायदा होणार नाही. म्हणून या कल्पनेने आपल्याला चालावयाचे आहे. याचा अर्थ असा नव्हे की आमच्या दृष्टीने जी गोष्ट आवश्यक आहे, जी वस्तू आमची आहे, जी आमच्या प्रतिष्ठेची बाब आहे, ती मिळून आम्ही सोडून द्यावी तिच्या बाबतीत आपण दृढच राहाणार आहोत. परंतु दृढ राहूनही आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की, आमचा मार्ग शांततेचा आहे, सिद्धांताचा आहे, युद्धाचा नाही.

अद्यापि मुक्त न झालेल्या भारतीय भूमीवरील काही भागाचा मी नुकताच उल्लेख केला होता. त्याच्यापैकी एक गोवा आहे. तो अगदीच लहान भाग आहे. या गोव्याच्या बाबतीतही आपले धोरण शांततेचे आहे. परंतु मी तुम्हाला सांगू इच्छितो की गोवाही आपली एक परीक्षा आहे; किंवा गोवाही पोर्तुगीजांची एक परीक्षा आहे, असे म्हणा हवे तर. अर्थात तसे समजणे जरा कठीण आहे; कारण जो देश तीनशे वर्षांपूर्वीची भाषा बोलतो, त्याला ही गोष्ट कळत असेल काय? गोवाही आमची

व पोर्तुगीजांची परीक्षा असो किंवा नसो, या वेळी जगातील प्रत्येक देशाची ती एक
कसोटी आहे, यात मात्र शंका नाही. तुम्ही ही गोष्ट समजून घ्यावी, अशी माझी
इच्छा आहे. एका देशाने दुसऱ्या देशावर राज्य करणे याला वसाहतवाद असे म्हणतात.
तुम्ही त्याला दुसरे काहीही नाव द्या. या वसाहतवादाच्या प्रश्नावर जगातील काही
देश या बाजूला आहेत तर काही त्या बाजूला. म्हणून जगातील देशाची ही एक
कसोटी आहे, असे मी म्हणतो. गोवा भारतात आल्याने भारताचे नशीब काही फळ-
फळणार नाही, ही गोष्ट जगातील लोकांना समजते की नाही? गोवा पोर्तुगालला
संपन्न बनविणार आहे, असेही नाही. पण एका देशाने दुसऱ्या देशावर राज्य करण्या-
च्या जुनाट व्याधीचे ते एक प्रतीक बनले आहे. गोवा ही भारतातील या प्रकारची
सर्वांत जुनी जखम आहे. यावर जर कोणी असे म्हणत असेल की जुनी जखम आहे,
जुना फोड आहे म्हणून आम्ही तो सहन करावा तर त्यांना आमचे मन कळलेले नाही
आशियाचे मन कळलेले नाही, असे म्हणावे लागेल. या बाबतीत दुसऱ्या एखाद्या देशाने
येऊन हस्तक्षेप किंवा साह्य करावे, अशी आमची इच्छा नाही. परंतु त्यांचे मन आम्हाला
जाणून घ्यावयाचे आहे. ते कोणत्या दिशेने विचार करतात, त्यांचे म्हणणे काय, त्यांचा
कल कोणीकडे आहे, त्यांचा सल्ला काय, हे आम्हाला पाहावयाचे आहे. त्यांचे मोज-
माप करण्याची ही एक विचित्र कसोटी आहे. अशा प्रकारच्या राज्यसत्तेच्या बाबतीत
त्यांचे विचार अजून जुन्या काळात वावरत आहेत. नव्या काळाचा प्रकाश त्यांच्या
मेंदूपर्यंत पोचला आहे की नाही? त्यांची मने अजून जुन्या काळातच वावरत असतील
तर ते नक्कीच जुन्या ठेचा खातील आणि कोलमडून पडतील.

मी तुम्हाला नुकतेच सांगितले की आशियामध्ये भारताच्या स्वातंत्र्याला
मान्यता मिळाली, भारत पुढे गेला व त्यापासून जगाने लाभ करून घेतला. ब्रम्ह-
देशात व आशियातील इतर काही भागांत ही गोष्ट घडली नाही. तेथे अनेक वर्षे
लढायात खर्ची पडली. पुष्कळ नाश झाला. जगाची जी आगेकूच आज चाललेली आहे
तिला या मार्गांनी आळा घालणे शक्य नाही, हे तुम्हाला दिसत नाही काय? ही एक
पूर आहे. त्याला अडविण्याचा प्रयत्न केला तर नाश होणार. म्हणून मी म्हणालो
की गोवा ही एक कसोटी आहे. एखादा देश या बाबतीत काय विचार करतो? कोणी-
कडे झुकतो? काय करतो? काय सल्ला देतो? त्याने चुकीचा सल्ला दिला तर भांडण
वाढेल. त्याने योग्य सल्ला दिला तर शांततेने सारे प्रश्न सुटतील. या वेळी भारताने
एक फार मोठा प्रवास आरंभिलेला आहे. तो पुढे चालला आहे, याची तुम्हाला मी पुनः
एकदा आठवण करून देतो. आपले कार्य फार मोठे आहे. हिंदु, मुसलमान, शीख, ख्रिस्ती,
यहुदी, जैन वगैरे नाना धर्मांचे व जातींचे लोक या देशात आहेत. ते सारे भारतीय
आहेत. भारतीय या नात्यानेच ते पुढे जातात व देशही पुढे जातो. देश समृद्धीच्या
दिशेने वाटचाल करतो. देशातून दारिद्र्य नष्ट होते. कसे? आमच्या परिश्रमाने

त्यांनी आम्हाला मदत करावी., म्हणून आम्ही त्यांच्याकडे डोळे लावून बसत नाही त्यांचे साह्य आम्हाला नको. आम्हाला इतरांची मदत नको—ग्रहताऱ्यांची किंवा आकाशाची मदत नको. आमचे हात आहेत, आमचे पाय आहेत, आमची बुद्धी आहे आपसात एकोपा ठेवून, खांद्याला खांदा लावून आपण पुढे जातो. आजचा हा वाढदिवस तुमचा व माझाही वाढदिवस आहे; कारण जेव्हा एखादा देश स्वतंत्र होतो तेव्हा त्या देशात राहणारी प्रत्येक व्यक्ती स्वतंत्र होते. तो तिचा वाढदिवस बनतो. तेव्हा भारताच्या या स्वातंत्र्य वाढदिवसाच्या प्रसंगी मी तुम्हाला आमंत्रण देतो. या भारताच्या प्रगतीच्या या मोठ्या प्रवासात तुम्हीही सामील व्हा. आपण आपली सारी शक्ती पणाला लावून काम करू या आणि भारतातील शहरांचा व खेड्यांचा विकास घडवून आणू या.

1954

जय हिंद !

आज आम्ही स्वातंत्र्याचा आठवा वाढदिवस साजरा करीत आहोत. या आठ वर्षांत आम्ही किती सोशीकपणा दाखविला ते जगाने पाहावे. आम्ही स्वतःला किती आवरले; कारण हा गोव्याचा प्रश्न धीराने व शांततेच्या मार्गाने सुटावा अशी आमची इच्छा होती व आजही तशीच इच्छा आहे. आजही गोव्याच्या बाबतीत आम्ही काही लष्करी उपाययोजना करणार नाही, हे मी तुम्हाला सांगू इच्छितो. शांततेच्या मार्गानेच आम्ही हा प्रश्न सोडविणार आहोत. मी हे अशासाठी सांगत आहे की कधी कधी परदेशातील व भारतातील लोकांचाही या बाबतीत गैरसमज होतो. आम्ही तेथे तोफा, बंदुका व रणगाडे जमा करीत आहोत, अशा प्रकारच्या खोट्या बातम्या बाहेरचे लोक पसरवीत आहेत. गोव्याच्या जवळपास आमचे सैन्य नाही. आपण आरडाओरडा करून अशी परिस्थिती निर्माण करावी की सरकारला सैन्य धाडणे भाग पडेल, असे देशातील काही लोकांना वाटते. परंतु ते शक्य नाही. आम्ही हा प्रश्न शांततेने सोडविणार आहोत. सर्वांनी हे नीट समजून घ्यावे. जे लोक तिकडे चालले आहेत, त्यांना त्यांचा मार्ग लखलाभ होवो. परंतु त्यांनी लक्षात ठेवावे की जर ते स्वतःला सत्याग्रही म्हणवून घेत असतील तर त्यांनी सत्याग्रहाचे सिद्धांत व मार्ग यांचा विसर पडू देऊ नये. सत्याग्रहाच्या मागून सैन्य जात नसते, किंवा सत्याग्रही लष्कराची मागणीही करीत नसतात. ते स्वतःच अन्य मार्गाने त्या प्रश्नाला तोंड देत असतात.

कायम स्वरूपाची गोष्ट करू इच्छितो. तेव्हा त्या बाबतीत उतावळेपणा करणे चांगले नसते. आपल्याला वाट पाहावी लागते. जी गोष्ट वाट पाहून व धैर्यपणाने केली जाते ती अधिक मजबूत व अधिक पक्की होते.

मी आताच पंचशीलचा उल्लेख केला आणि जगाकडे तुमचे लक्ष आकर्षित केले. जगातील वातावरण थोडे बदलले आहे. तुम्ही आपल्या देशाकडेही पाहा; कारण आपण आपल्या देशात काय करतो, यावरच शेवटी सारे अवलंबून असते. जगात आपली पत कशी वाढते? आपल्या नुसत्या बोलण्याने किंवा घोषणांनी जगात आपली पत वाढत नसते आपण आपल्या देशात जे काही करतो त्यावरून जग आपली किंमत करते. मला असे वाटते की गेल्या आठ वर्षांत आपल्या देशाने पुष्कळच काम केले आहे. आपण पुष्कळ प्रगती केली आणि भावी इमारत मोठी व मजबूत बनावी यासाठी देशाचा पाया पक्का बनविला. आता वेगाने त्या इमारतीचे बांधकाम सुरू करण्याची वेळ आली आहे. जो पाया आपण घातला तो मजबूत आहे. यापुढेही त्याला मजबूत ठेवावयाचे आहे. पहिली पंचवार्षिक योजना संपत आली आहे. दुसरी काही महिन्यात सुरु होईल. त्यासाठी तयार व्हावयाचे आहे, कंबर कसावयाची आहे, थोडा त्रास झाला तर तो त्रास सहन करावयाचा आहे. कारण भारताची ही इमारत केवळ थोडे दिवस राहाण्यासाठी नसून उद्या-परवासाठी, भावी काळासाठी व पुढील पिढ्यांसाठी आपण बांधत आहोत, तिला मजबूत बनवीत आहोत आणि त्यासाठी ती बांधत आहोत, परिश्रम करीत आहोत.

विभिन्न देशांचे आपसांतील संबंध कसे असावेत या संदर्भात मी पंचशीलचा उल्लेख केला. परंतु जुन्याकाळी या शब्दाचा वापर दुसऱ्या अर्थाने करण्यात आलेला होता. आपले परस्पर संबंध कसे असावेत, आपण एकमेकांशी कसे वागावे, यासंबंधी तेथे सांगण्यात आलेले आहे. आपल्या मनात डामडौल नसेल तर आपण बाहेर काय डामडौल दाखविणार? आमच्या अंतःकरणात शांतता नसेल तर बाहेर आम्ही शांततेच्या काय गोष्टी करणार? आपल्याला आपसांत सहकार्य करता येत नसेल तर बाहेर इतरांना आपण काय योग्य सल्ला देणार? म्हणून आपण आपले दोष काढून टाकणे जास्तच जरूर आहे. आपला भारत हा एक मोठा देश आहे. याची किती रूपे आहेत! येथे अनेक धर्म आहेत, मते आहेत, रंग आहेत, प्रांत आहेत, प्रदेश आहेत. त्या सर्वांचा मिळून आपण स्वतंत्र भारत बनविला. आपल्या बाबतमध्ये धर्मांची, जातींची, प्रांतांची, प्रदेशांची कमलीच भिन्नता असता कामा नये. आपल्यामध्ये जी भिंत उभी असेल ती पाडून टाकली पाहिजे. जातिभेद ही एक भिंत आहे. एका जातीला किंवा जमातीला दुसऱ्या जाती-जमातीपासून वेगळे करण्याचा प्रयत्न आपण हाणून पाडला पाहिजे. या गोष्टींनी भारताला फार दुर्बळ बनविले. या भारतात

6—14 P. D. (I. & B.)'65

# आम्हाला शांतता टिकवावयाची आहे

आज आपण पुनः एकदा नवभारताचा, स्वतंत्र भारताचा वाढदिवस साजरा करण्यासाठी जमलो आहोत. नवभारताचा वाढदिवस तुम्हाला व आम्हाला सुखाचा जावो. पुष्कळ अडीअडचणींनी भरलेला लांबचा प्रवास करून या मुक्कामावर आपण येऊन पोचलो तो दिवस तुम्हाला आठवतो काय? कितीतरी लोक ठेचाळून खाली पडले व पुन्हा उठून चालत राहिले. आम्ही स्वप्ने रंगवीत होतो, आमची हृदये आकांक्षानी भरलेली होती. अखेर ती स्वप्ने साकार झाली, आकांक्षा पूर्ण झाल्या आणि आम्ही स्वतंत्र भारताचा सूर्य उगवताना पाहिला तो दिवस तुमच्या स्मरणात आहे ना? त्या गोष्टीला आठ वर्षे झाली. तुम्ही, आम्ही व सार्‍या भारताने त्या वेळी आनंदोत्सव साजरा केला होता. आनंदोत्सव साजरा केला खरा, परंतु तो साजरा करीत असतानाही आपल्या डोळयात अश्रू आले होते; कारण अनेक दुःखदायक घटना आपल्या देशात व देशाच्या सरहद्दीवर त्या वेळी घडल्या होत्या. आपले कितीतरी आपद्ग्रस्त बांधव निर्वासित बनून येथे आले. येथे व पाकिस्तानात दोन्ही बाजूंना, लोकांना एका मोठ्या संकटाला तोंड द्यावे लागले. ते सारे आम्ही सहन केले. आता ते प्रश्न यशस्वीपणे सोडविण्याचे प्रयत्नही आपण केले. आता जे प्रश्न उरले आहेत तेही नक्की सुटतील. अशा प्रकारे ही सुखदुःखांनी भरलेली आठ वर्षे निघून गेली. तुम्ही जरा विचार करा, आठ वर्षांपूर्वी जगाच्या दृष्टीने आमच्या देशाची व आमची काय स्थिती होती? आणि आता हे चित्र पाहा. काय फरक दिसतो? आमचा देश जरी हजारो वर्षांचा जुना असला तरी स्वतंत्र भारत हे एक लहान बालक आहे. परंतु या लहान वयातच त्याने जी कर्तबगारी दाखविली, जी धमक व पुढे जाण्याची क्षमता दाखविली, ती जगाने पाहिली आहे.

आज या ठिकाणी जमल्यानंतर आपण गेल्या आठ वर्षांच्या काळाकडे वळून पाहातो आणि विशेषतः पुढील काळातही डोकावून पाहातो. आपण काय केले आणि काय करावयाचे उरले आहे? आपल्याला करावयाचे तर पुष्कळच आहे. मुख्यतः आपल्यात जे दोष आहेत त्याच्याकडे लक्ष द्यावयाचे आहे. कारण आपण आपल्या दोषावर, आपल्या उणीवावर जेवढे लक्ष देऊ तेवढी आपली शक्ती वाढेल. त्यायोगे देश पुढे जाईल व आपल्या देशातील जनतेचेही कल्याण होईल. तुम्ही जगाकडे पाहाल तर तुम्हाला असे दिसून येईल की आम्ही आमचा हात दुसर्‍या कोणत्याही देशाविरुद्ध उगारलेला नाही; आणि मी आशा करतो की यापुढेही आमचे हात कधी दुसर्‍या देशाविरुद्ध उगारले जाणार नाहीत.

आम्ही प्रत्येक देशाकडे मैत्रीच्या नजरेने पाहिले आहे आणि मैत्रीचा हात पुढे केला आहे. अर्थात काही गुनागुनीचे प्रश्न आमच्या मार्गात आडवे आले, हे खरे, परंतु त्यामुळे आपण दुसऱ्या देशाशी असलेला स्नेह कमी करावा असे म्हणता येणार नाही. कारण ज्या मार्गाने आपण चाललो आहोत तोच शेवटी जगाच्या हिताचा ठरणार आहे. आपल्या शेजारच्या देशाशीही आम्ही मैत्री व घनिष्ठ सहकार्य करू इच्छितो येत्या काही दिवसात इतर देशाशी आमचे संबंध कालीने जवळचे झाले. तुम्हाला ते सारे माहीत आहे. पंचशील हा शब्द तुम्ही ऐकला आहे. या शब्दाच्या द्वारे देशा देशात कोणते संबंध असावेत व साऱ्या जगात कोणते नाते असावे ते आम्ही स्पष्ट केले. हळूहळू नवीन राष्ट्रांनी याचा स्वीकार केला. हळूहळू जगातील वातावरण बदलले. केवळ आमच्या आवाजामुळे नव्हे तर जगात इतरही घटना घडल्या. आम्हाला घमेंड मारायची नाही किंवा गर्वही करावयाचा नाही. या दिशेने थोडी बहुत मदत आम्हाला करता आली तरी ते पुरेसे आहे. परंतु आनंदाची गोष्ट अशी की जगातील वातावरण पूर्वीपेक्षा अधिक चांगले आहे; आणि जे देश पूर्वी एकमेकाकडे शत्रुत्वाच्या भावनेने पाहात होते त्याची भीती, काळजी थोडी कमी झाली व मैत्रीचा हात पुढे करून ते एकमेकाना भेटावयालाही तयार झाले.

आमच्या देशात, प्रत्येक देशात सालता आहे परंतु आज १५ ऑगस्टच्या दिवशी तुमचे, आमचे व इतर पुष्कळ लोकाचे लक्ष गोव्याच्या सरहद्दीकडे लागलेले असणार. जेव्हा आपण आपल्या स्वातंत्र्याचे युद्ध करीत होतो तेव्हा आपल्या शिवा इतर कोणाच्या मनात असा विचारही आला नव्हता की भारत स्वतंत्र होईल परंतु भारताचा एक लहानसा भाग—गोवा, पाँडेचरी किंवा दुसरा एखादा भाग—युरोपीय देशाच्या ताब्यात राहील असे कधी काही करणे अशक्य होते. स्वप्नातही असा विचार आला नव्हता. पाँडेचरी व गोवा या भागापासून आपण दोन-तीनशे वर्षे दूर राहिलो गेली दीड-दोनशे वर्षे आपण त्याच्यापासून वेगळे का राहिलो? याचे कारण असे की ब्रिटिश साम्राज्याच्या कृपाछत्राखाली त्या वसाहती येथे राहिल्या. येथे एक मोठे साम्राज्य होते व त्याना ते आपल्या सरक्षणाखाली ठेवू शकत होते, म्हणून त्या राहिल्या. त्या साम्राज्याच्या कृपाछत्राखाली जशी चित्र-विचित्र संस्थाने येथे नांदत होती, तशाच या वसाहती जेव्हा ब्रिटिश साम्राज्य येथून गेले तेव्हा शे-दोनशे वर्षापासून असलेली ती संस्थाने कोठे राहिली?

तर मग गोव्याच्या बाबतीत "गोवा भारतात विलीन व्हावा असे तुम्हाला का वाटते?" असे कोणी आम्हाला विचारणे विचित्रच नव्हे काय? भारतात विलीन होण्याचा प्रश्नच कोठे येतो? भारताचा व जगाचा नकाशा कोणी पाहिलेला नाही? गोवा कोठे आहे ते कोणी पाहिलेले नाही काय? तो तर भारताचा एक भाग आहे. त्याला कोण अलग करू शकतो ?

वेगवेगळी रूपे राहावीत अशी आमची इच्छा आहे, परंतु त्याचबरोबर आपण सर्वजण एका कुटुंबातील मंडळी आहोत, ही गोष्टही आपण विसरता कामा नये. आपल्याला देशाला पुढे न्यावयाचे आहे. आपल्यासमोर जे नवे ध्येय आहे त्याच्या दिशेने या देशाला, सर्वांना पुढे जावयाचे आहे. दुसरी गोष्ट अशी की प्रत्येक काम आपण शांततापूर्ण मार्गाने केले पाहिजे. आपण शांततेच्या लंब्या-चवड्या गप्पा मारतो आणि त्यानंतर एकमेकांविरुद्ध हात उगारतो. याचा अर्थ काय? नुकतीच, दोन दिवसांपूर्वी पाटणा शहरात ही घटना घडली. इतक्या झटकन आपण हात उचलतो याचा अर्थ काय? आमचे विद्यार्थी इतक्या लौकर या गोष्टीत अडकतात, याचे कारण काय? त्याना कळत नाही काय? आपण स्वतंत्र भारताचे नागरिक आहोत याची त्यांना कल्पना नाही काय? ते जुन्या चाकोरीतून जातात, याचा अर्थ त्याना स्वातंत्र्याचे वारे लागलेले नाही काय? ही विचार करण्या-सारखी गोष्ट आहे. लोकांनी आपसात भांडणतंटा करण्याचे दिवस आता गेले— मग ते ब्राम्हणेतर-बंधु असोत की इतर कोणी. विद्यार्थी जेव्हा आपल्या शिक्षकावर हात टाकतात तेव्हा ते स्वतःही बदनाम होतात व आपल्या देशालाही बदनाम करतात. त्याऐवजी भावी काळात त्याना ज्या जबाबदाऱ्या पार पाडावयाच्या आहेत त्यासाठी त्यांनी तयारी केली पाहिजे. म्हणून तुम्हा सर्वांना व विशेषतः तरुणांना माझी अशी विनंती आहे की तुम्ही आपल्या जबाबदाऱ्या ओळखा. आजच्या काळाकडे नजर फिरवा. कसा काळ आहे हा? साऱ्या जगात एक नवे परिवर्तन घडून आले आहे. हे अणुयुग आहे. अणुशक्तीचे युग आहे. आपण आपली विचारप्रणालीच बदलून टाकली पाहिजे. क्षुद्र गोष्टीतून, क्षुद्र भांडणातून, क्षुद्र चर्चांतून आपण बाहेर पडले पाहिजे. जो देश या युगाला ओळखेल तोच पुढे जाईल. माझी अशी इच्छा आहे की तुम्ही-आम्ही व साऱ्या भारतीयांनी या गोष्टी समजून ध्यानात आणि ज्या नव्या शक्ती निर्माण झाल्या आहेत त्यांचा एक दिलाने फायदा घ्यावा. त्यासाठी आपण आपल्या देशात प्रत्येक प्रश्न शांततेच्या मार्गाने सोडविणे आवश्यक आहे.

थोड्याच दिवसात आणखी एक जटिल समस्या आपल्या देशासमोर उभी राहाणार आहे. काही दिवसापूर्वी एक मंडळ नेमण्यात आले होते हे तुम्हाला आठवत असेल. त्याचे नाव आहे राज्य पुनर्रचना मंडळ. भारताचे जे वेगवेगळे भाग, प्रदेश आहेत त्यांच्यात काही फेरफार करावेत किंवा नाही आणि करावयाचे असतील तर ते कोणते असावेत हे ठरविणे हे त्या मंडळाचे काम आहे. आम्ही या कामासाठी तीन उच्च-सदस्य व्यक्तींची निवड केली. त्यांच्या मनात या प्रश्ना-विषयी काही पक्षपात नव्हता. त्यांनी या बाबतीत चौकशी करून आम्हाला सल्ला द्यावा, असे त्यांना सांगण्यात आले होते. गेल्या एक-दीड वर्षापासून ते हे

काम करीत आहेत. काही दिवसांनी, कदाचित दोन महिन्यांत, त्यांचा अहवाल व शिफारसी आमच्याकडे येतील. त्या शिफारसी काय असतील याची मला कल्पना नाही. त्याबाबतीत मी माझे मत देऊ शकत नाही. परंतु मी तुम्हाला सांगतो की या प्रश्नावरून पंजाबपासून दक्षिणेपर्यंत व पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत खूप खळबळ माजण्याची शक्यता आहे. परंतु कितीही खळबळ माजली तरी या प्रश्नाच्या बाबतीत त्या मंडळाच्या ज्या काही शिफारसी असतील त्याच्या बाबतीत आपण शांतपणे, थंडपणे, आत्मविश्वासपूर्वक निर्णय घेतले पाहिजेत. जो कोणी त्याविरुद्ध दंगाधोपा करील तो आपल्या देशाचा हितचिंतक नाही, असे म्हणाव लागेल. सर्वांना पसंत पडेल असा कोणताच निर्णय असू शकणार नाही. ते अशक्य आहे. परंतु जास्तीत जास्त चांगला निवाडा दिला जाईल असा प्रयत्न करण्यात येईल. आपल्या शिफारसी सादर करताना या दृष्टीने मंडळही आपल्याकडून होईल तितका प्रयत्न करील अशी मला आशा वाटते. जे काही ठरेल ते आपण नीट विचाराने, एकमेकांशी चर्चा करून, शांतपणे मान्य केले पाहिजे अशा बाबतीत भांडण-तंटा होता कामा नये. आम्ही आमचे प्रश्न कसे शांततेने व आत्मविश्वासाने सोडवितो हे आपल्याला जगाला दाखवून द्यावयाचे आहे. हे सामर्थ्याचे लक्षण आहे. घोषणा व आरडाओरडा करणे हे आजकाल सामर्थ्याचे लक्षण समजले जात नाही. तो तर पोरकटपणा आहे. आपल्या देशाचे, नव भारताचे वय जरी आठ वर्षांचे असले तरी हा एक पुरातन देश आहे. त्याचा आवाज गंभीर आहे. आरडाओरडा करणे किंवा किंचाळणे त्याला शोभत नाही. शांतपणे, धैर्याने, सभ्यपणे इतर देशांशी मैत्री करणे व आपल्या देशाला पुढे नेणे हे आपले काम आहे. म्हणून सारे प्रश्न आपण एकदिलाने व शांतचित्ताने सोडविले पाहिजेत.

मी तुम्हाला पंचशीलविषयी सांगितले या पंचशीलाच्या दोन बाजू आहेत, एक म्हणजे इतर देशांशी मैत्रीचे संबंध जोडणे, एकमेकांच्या प्रश्नात हस्तक्षेप न करणे, एकमेकांना समान मानणे पंचशीलची दुसरी बाजू म्हणजे आपण आपल्या देशात काय करतो ही होय. आपण स्वतःला सावरावे, तयार करावे, चुकीच्या मार्गाने जाऊ नये, एकदिलाने चालावे, ऐक्य राखावे आणि मान्या भारताचे एक मोठे कुटुंब बनवावे आपली ही शिकवण हजारो वर्षांची जुनी आहे. ही शिकवण आज आमच्या स्वतःसाठी आहे, इतरांसाठी नाही. कारण आपल्याला स्वतःला शिकविण्याचा हक्क आहे, इतरांना शिकविण्याचा अधिकार नाही हे लक्षात ठेवा. आम्ही इतरांना काही शिकवू या घमेंडीत आपण राहू नये. आपण जे काही शिकतो असू ते अमलात आणून आपण कसे आहोत व कसे होऊ इच्छितो ते इतरांना दाखवून द्यावे. म्हणून आजच्या या आठव्या वाढदिवसाच्या प्रसंगी

आपण आनंदोत्सव साजरा केला व गेल्या आठ वर्षांतील कामांनबंधी समाधान व्यक्त केले तर ते योग्यच ठरेल; परंतु त्याचबरोबर आपण कोणत्या गोष्टी केल्या नाहीत, कोणती कामे अजून बाकी आहेत हेही आपण पाहिले पाहिजे एक मुक्काम गाठला. आता दुसऱ्या मुक्कामाला जावयाचे आहे-हे कसे जावयाचे? गोतमेच्या मार्गाने आपल्याला जावयाचे आहे.

ज्याच्या परिश्रमाने, बलिदानाने, त्यागाने व हौतात्म्याने आपण स्वतंत्र झालो त्याचेही स्मरण आपण केले पाहिजे. भारताचा जुना स्वर आपण उपयोगात आणावा आणि जगाच्या नव्या स्वराकडेही लक्ष द्यावे. आमच्या पूर्वजांचा स्वर आमच्या कानात दुमदुमत आहे.

एक वर्षानंतर या देशात व जगात एक उत्सव आपण साजरा करणार आहोत. या भारतात एक सर्वांत मोठा माणूस, महापुरुष जन्मास आला—गौतम बुद्ध. त्याच्या मृत्यूला पुढील वर्षी अडीच हजार वर्षे पूर्ण होतील. त्याची पुण्यतिथी आम्ही येथे व इतर देशांतही पुढील वर्षी साजरी करणार आहोत. ती साजरी करताना त्याचे जे सिद्धांत होते,—एका भारतीयाने दिलेले सिद्धांत—त्यांचे स्मरण आपण ठेवू या. त्याचबरोबर आपल्या डोळ्यांदेखत होऊन गेलेले आपल्याबरोबर काम केलेले राष्ट्रपिता गांधी होते त्यांचेही स्मरण करू या आज भारताला जो काही मोठेपणा आहे, महत्त्व आहे, ते त्यांनीच दिलेले, त्यांनीच शिकविलेले आहे. त्यांच्या सिद्धांताप्रमाणे आपण चाललो तर आपले पाय भक्कम राहातील, मने सुदृढ राहातील व डोळे सरळ समोर पाहातील. यासंबंधी आपण विचार करू या आणि विचार करून पुढे जाऊ या.

1955 जय हिंद !

# राज्यांची पुनर्रचना

जय हिंद! स्वतंत्र भारताचा हा नववा वाढदिवस आपणां सर्वांना सुखाचा होवो. नऊ वर्षांपूर्वी जगाच्या क्षितिजावर एक नवा तारा उगवला. तो होता स्वतंत्र भारताचा. तो नवाही होता आणि जुनाही होता. पुष्कळ वर्षांनंतर तो तयार झाला होता. लोकांचे बलिदान, परिश्रम, घाम व रक्त यातून तो तयार झाला होता त्याचा रंग नवीन होता. त्याचा पोषाख नवा होता. त्याने तो गांधीजींकडून घेतलेला होता. त्या नव्या पोषाखात एक नवी चमक होती. एक नवा ढंग होता. कारण या काळातील दोन पिढ्यांचे स्वातंत्र्य-युद्ध आम्ही कसे लढलो होतो ते तुम्हाला आठवत असेल. आम्ही लढलो. धैर्याने, बहादुरीने लढलो. आमचे लक्षावधी लोक लढले. आम्ही प्रतिष्ठेने लढलो, सभ्यपणाने लढलो. आम्ही कोणावर हात टाकला नाही. शत्रूशी लढलो आणि शत्रूला मित्र बनविले. अशा प्रकारे आम्ही एक नवा मार्ग आपल्यासमोर ठेवला—आम्ही कसला, गांधीजींनी ठेवला. आम्ही तर त्यांचे दुबळे शिपाई होतो. अशा प्रकारे हा भारतदेश व येथील कोट्यवधी लोक, बलिदान करून व नाना प्रकारच्या अग्निदिव्यातून जाऊन तयार झालेले आहेत.

या सर्वांचा परिणाम म्हणजे आम्ही स्वतंत्र झालो आणि आमच्या स्वातंत्र्याचे तेज इतर देशांतही जाऊन पोचले. याचे कारण काय? आपला देश फार मोठा व विशाल आहे म्हणून नव्हे, येथे 35–36 कोटी लोक राहातात म्हणूनही नव्हे, तर जगातील लोकांना या ठिकाणी मोठी कामे करण्याची व युद्धही लढण्याची एक नवी पद्धती, एक नवा मार्ग दिसला म्हणून. या देशात सारी कामे सभ्यपणाने, शांततापूर्ण मार्गाने आणि शत्रूलाही मित्र बनविण्याच्या पद्धतीने झाली हे त्यांनी पाहिले.

भारताचे खरे वैभव हेच होते व त्याचा जगावर परिणाम झाला, याचे मी तुम्हाला स्मरण करून देतो. ज्या शिकवणीने भारताला स्वतंत्र बनविले ज्या शिकवणीने भारताला जगात मशहूर केले, ज्या शिकवणीने आमची मान ताठ बनविली, आमचे मस्तक उन्नत केले—इतके की त्यामुळे आम्हाला थोडा गर्वही झाला—त्या शिकवणीचा आजकालच्या तरुणांना विसर पडला आहे, याची मी तुम्हाला आठवण करून देतो. आम्हीही जगाच्या मैदानात थोडीफार सेवा करून दाखविली आहे. जगातील मोठमोठ्या समस्या सोडविण्यात आमचाही थोडाबहुत हात होता. आज पुनः एकदा जगामध्ये युद्धाचे नगारे वाजत असल्याचे

दूरून ऐकू येत आहे, दिमत आहे, किंवा त्याची चर्चा सुरू आहे, अशा वेळी काही लोकांचे डोळे पुनः आमच्या देशाकडे वळले आहेत. का ? कशामुळे ? येथे प्रचंड सैन्य आहे म्हणून नव्हे, आम्ही जाऊन कोणाला तरी धमकावू शकतो म्हणून नव्हे, तर आम्ही थोडीशी सेवा करायला शिकलो आहोत म्हणून. मैत्री करणे व करविणे आम्हाला येते म्हणून. जेथे युद्ध चालू आहे तेथे शांतता स्थापन करण्यांत आम्ही मदत केली म्हणून. जेथे गाठी आहेत तेथे त्या सोडविण्याची आम्ही खटपट केली म्हणून.

आज जग पुनः एकदा भयंकर धोक्यात, संकटात सापडले आहे. म्हणून पुनः आपण आपली जुनी शिकवण ताजी केली पाहिजे. जुना धडा गिरवला पाहिजे स्वतःला सावरले पाहिजे, जगाची सेवा केली पाहिजे व आपली सेवा केली पाहिजे.

आज नव्हे तर हजारो वर्षांपूर्वी भारतातून दोन शब्द निघाले होते, हे तुम्ही ऐकले असेल. त्या शब्दांनी या काळात नवीन अर्थ धारण केला आणि ते जगभर पसरले. त्यांचे नाव आहे 'पंचशील'. वेगवेगळया देशामध्ये कोणते नाते कोणता संबंध असावा, त्यांनी परस्परांशी कसे वागावे हे या शब्दांनी सांगितले आहे. त्याच्या मागे कितीतरी जुन्या व नव्या घटना आहेत. हे विचार हळूहळू पसरले आहेत व पुष्कळ देशांनी त्यांचा स्वीकार केला आहे; कारण आजकालच्या जगात त्याशिवाय अन्य मार्गच नाही. फक्त दोन मार्ग आहेत 'एक लढाईचा व विनाशाचा आणि दुसरा शांततेचा व पंचशीलचा. तिसरा मार्ग नाही. साऱ्या जगाला ही गोष्ट हळूहळू समजू लागली आहे.

आता या वेळी पुन एकदा जगाच्या इतिहासात एक भयंकर प्रसंग आलेला आहे. या ऑगस्ट महिन्यात चांगल्या गोष्टीही घडल्या आहेत व वाईटही. मोठा विचित्र महिना आहे हा. तुम्हाला माहीत आहे की 15 ऑगस्ट रोजी आपण आपला स्वातंत्र्य-दिवस साजरा करण्यासाठी येथे जमत असतो. येथे भारतात शेकडो वर्षांपासून एक मोठे साम्राज्य होते त्या साम्राज्यशाहीची परंपरा 15 ऑगस्ट रोजी समाप्त झाली आणि आपल्या येथे एक नवे युग सुरू झाले. दोन मोठी जागतिक युद्धे ऑगस्ट महिन्यातच सुरू झाली होती—सन 1914 चे व सन 1939 चे. दोन्ही ऑगस्ट महिन्यात सुरू झाली. याच ऑगस्ट महिन्यात जपानने शस्त्रे खाली ठेवली व 15 ऑगस्टच्या दिवशी दुसरे महायुद्ध संपले. मोठा विचित्र महिना आहे हा ऑगस्टचा. संकटांनी भरलेला महिना-परंतु त्याचबरोबर काही चांगल्या गोष्टीही या महिन्यात झाल्या आहेत. म्हणून आपण सावध राहिले पाहिजे. आजकाल जग संकटांनी भरलेले आहे. कारण हे

जग अॅटम बाँब व हायड्रोजन बाँबचे जग आहे. येथे गाफीलपणा चालत नाही. आपल्या अबाबदाऱ्या विसरणेही चालत नाही. गांधीजींनी दिलेला धडा विसरून चालणार नाही. तो आपण विसरलो तर आपल्यापुढे नाश हा ठेव- लेलाच. या वेळी जगामध्ये सुवेझ कालव्याच्या संदर्भात ज्या मोठ्या शंकां निर्माण झाल्या आहेत, ज्यासाठी उद्या लंडनला एक परिषद भरणार आहे, तो प्रश्न शांततेने सोडविण्याचा काहीतरी मार्ग तेथे सापडेल, अशी मी आशा करतो. आमची मैत्री प्रत्येक देशाशी आहे. आमची मैत्री विशेषतः ईजिप्तशी आहे, आमची मैत्री विशेषतः इंग्लंडशी आहे. दोघांशीही आमची मैत्री आहे. यामुळे कधी-कधी आम्हाला सेवा करण्याची संधी मिळते--धमकयाच्या द्वारे नव्हे, तर मैत्रीच्या द्वारे. आम्ही धमकया कोणाला देणार? मी आशा करतो की या प्रश्नाचा विचार करण्यासाठी जे लोक तेथे जमत आहेत त्यात आमच्या ईजिप्तचे जे मित्र आहेत त्यांच्या सल्लामसलतीने काही तरी मार्ग निघेल व त्या योगे प्रत्येक देशाची प्रतिष्ठा राहील व मैत्री कायम राहील, कारण ज्यात कोणी कोणाचा अपमान करीत नाही, तेच निर्णय चांगले असतात. जेव्हा तुम्ही एखाद्याचा अपमान करता तेव्हा तुम्ही दुसऱ्या एका युद्धाचें, शत्रुत्वाचे बी पेरता परंतु एखादा प्रश्न मित्रत्वाने सुटला तर तो कायमचा सुटतो.

भारताच्या गुलामीची व स्वातंत्र्याची ही शेंकडो वर्षांची जुनी समस्या कशी सुटली, ते तुम्हाला आठवत असेल. संघर्ष, जुलूम व इतर अनेक गोष्टी घडल्या असल्या तरी अखेर हा प्रश्न मैत्रीने व सहकार्याने सुटला याचा परिणाम असा झाला की इंग्रजांत व आमच्यात फारसे वैमनस्य राहिले नाही किंबहुना जे जुने वैमनस्य होते, तेही विसरण्याचा आम्ही प्रयत्न केला आणि पुष्कळ अंशी त्याचा विसर पडलाही. आता ते आमचे मित्र आहेत. याचे कारण आपण स्वतंत्र आहोत, ते स्वतंत्र आहेत आणि मैत्रीने, तडजोडीने हा प्रश्न सुटला आहे. त्यांनी जर आम्हाला आणखी दडपून टाकण्याचा प्रयत्न केला असता तर सारे चित्रच बदलून गेले असते. आपण स्वतंत्र तर झालोच असतो, परंतु त्या स्वातंत्र्यामध्ये पुष्कळच वैमनस्य उरले असते व त्या वैमनस्याने पुष्कळ दिवस- पर्यंत आपली पाठ सोडली नसती. म्हणून ज्यायोगे दुसऱ्याला खाली पहावयास लागणार नाही, दुसऱ्याच्या प्रतिष्ठेची वूज राखली जाईल, दुसऱ्याच्या हक्कांचेही रक्षण केले जाईल आणि सिद्धान्ताचा त्याग करावा लागणार नाही तोच, प्रश्न सोडविण्याचा खरा मार्ग होय. सुवेझ कालव्याचा हा प्रश्न अशाच प्रकारे सुटेल, अशी मी आशा करतो या खेपेस लंडनमध्ये हा प्रश्न सुटला नाही तर दुसऱ्या प्रयत्नाने सुटेल, तिसऱ्या प्रयत्नाने सुटेल परंतु एक गोष्ट स्पष्ट असली पाहिजे की आम्ही कोणत्याही परिस्थितीत हा किंवा दुसरा कोणताही प्रश्न लष्करी

सामर्थ्याने अथवा धमकीने सोडविणार नाही. जर चुकीने लष्करी बळावर अथवा धमकीने प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न झाला तर त्याचा वाईट परिणाम होईल. त्याने तो प्रश्न सुटणार नाही, उलट पुन: आग पेटेल व ती आग जगभर पसरेल.

पंचशीलसंबंधी मी तुम्हाला सांगितले. हे शब्द आपल्या भारतीय भाषेतून निघून जगभर पसरले. जगासमोर तर आपण चांगले सिद्धांत ठेवले, परंतु जेव्हा मी आपल्या देशाकडे पाहातो तेव्हा माझ्या मनात विचार येतो की आपल्या घरगुती बाबतीत आपल्याला ते सिद्धांत कितपत कळले? मनापासून, अंतःकरणापासून कळले का? गेल्या काही महिन्यात, सहासात महिन्यात आपण या देशात विचित्र दृश्ये पाहिली. ती बहुतेक भावाभावातील भांडणे होती. आम्ही शत्रूशी दोन हात करून त्याला मित्र बनविले; परंतु भावाभावातील प्रश्न कसे सोडवावेत याचे ज्ञान, तितकी सहनशीलता आपल्यात नसावी याचा अर्थ काय? गांधीजींनी भारतीय जनतेला ज्या नव्या युगाच्या अनुरुप बनविले होते ते नवे युग, तो जमाना गेला काय? त्या मुशीतून फक्त आमच्या वयाचेच लोक बाहेर पडले काय? आणि आज जे लोक नवीन आहेत, त्यांच्यावर बुद्धीचे, शरीराचे विवेकाचे कसलेच बंधन राहिलेले नाही काय? हे आहे तरी काय? मला वाटते तुम्ही याचा विचार करावा. आमचे तरुण रस्त्यावर येतात, मारामाऱ्या होतात, हल्ले होतात आपल्या भावाला मारून अशीच बहादुरी आपण दाखविणार काय? आम्ही आमच्या काळात बंदुकीला, तोफेला तोंड दिले, शत्रूशी सामना दिला., परंतु तो कसा? हात न उगारता, दुःखाचा एक उसासाही न टाकता आम्ही संपूर्ण साम्राज्याला तोंड दिले. आजकालचे तरुण कोणत्या साच्यातून तयार झालेले आहेत? त्याचा साचा दुसरा आहे काय? ज्या साच्याने भारताला स्वतंत्र केले, ज्या साच्याने भारताचे नाव जगात पसरविले तो साचा नष्ट झाला की काय? आता दुसरा एखादा साचा आला आहे काय? तुम्हीच या गोष्टीचा विचार करा.

आता माझे वय झाले. आम्ही सर्वजण या देशाचे व तुमचे जुने सेवक आहोत. आमचा काळ हळूहळू लोप पावत आहे. परंतु आमच्या काळात आम्हीही थोडीफार सेवा केली. विशेषतः ज्या पद्धतीने आम्ही काम केले, त्या पद्धतीने गांधीजींच्या पायाशी बसून आम्हीही काही शिकलो होतो त्या पद्धतीचा आम्हाला अभिमान वाटत होता. जगात तिचा गाजावाजा झाला आणि आता? मोठ्या कामांची गोष्ट राहू द्या, घरातील कामाच्या बाबतीतही ती पद्धत आता उरली नाही. विशेषतः जेव्हा या देशातील लोक दंगे करतात, जाळपोळ व मारामाऱ्या करतात, गोंधळ माजवतात तेव्हा मनात विचार येतो, हा भारत कोणीकडे चालला आहे? आपण सर्वांनीच याचा विचार केला पाहिजे.

एक प्रश्न उपस्थित झाला. आपल्या देशातील प्रांतांच्या सरहद्दी कोणत्या असाव्यात? या प्रश्नाला काही महत्त्व नाही. हा काही मोठा राजकीय प्रश्न नव्हे; अथवा हा काही आर्थिक प्रश्नही नव्हे. सरहद्द इकडे राहिली काय किंवा तिकडे राहिली काय. अर्थात हा भावनेचा प्रश्न आहे, हे मी मान्य करतो. लोकांना या प्रश्नाच्या बाबतीत जिव्हाळा वाटतो, आवेश आहे, हे मी मान्य करतो. ठीक आहे. भावनेची कदर केली पाहिजे. परंतु म्हणून काय आपण आपल्या देशातील हा प्रश्न सोडविण्यासाठी एकमेकावर हात टाकणार? दंगे करणार? सरकारी इमारती जाळणार? सरकारी इमारती ही काय माझी मालमत्ता आहे? त्या जाळून तुम्ही काय माझे नुकसान करता? अथवा एखाद्या अधिकाऱ्याचे नुकसान करता? ती तर देशाची मालमत्ता आहे. ती जाळावयाची म्हणजे देशाचाच नाश करण्याचा प्रयत्न होय

शिवाय आपले मतभेद सोडविण्याचे कितीतरी नवे मार्ग आहेत. आपली संसद आहे. परंतु त्या संसदेने केलेल्या निर्णयाविरुद्धच बंड पुकारले जाते. आपली लोकसभा म्हणजे काय? साऱ्या भारतातून निवडून आलेले लोक तेथे असतात. आपल्या संसदेत भारताचे प्रतिनिधी आहेत हे भारताचे वैभव आहे, भारताचे प्रतीक आहे तेथे जो निर्णय होतो तो भारताचा कायदा बनतो आणि भारतातील लोकांनाच नव्हे तर साऱ्या जगाला तो मान्य करावा लागतो अशी आमची संसद आहे त्या लोकसभेत एखादी गोष्ट मान्य व्हावी आणि तिच्या विरुद्ध दंगे व्हावेत, पोलिसाशी मारामाऱ्या व्हाव्यात अथवा सरकारी इमारती जाळल्या जाव्यात, हे काय बहादुरीचे लक्षण आहे? हे काय शहाणपणाचे चिन्ह आहे? तुम्ही याचा विचार करावा, भारतातील सर्व लोकांनी यासंबंधी चिंतन करावे, अशी माझी इच्छा आहे; कारण भारतात, प्रत्येक मोठ्या देशात, वेगवेगळी मते असतात. ठीक आहे.-ती असली पाहिजेत. पुढे जाण्याचा मार्ग एकच नसतो, दहा मार्ग असतात. विचार करण्याचा एकच मार्ग नसतो, शेकडो मार्ग असतात. विचाराची सारी दारे उघडी असावीत, म्हणजे विचारविनिमयातून आपल्याला योग्य मार्ग निवडून त्याप्रमाणे चालता येते म्हणून विचारस्वातंत्र्य असावे, असी आमची इच्छा आहे. परंतु विचारविनिमय किंवा चर्चा ही एक गोष्ट आहे तर मारामाऱ्या व दंगेधोपे ही दुसरी गोष्ट आहे. जर एखादा पक्ष भारतातील लोकांना मारामाऱ्या करण्यास प्रोत्साहन देत असेल तर तो भारताशी इमानदार नाही, भारताचे स्वातंत्र्य ज्या पायावर उभे आहे तो पायाच तो उखडून टाकतो, त्याची पाळेमुळे खणून काढतो, असे म्हणावे लागेल म्हणून आपण आपल्या देशाला कोणीकडे घेऊन चाललो आहोत याचा प्रत्येक व्यक्तीने व पक्षाने विचार करावा.

थोड्याच दिवसात निवडणुकी होणार आहेत सहा-आठ महिन्यांनी निवडणुकी होतील. त्यावेळी प्रत्येकाला आपले मत देण्याचा अधिकार आहे. आपल्या

युक्तिवादाच्या जोरावर मिळविता आल्यावरच ते टिकवून घेण्याचा प्रत्येक पक्षाला अधिकार आहे. तुम्हा सर्वांना अधिकार आहे. लवलाभ होवो तुम्हाला हा हक्क! तुम्हाला आजचे सरकार मान्य नसेल तर दुसरे सरकार निवडा. मी खूप होईन आणि जी काही सेवा करता येईल ती करीन. आम्हा सगळ्यांनाच आनंद होईल. परंतु लोकशाही पद्धतीने, बहुमताने आपला निर्णय न करता रस्त्यांत जाऊन, एकमेकांशी मारामाऱ्या करून निर्णय करण्याचा प्रयत्न करणे, याचा लोकशाहीशी काय संबंध? विचार करण्यासारखी गोष्ट आहे की, भारत चालला आहे कोणीकडे? ज्या साच्यातून तयार होऊन आम्ही बाहेर पडलो होतो तो साचा कमजोर झाला आहे काय? आजकालच्या तरुणामध्ये हे काय चालले आहे? प्रत्येक माणूस हा कोणत्या ना कोणत्या संस्कृतीच्या साच्यातून तयार होत असतो. यातूनच राष्ट्रे निर्माण होत असतात. आम्ही कोणत्या साच्यातील आहोत? आम्ही जुन्या साच्यातील आहोत, असे कोणी म्हटले तर ते बरोबर आहे. कारण आमच्या नसानसात व रक्ताच्या थेंबाथेंबात भारताच्या शेकडो पिढ्या व त्याचा प्रभाव आहे. ते सारे आमच्याकडून कोणी हिरावून घेऊ शकणार नाही अथवा आम्हालाही त्याचा विसर पडणार नाही. आजकाल आम्ही स्वतंत्र भारताच्या साच्यात तयार झालो आहोत. परंतु जुन्या किंवा नव्या साच्यात न बसणारे ते लोक कोठे आहेत? ते हुल्लडबाजीखेरीज दुसऱ्या कोणत्याच साच्यात बसणारे नाहीत

तुम्ही विचार करा, भारतासमोर मोठमोठी क्षेत्रे पसरलेली आहेत. पंचवार्षिक योजना ही एक फार मोठी गोष्ट आहे. तिचे मोठे ओझे आहे. जगात आज जोराची स्पर्धा चालू आहे पुढील पाचदहा वर्षांत आपल्याला आपली सारी शक्ती या योजनेत लावावी लागेल. एक-दोन प्रांताच्या सरहद्दी जरा इकड-तिकडे झाल्या तरी त्या काही भारताच्या बाहेर जात नाहीत म्हणून त्या गोष्टी विसरून आपण आपली सारी शक्ती व बुद्धी या योजनेच्या कामी लावली पाहिजे ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. माझ्या भारतातील लोकांनी, व विशेषत तरुणांनी, आपण वहकून कोणीकडे चाललो आहोत याचा विचार करावा, चिंतन करावे, समजून घ्यावे, अशी माझी इच्छा आहे. पंचशीलची जी कल्पना आपण जगाला दिली व जगात पसरविली तिची अंमलबजावणी आपल्या देशातही आपण करतो की नाही, याचा तुम्ही विचार करा. पंचशील याचा अर्थ एका देशाने दुसऱ्या देशाशी सहकार्य करावे, मैत्री करावी, भांडणतंटा करू नये, मिळून चालावे. जेथे शेजारी एकमेकांशी मैत्री करीत नाहीत तेथे राष्ट्रांच्या मैत्रीचा प्रश्न आहे ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. या दंगाधोप्याच्या मार्गाने कोणताही निर्णय करणे अशक्य आहे ही गोष्ट तुम्हाला समजू शकेल.

आमच्या सरकारच्या बाबतीत सांगावयाचे तर ते तुमचे सेवक आहे. जेव्हा भारतातील लोकांना ते नकोसे वाटेल तेव्हा ते बाजूला सारले जाईल.' परंतु अशा प्रकारच्या गोष्टींनी, असल्या धमक्यांनी ते आपले मत ठरविणार नाही. लोकसभेचा व संसदेचा जो आदेश असेल तो अमलात येईल. कारण तो साऱ्या देशाचा कायदा होईल. तो अशा मार्गांनी बदलणार नाही. लोकसभेत राज्यपुनर्घटनेच्या विधेयकाच्या बाबतीत जो निर्णय झालेला आहे ती काळ्या दगडावरची रेघ आहे. वाटेल ते झाले तरी त्यापासून ती ढळणार नाही हे प्रत्येकाने समजून घेतले पाहिजे. ही अगदी सरळ गोष्ट आहे. मी जे म्हटले ते कदाचित पुरेसे नसेल. तुम्ही मला पंतप्रधान बनवून माझा सन्मान केला, मी पुष्कळदा अघळपघळ बोलतो. पण जरी मी एक माणूस आहे मी काही बोलणे निराळे आणि माझ्या सरकारने काही बोलणे निराळे परंतु जेव्हा संसदेच्या मुखातून एखादी गोष्ट बाहेर पडते तेव्हा ती माझी नसते, तिची नसते किंवा तुमची नसते ती भारताची गोष्ट असते, आणि भारताच्या निर्णयासमोर प्रत्येकाने मान तुकविली पाहिजे जे निर्णय झाले आहेत ते लोकसभेने केले आहेत. आता ते राज्यसभेत जातील. म्हणून हे निर्णय पक्के आहेत. प्रत्येकाने ही गोष्ट ओळखली पाहिजे. अर्थात कोणताही निर्णय बदलून घेण्याचे कायदेशीर मार्ग आहेत, ही गोष्ट वेगळी परंतु ते दंगेधोपे करून बदलता येतील असे समजणे म्हणजे स्वत:ची फसवणूक करून घेण्यासारखे आहे. ती देशाची सेवा नसून ते देशविरुद्ध केलेले काम आहे.

असो. आज नऊ वर्षांनंतर या 15 ऑगस्टच्या दिवशी आपण मागे वळून पहातो व भविष्यकाळाकडे दृष्टिक्षेप करतो. या नऊ वर्षांत पुष्कळ मोठमोठ्या गोष्टी झाल्या आहेत. या नऊ वर्षांत पुष्कळ असा नवा भारत निर्माण झाला आहे. जगात आपली प्रतिष्ठा पुष्कळ वाढली आहे

एक महिन्यापूर्वी परदेशाचा महिनाभर दौरा करून मी येथे परत आलो जेथे जेथे मी गेलो तेथे तेथे जगाचे डोळे भारताकडे लागले असल्याचे मला दिसून आले. त्यांना आमच्याविषयी उत्सुकता आहे. आम्ही दिवसेंदिवस कसे पुढे जात आहोत, आमची ताकद कशी वाढत आहे, आमची प्रतिष्ठा कशी वाढते आहे, इकडे त्यांचे लक्ष आहे. जगाची नजर आपल्याकडे आहे. मी येथे परत आलो तेव्हा आपल्याला अजून किती कामे करावयाची आहेत ते मला दिसले ज्या गोष्टी झाल्या त्या होऊन गेल्या. आपली दृष्टी भविष्याकडे आहे. आपल्याला पुढे जावयाचे आहे. आपल्या या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या दिशेने दृढपणे पावले टाकावयाची आहेत. या कामात आपल्याला एकमेकांना साह्य करावयाचे आहे व सारी शक्ती पणास लावावयाची आहे. आपली थोडीही शक्ती आपल्याला वाया घालवून चालणार नाही. नवभारताची निर्मिती आपल्याला करावयाची आहे. भारतातील

दारिद्य, बेकारी व विषमता यांचे उच्चाटण करून सर्वांनी मिळून मिसळून राहाणारा व जगाची, शांततेची सेवा करणारा असा एक समृद्ध देश परस्पर सहकार्याने आपल्याला घडवावयाचा आहे. या मोठ्या अवघड गोष्टी आहेत; परंतु आपण यापूर्वी भारतात अवघड गोष्टी केल्या आहेत आणि भविष्यकाळातही आपण अवघड गोष्टी करू. म्हणून आजच्या प्रसंगी आपण मागे वळून अवश्य पाहावे; परंतु यापुढेही आपण शांततेने, सहकार्याने व सभ्यपणे वागावे. आपल्या जुन्या व नव्या संस्कृतीचा आपल्याला विसर पडता कामा नये. एखादी गोष्ट आपल्याला कितीही नापसंत असली, आवडली नाही, तरी आपण आपला मार्ग सोडू नये. ही गोष्ट आज आपण लक्षात ठेवावी, तिचा पुनरुच्चार करावा.

तुम्हाला आठवत असेल की या वर्षी आपण एक मोठी स्मृती साजरी केली. गौतम बुद्ध या देशात होऊन गेला. त्या गोष्टीला यदा अडीच हजार वर्षे पूर्ण झाली त्याने या देशाला पावन केले त्या गोष्टीला अडीच हजार वर्षे होऊन गेली, परंतु अडीच हजार वर्षांनंतरही केवळ या देशातच नव्हे तर संपूर्ण जगात त्याचे नाव चमकत आहे; कारण ज्या गोष्टी त्याने केल्या त्या पक्क्या होत्या, काळाबरोबर नष्ट न होता सदैव टिकून राहाणाऱ्या होत्या.

भारतातील ज्या मातीने तुम्हाला-आम्हाला जन्म दिला तिने गौतम बुद्ध, गांधी यांच्यासारखे महापुरुष निर्माण केले, या कल्पनेने आपल्याला अभिमान वाटतो. अखेर या मातीत काहीतरी जादू आहे जिने इतकी वर्षे आमच्या राष्ट्राला जिवंत ठेवले, त्याला पुन: पुन: सामर्थ्यवान् बनविले असे काहीतरी तिच्यात आहे. त्या युद्धीच्या गोष्टी आहेत, आत्मिक गोष्टी आहेत, धैर्याच्या गोष्टी आहेत. त्या आपल्या प्राचीन संस्कृतीच्या गोष्टी आहेत. तेव्हा पुन: एकदा आपण त्या गोष्टींचे स्मरण करू या आणि ज्यांनी या देशाला घडविले त्या गौतम बुद्ध व गांधीजी यांच्यासारख्या आपल्या महान नेत्यांचे, महापुरुषांचे स्मरण करू या. आपण सगळेजण त्यांच्या मार्गाने जाऊ या आणि जेवढी निकडीची कामे आहेत ती सारी कंबर कसून सहकार्याने करू या.

जयहिंद !

माझ्याबरोबर जरा तीन वेळा जोराने जयहिंद म्हणा !

जयहिंद !
जोराने म्हणा—जय हिंद !
जोराने म्हणा—जय हिंद !

1956

# नव्या जगांचें नवें प्रश्न

हा दिवस साजरा करण्यासाठी आपण येथें हजारो-लाखोंच्या संख्येनें जमलो आहोत. आज आपल्या स्वतंत्र भारताचा दहावा वाढदिवस आहे; आणि शंभर वर्षांपूर्वी या ठिकाणीं जें मोठें स्वातंत्र्ययुद्ध झालें होतें त्याची ही शताब्दी आहे.

आपण फार मोठ्या संख्येनें येथें जमला आहात; परंतु तुमच्या-आमच्या-पेक्षाही जास्त असे आणखी काही लोकही येथें जमले आहेत—लोकांच्या स्मृती, येथें आलेले जनसमूह, काफिले, गेल्या शंभर वर्षांत ज्यांनी बहादुरी दाखविली, भारताची सेवा केली, जनतेची सेवा केली आणि आपलें कर्तव्य पार पाडून जे निघून गेले, ते सारे बहुधा या ठिकाणी जमले असावेत. कदाचित ते तुमच्या-आमच्या मनात येऊन बसले असतील आणि शंभर वर्षांनंतर आज भारताची काय स्थिती आहे तें पाहात असतील ज्यासाठी त्यांनी धडपड केली, रक्त सांडलें, अश्रू ढाळले, घाम गाळला, प्राण दिले, त्यांतून काय निष्पन्न झालें? त्या निष्पत्तीचें स्वरूप काय आहे?

हा शंभर वर्षांचा इतिहास आज आपल्या डोळ्यासमोर उभा राहातो येथें, या दिल्ली शहरात आणि विशेषत या लाल किल्ल्यात ज्या काही बऱ्यावाईट घटना घडल्या त्यांची हकीगत येथील प्रत्येक दगड आपल्याला सांगतो माझ्या-समोर हा जो चांदणी चौक आहे तो सेंकडो वर्षांपासून दिल्लीचा मशहूर बाजार आहे. या चांदणी चौकानें काय काय पाहिलें? मोठमोठ्या बादशहाच्या व सम्राटाच्या मिरवणुकी येथून गेल्या आहेत देशातील कात्या, साम्राज्याचे उदयास्त, जुनी साम्राज्यें ढासळली व नवी नवी राज्यें उदयाला आली, हें सारें यानें पाहिलें आहे. येथून प्राचीन भारताच्या मिरवणुकी निघाल्या, मोगल सम्राटाच्या, इंग्रज अधिकाऱ्यांच्या, सर्वांच्या मोठमोठ्या हत्तीवरून स्वाऱ्या निघाल्या. तो सारा जमाना आला आणि गेला. आता स्वतंत्र भारताचा जमाना आला आहे. या वेळी या देशाची घडण कशी करावयाची व त्याला कसें पुढे न्यावयाचें, याचा विचार करणें हें तुमचें-आमचें महत्त्वाचें कर्तव्य आहे

शंभर वर्षांच्या प्रयत्नांचें फळ आपल्याला मिळालें. आता आपण परिश्रम करण्याची व त्या फळाला चिरस्थायी बनविण्याची वेळ आली आहे. गेल्या दहा वर्षांत आपण हें काम केलें. या दहा वर्षांत भारताचें स्वरूप काहींसे पालटलें. जगाच्या कानाकोपऱ्यात ही बातमी जाऊन पोचली. लोकांच्या कानावरही हीं

गोष्ट गेली की एक नवा देश आपल्या पायांवर उभा राहिला आहे, त्याचा स्वर इतर देशांच्या आवाजापेक्षा काही वेगळा आहे, तो धमक्या देत नाही, गुरगुरत नाही, आरडाओरडा करीत नाही; कारण त्याने आपल्या नेत्याकडून—विशेषतः महात्माजींकडून—दुसऱ्या प्रकारचे धडे घेतले आहेत. हा देश गाजावाजा न करता काम करीत आहे; परंतु त्याच्या त्या कामाच्या मागे काही ताकद आहे, काही ध्येय आहे.

दहा वर्षांपूर्वी हा देश जगाच्या मैदानात आला. जगाच्या आखाड्यात आम्हीही पहिलवान बनून उतरलो पण ते कोणाशी लढण्यासाठी नव्हे तर थोडीशी आपली सेवा व थोडीशी जगाची सेवा करण्यासाठी ! आपण स्वातंत्र्याचे ओझे उचलले, कारण स्वातंत्र्याचे फायदेही असतात. अर्थात त्याचबरोबर जबाबदाऱ्याही येतात आणि आपणही बऱ्यावाईट गोष्टी पाहिल्या. हे स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी भारताचे स्वरूप कसे होते ते तुम्हाला आठवते काय ? तुम्हाला जर ते आठवत नसेल तर खेड्यात व शहरात काय-काय बदल घडून आले आहेत याची तुलना तुम्हाला करता येणार नाही. हे फार मोठे व महत्त्वाचे काम होते. ते काही जादूने होण्यासारखे नव्हते. माणसाच्या मेहनतीनेच भारताला स्वतंत्र बनविले. भारतीय लोकानी ज्या परिश्रमाने मोठमोठ्या साम्राज्याना तोंड दिले त्याच परिश्रमाने आता या भारताची निर्मिती करावयाची आहे. त्याच एकोप्याने, त्याच धैर्याने आपल्याला पुढे जावयाचे आहे. आपण पुढे गेलोही आहोत व सतत पुढे जात आहोत. जेव्हा एखादा देश वेगाने पुढे जाण्याचा प्रयत्न करतो तेव्हा त्याला तितक्याच जोराच्या विरोधालाही तोंड द्यावे लागते आणि कधी-कधी ठोकर लागण्याचीही भीती असते, ही किती विचित्र गोष्ट आहे ! जे लोक सदोदित बसून राहातात किंवा पडून असतात त्यानाच फक्त ठेच लागत नाही, परंतु जेव्हा एखाद्या राष्ट्राचा वेग वाढतो तेव्हा ते राष्ट्रही ठोकर खाते, ठोकर खाऊन उठते व पुन. पुढे चालू लागते.

अशा प्रकारे आपण चालत आहोत अशा प्रकारे आपण मुक्काम गाठले, आपण खाली पडलो, पुन. उठलो व उठून चालू लागलो हे सारे घडले. कधी कधी काही लोकाची मने निरुत्साही होतात, त्याचे धैर्य गळते ते म्हणतात, "छे ! आम्ही समजत होतो त्यापेक्षा हा कितीतरी मोठा डोंगर निघाला" कधी असे दिसते की समोर खूप अडचणी आहेत, अडथळे आहेत, आणि आपण थकून गेलो आहोत. पण या पद्धतीने मोठी कामे होत नसतात तुम्ही जरा इकडे-तिकडे पाहिलेत, आपली दृष्टी जवळच्या गोष्टीवरून काढून दूरवर रोखलीत तर तुम्हाला असे दिसून येईल की आपला हा देश, हजारो वर्षांचा हा देश हळूहळू जागा झाला

अमूत रवटवीत होत चालला आहे, तो पुढे चालला आहे. जगातून एखादा आवाज तुमच्या कानापर्यंत येऊन पोचला तर, भारताविषयी जगात काय बोलले जाते तें तुम्हाला ऐकू येईल. अर्थात जगात काय बोलले जाते याची आम्हाला फारशी काळजी नाही; तरीपण आपल्याविषयी कोणी चांगले बोलले तर ते बरेच वाटते आम्हांला चिंता आहे आमच्या कर्तव्याची. आपले कर्तव्य ओळखून आपण या देशात मोठमोठी कामे सुरू केली आहेत. ही मोठी कामे आपण पूर्ण करीत आहोत पूर्ण करणार आहोत. तसे करताना आपल्या मार्गात अडचणी येणारच.

आजच्या जगात सर्वच देशांसमोर अडचणी आहेत. काळ बदलला आहे त्याला विचित्र वळण लागले आहे. एका बाजूला मारखा धोका आहे. एका बाजूला नवीन शस्त्रे, अॅटम बॉंब व हायड्रोजन बॉंब आहेत. जगाच्या डोक्यावर जणू ते टांगलेले आहेत—केव्हा फुटतील कोण जाणे! दुसऱ्या बाजूला इतर समस्या आहेत. जुने जग संपले आता आपण नव्या जगात वावरत आहोत. हा अॅटम बॉंबचा जमाना आहे. वाटल्यास त्याच्यापासून, आपल्या शक्तीपासून, बुद्धीपासून फायदा करून घ्यावा किंवा वाटल्यास अतोनात नुकसान व आपत्ती ओढवून घ्याव्यात. ते सारे आमच्या हिंमतीवर, आमच्या शक्तीवर, आमच्या एकोप्यावर अवलंबून आहे

तर मग दहा वर्षांनंतर आज आपल्या देशाचे चित्र कसे आहे आणि भविष्य-काळचे चित्र कसे असणार आहे? या दहा वर्षांत आपण काहीसे सुस्थिर झालो आहोत; आता पुढील दहा वर्षांत आपल्याला पुढे जावयाचे आहे गेल्या दहा वर्षांत आपण काही जुन्या गोष्टी झाडून, झटकून टाकल्या, काही रस्ता साफ केला परंतु संपूर्ण मार्ग अजूनही निष्कंटक झालेला नाही. आजूबाजूला व समोर पुष्कळ काटेकुटे आहेत. तरीपण आपण आपला मार्ग पुष्कळच साफ केला आहे राजकीय क्षेत्रात पाहा, आर्थिक समस्यांचा विचार करा अथवा सामाजिक क्षेत्राकडे नजर टाका. सर्व बाजूचे रस्ते कायद्याने व इतर गोष्टींनी साफ करण्यात आले आहेत. खरे म्हणजे, जेव्हा एखादे राष्ट्र पुढे जाऊ लागते तेव्हा त्याचा मार्ग आपोआप निष्कंटक, स्वच्छ होत जातो. अर्थात आमचा मार्ग अजून पूर्णपणे साफ झालेला नाही; परंतु आपल्याला पुढे जावयाचे आहे आणि जसजसे आपण पुढे जातो तसतसे नवीन प्रश्न आपल्यासमोर उभे राहातात.

सध्या तुमच्यासमोर व देशासमोर नाना प्रकारचे प्रश्न आहेत. वस्तूंचे, विशेषतः खाद्यपदार्थांचे भाव वाढले आहेत. त्यामुळे प्रत्येकावरील ओझे काहीसे वाढले आहे. विशेषतः ज्यांची मिळकत कमी आहे अशा लोकांवरील ओझे विशेष वाढले आहे. ओझे वाढलेले आहे यात शंका नाही. आपण त्याची चिंताही केली

पाहिजे; परंतु हा कशाचा परिणाम आहे, तेही तुम्ही लक्षात घ्या. एक म्हणजे साऱ्या जगातच भाववाढीचे हे चक्र सुरू झालेले आहे आणि इतर देशात इथल्यापेक्षा थोडी जास्तच भाववाढ झालेली आहे. परंतु भारतात जे घडले आहे ते वेगाने पुढे जाण्याच्या प्रयत्नाचा एक परिणाम आहे. या वेळी भारतात सर्वत्र जे मोठ-मोठे कारखाने उभारले जात आहेत, ज्या प्रचंड योजना चालू आहेत, नद्यांवर धरणे बांधण्याच्या, आपल्या अडीच लाख खेड्यांचा विकास करण्याच्या व इतरही ज्या योजना चालू आहेत, त्यांचा हा परिणाम आहे; कारण हे प्रगतीचे एक लक्षण आहे. त्याचा काही परिणाम भाववाढीच्या रूपाने दिसत आहे; कारण आपल्या योजनांचा पुरा फायदा अद्यापि मिळू लागलेला नाही.

लोखंडाचे नवे कारखाने उभारले जात आहेत; परंतु त्यातून अजून लोखंड बाहेर पडू लागलेले नाही. एक-दोन वर्षांनंतर ते बाहेर पडू लागेल. अशा प्रकारे मधला एक कालखंड असा असतो की ज्या वेळी आपल्याला आपल्या प्रयत्नांचा संपूर्ण फायदा मिळू शकत नाही. परंतु प्रयत्नच केला नाही तर हा फायदा कधीच मिळणार नाही. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे या वेळी सबंध भारत हा एक मोठा कारखाना बनला आहे. त्यात कोट्यावधी माणसे आपापले काम करीत आहेत—मग ते शेतकरी असोत, कारागीर असोत, वेगवेगळ्या कारखान्यात काम करणारे कामगार असोत की इंजीनियर अथवा आणखी कोणी असोत. त्याच्यामुळे देशातील मोठमोठी कामे हळूहळू पूर्ण होत आहेत. जेव्हा या कामाचा फायदा साऱ्या जनतेला मिळू शकेल असा तो काळ जवळ येत आहे. हे आहे आपले संपूर्ण चित्र.

अखेर भारताला कोण पुढे नेणार? कोणी बाहेरून येऊन काही हे काम करणार नाही. तुम्हा-आम्हाला, सर्वांना मिळूनच ते करावे लागेल. सरकारच्या हुकुमाने देश पुढे जात नसतात. केवळ कायद्यांनीही पुढे जात नसतात. देश पुढे जातात जनतेच्या सामर्थ्याने, जनतेच्या एकोप्याने व धाडसाने. माझ्यासमोर पुष्कळ मुले बसलेली आहेत. त्यांना हा दिवस लखलाभ होवो. ज्या स्वतंत्र भारतात ती वाढत आहेत तो भारत त्यांना लखलाभ होवो. मोठी होऊन ती या देशाची सेवा करतील व देशाला पुढे नेतील. या वेळी जो पाऊस पडला तोही तुम्हाला लखलाभ होवो. या वेळी थोडासा पाऊस पडला, त्याने मला आनंद झाला. कदाचित् तुमच्यापैकी काही लोक या पावसाला त्रासले असतील, पावसाने आपण भिजून जाऊ अशी काळजी त्यांना वाटली असेल. परंतु तो पाऊस पाहून मला मात्र आनंद झाला. हा देश व तुमची आमची मने टवटवीत होणार, याची ती खूणच होती. असो.

तुमच्यासमोर हा विशाल देश पसरलेला आहे—हिमालयाच्या शिखरा-पासून कन्याकुमारीपर्यंत. येथे, या दिल्ली शहरात आपण हा दिवस साजरा

करीत आहोत, त्याच्या मागे हजारो वर्षांचा इतिहास आहे. ती आपल्या देशाची राजधानी आहे. आपण हा दिवस काही फक्त दिल्ली शहराच्या वतीने साजरा करीत नसून सान्या भारताच्या वतीने साजरा करीत आहोत. इतर ठिकाणीही हा साजरा केला जातो; परंतु सान्या भारताच्या वतीने दिल्ली शहर तो साजरा करते.

दहा वर्षांपूर्वी—येथे येऊन याच दिवशी—याच दिवशी नसल्यास कदाचित 16 ऑगस्टला—याच लाल किल्ल्याच्या तटावरून मी पहिल्यांदा येथून भाषण केले होते. त्यानंतर दरसाल येथे येण्याचा मला योग आला. तुम्ही आलात, आम्ही आलो, मागे वळून काही जुन्या आठवणी काढल्या आणि मुख्यतः भविष्य-काळाकडे पाहिले. आपल्याला पुढे जावयाचे आहे, म्हणून पुढे पाहिले पाहिजे. येथे आपले निश्चय पक्के करून, आपली मने अधिक मजबूत बनवून आपण आपापल्या घरी परत गेलो. आज एक वर्षानंतर आपण पुन्हा येथे जमलो आहोत. एक प्रकारे शंभर वर्षांचा इतिहास येथे आहे. ज्यांनी भारताची कीर्ती वाढविली, प्रतिष्ठा वाढविली, ज्या स्वातंत्र्याचा उत्सव आपण आज साजरा करीत आहोत त्या स्वातंत्र्याचा पाया आपल्या रक्ताने घातला, अशा कितीतरी व्यक्तींची नावे आपल्या डोळ्यांसमोर उभी राहातात. स्वातंत्र्य हे काही जादूच्या कांडीने एकदम मिळत नसते. विटेवर वीट ठेवून स्वातंत्र्याची ही भव्य इमारत उभारलेली आहे. शंभर वर्षांपूर्वी या इमारतीचे बांधकाम सुरू झाले व इतक्या वर्षांनंतर ही इमारत पूर्ण झाली. या शंभर वर्षांत किती प्रचंड संग्राम झाले, ते तुम्हाला माहीत आहे. या संग्रामातून मोठमोठे भारतीय नेते उदयास आले. शंभर वर्षांपूर्वी जे स्वातंत्र्ययुद्ध झाले होते त्याच्या विषयी लोक चर्चा करतात. आमच्या इतिहास-कारांनी त्यासंबंधी मोठमोठे ग्रंथ लिहिले आहेत हे योग्यच आहे, कारण त्या युद्धाची योजना कोणी केली, संघटन कोणी केले, काय काय झाले, काय झाले नाही वगैरे बाबतीत अनेक मते असू शकतात. परंतु महत्त्वाची गोष्ट एवढीच की येथे जे परकीय राज्य होते त्याच्याविरुद्ध भारतातील लोक वारंवार बंड करून उठले आणि त्यांनी ते राज्य उलथून टाकण्याचे खूप प्रयत्न केले याबाबतीत कोणाला शंका नसावी. या कामी सारे लोक एकजुटीने उभे राहिले. वेगवेगळ्या धर्मांचे लोक, हिंदु, मुसलमान, सारे एक झाले. त्यांनी एकदिलाने प्रयत्न केला, सर्वांनी मिळून संकटे झेलली, यात काही शंका नाही. त्याची सुरवात किंवा योजना कोणी केली अथवा कोणी केली नाही, वगैरे गोष्टी जाणून घेण्याचा प्रयत्न इतिहासकार करीतच असतात.

1857 चे युद्ध हे भारताचे स्वातंत्र्ययुद्ध होते यात मुळीच शंका नाही. त्या वेळचा भारत वेगळा होता, राजे-रजवाड्यांचा होता, हे खरे. त्या वेळचा

हिंदुस्थान बहादुरशाह बादशाहाचा होता, असे मानले तरी त्या वेळच्या हिंदुस्थानानेच आपल्या स्वातंत्र्यासाठी धडपडही केली आणि सामान्य जनतेनेही त्यात भाग घेतला व त्यात मोठमोठी नांवे समाविष्ट झाली हे काही खोटे नाही. ती नावें तुम्हाला माहीत आहेत. त्यांतील महत्त्वाची नावे अशी :—शूर वीर तात्या टोपे, नानासाहेब व बिहारचे कुंवरसिंह. आमच्या अलाहाबादचेही एक गृहस्थ होते— लियाकत अली खाँ. त्यानी अत्यंत बहादुरी दाखविली. परंतु त्या साऱ्या नावात मला एक नाव फारच प्रिय आहे. तुम्हालाही ते प्रिय असेल. ते नाव आहे राणी लक्ष्मीबाईचे. ही सारी नावे आज आपल्या अंतःकरणांत आहेत. आज आहेत, उद्याही असतील व शेंकडो वर्षांनंतरही ती तेथे असतील; कारण त्यानी एक ज्योत पेटविली होती.

त्यांच्यानंतर ती ज्योत पिढयानपिढया तेवत टेवणे हे आमचे काम होते, जनतेचे काम होते व जनतेने ती ज्योत तेवत ठेवली. आमच्या काळात, आमच्या पिढीत आम्हीही हात वर करून ती ज्योत सावरली, ती तेवत ठेवली, तिला कधी खाली झुकू दिले नाही, याचा आम्हाला अभिमान वाटतो. जेव्हा वधी आमचे हात थकले, तेव्हा ती ज्योत सांभाळण्यासाठी इतर लोक तयार होते. आमच्या हातांतून ती ज्योत घेऊन पुढे जाण्यासाठी ते तयार होते. या जन्या जमान्यातील गोष्टी आहेत. तुम्ही-आम्ही एका पुरातन देशाचे रहिवासी आहोत. या देशाच्या मागे हजारो वर्षांचा इतिहास आहे. परंतु आपला हाच देश एका अर्थाने एक नवीन देशही आहे; आणि त्यात तारुण्याचा आवेशही आहे. आपण एक तरुण देश आहोत. एका बाजूने आपण पाच-सहा हजार वर्षांचे जुने आहोत तर दुसऱ्या बाजूने आपण दहा वर्षांची लहान परंतु धट्टीकट्टी, बलवान मुले आहोत. आपल्या अंतःकरणात जवानीचा जोष आहे आणि आपण पुढे जाणारी, धडपडणारी मुले आहोत.

तेव्हा पुनः एकदा हा दिवस तुम्हाला लाभदायक होवो. आजच्या प्रसंगी आपण कोठे चाललो आहोत त्याचा आपण पुन. जरा विचार करू या. शंभर वर्षांपूर्वी सुरू झालेले स्वातंत्र्ययुद्ध रक्तपाताच्या जोरावर दडपून टाकण्याचा प्रयत्न झाला होता; परंतु स्वातंत्र्ययुद्ध हे कधी दडपले जात नसते. थोडा वेळ ते दबले गेले तरी ते कधी नष्ट होत नाही. त्यानंतर आपल्या येथे मोठमोठे नेते, महापुरुष जन्मास आले. त्यांनी ती ज्योत वर उचलून तिला प्रकाशमान बनविले, आमची अंतःकरणेही प्रकाशमान बनविली. दादाभाई नौरोजी आले, लोकमान्य टिळक आले, महात्मा गांधी आले. या सर्वांनी या देशाच्या स्वातंत्र्य युद्धाचे संघटन केले. त्यांनी देशाला समर्थ बनविले व नवेनवे धडे शिकविले. त्यांनी देशाला एकत्वाची शिकवण दिली. देशात राहाणारे विभिन्न धर्मांचे अनुयायी समान आहेत

हे त्यांनी आम्हाला शिकविले. त्यांनी देशाला शांततेच्या मार्गाने कार्य करण्याची पद्धत शिकविली. आपल्या अंतःकरणांत कोणाविषयीही शत्रुत्वाची भावना आपण बाळगू नये हेही गांधीजींनी या देशाला शिकविले. त्यानी भारताची जुनी स्मृती ताजी केली.

गतवर्षी याच शहरात व देशभर आपण कोणता उत्सव साजरा केला होता ते तुम्हाला आठवते? गतवर्षी आपल्या देशात एक महापुरुष निर्माण झाल्याला अडीच हजार वर्षे पूर्ण झाली होती गौतम बुद्ध भारतात जन्मले व ते आमच्या देशाचा होता, याचा आम्हांला अभिमान आहे. आपल्या या देशाने किती अद्भुत लोकांना जन्म दिला! हजारो वर्षांपासून जगाची अंतःकरणे हेलावून सोडणारे गौतमबुद्धी; लोकाना आपल्या छायेत आश्रय देणारे महापुरुष येथे जन्मले. भारताचा हजारो वर्षांचा तो शांततेचा धडा गांधीजींनी पुन: आम्हाला शिकविला. ती जुनी शिकवण त्यानी आमच्या अंतःकरणात पुनः ताजी केली, तिला उजाळा दिला काही जुन्या आठवणी आल्या, जुने सामर्थ्य आले, जुन्या, प्राचीन संस्कृतीची भावना देशात पुन: जागी झाली व त्यामुळे आमच्या देशाची शक्ती वाढली. या महान देशातील उत्तरेचे, दक्षिणेचे, पूर्वेचे, पश्चिमेचे, सगळीकडले लोक एकत्र आले वेगवेगळ्या धर्मांच्या लोकानी एकजुटीने, शांततेच्या मार्गाने काम केले. अखेर जेव्हा शेवटचा क्षण आला, आपले स्वातंत्र्ययुद्ध संपले, तेव्हा त्याचा शेवट भव्य-पणे झाला. ते असभ्यपणे संपले नाही. भव्यपणे, तडजोडीने त्याचा शेवट झाला. त्या भव्यपणाचा, तडजोडीचा उत्सव दहा वर्षांपूर्वी या दिल्ली शहरात आपण साजरा केला होता.

15 ऑगस्ट 1947 चा तो दिवस तुम्हाला आठवतो? त्या वेळी तुम्हीही रंगांत येऊन थोडेफार वेड्यासारखे झाला होता स्वातंत्र्याच्या मद्याची ती धुंदी चांगली होती. असो. आपल्याला हा धडा गांधीजींनी शिकविला होता. त्याच शिकवणीने आपल्याला स्वतंत्र केले, तिनेच आपल्यात ऐक्य उत्पन्न केले. त्याच शिकवणीमुळे आपले नाव जगभर झाले. त्याच शिकवणीने साऱ्या जगात आपली प्रतिष्ठा वाढविली. ती शिकवण तुमच्या अंतःकरणात, तुमच्या कानात, तुमच्या स्मरणात आहे. ती नसेल तर आपला पाया, आपली पाळेमुळे खिळखिळी होऊन जातील. म्हणून गांधीजींच्या ज्या शिकवणीप्रमाणे चालून आपण पुढे गेलो आहोत, सारा देश पुढे गेला आहे, त्या शिकवणीचे आजच्या दिवशी आपण विशेष स्मरण केले पाहिजे. ती शिकवण आपण लक्षात ठेवली तर आपल्या देशाचे सामर्थ्य टिकून राहील व आपण पुढे जाऊ यात मुळीच शंका नाही.

कोणत्याही देशाशी आमचे भांडण नाही. आपला शेजारी जो पाकिस्तान तो आमच्याच एका भागाचा बनला आहे. तो आमच्या अंतःकरणाचा व बाहूंचा

तुकडा आहे. त्याच्याशी युद्ध करण्याचा विचार तरी आपल्याला सुचेल काय? तसे करणे म्हणजे आपलेच नुकसान करून घेणे होय. आणि ते लोक मूर्खपणाने जर असे समजतील की त्याना आमच्याशी वैर करावयाचे आहे, तर ते स्वतःच्याच पायावर धोंडा पाडून घेतील. भारत व पाकिस्तान याचे हे विचित्र नाते आहे. त्यांच्या आमच्यात जरी कधी वैमनस्य निर्माण झाले, एकमेकाविरुद्ध कधी भयंकर जळफळाट जरी झाला, तरी हजारो वर्षांपासून हे जे इतक्या जवळचे नाते वाढत राहिलेले आहे ते कायद्याने कधी नष्ट होणे शक्य नाही. भारताचे काही नुकसान झाले तर त्याने पाकिस्तानचेही नुकसान होईल; आणि पाकिस्तानचे अहित झाल्यास त्यात भारताचेही अहित आहे, यात मुळीच शंका नाही. म्हणून आम्ही उभयतानी आपसात शांततेने, मैत्रीने रहावे, पाकिस्तानशी आमचे संबंध चांगले असावेत अशी आमची इच्छा आहे. त्याने आपल्या स्वतंत्र जीवनात प्रगती करावी असे आम्ही इच्छितो. मात्र याचा अर्थ असा नव्हे की आम्ही कोणाला धमकी द्यावी, अथवा दुसऱ्या कोणाच्या धमक्याना भिऊन आपले हक्क सोडून द्यावेत ही गोष्ट आमच्या दृष्टीने, त्याच्या दृष्टीने, अथवा इतर कोणाच्याही दृष्टीने न्यायाची होणार नाही. शिवाय असे उदाहरण घालून देणे योग्य ठरणार नाही.

म्हणून आम्ही आपले हक्क न सोडता दृढपणे व शांत चित्ताने पुढे जाऊ आम्हाला प्रत्येक देशाची मैत्री हवी आहे. ज्याला 'शीतयुद्ध' किंवा 'कोल्ड वॉर' असे म्हणतात ते आम्हाला पसंत नाही शीतयुद्ध म्हणजे आपल्या मनात सदैव दावुल्य बाळगणे, द्वेष बाळगणे. ही गोष्ट चूक आहे, असे आम्ही समजतो. आपले मन संकुचित बनवून कोणताही देश पुढे जात नसतो. म्हणून आमचा हात प्रत्येक देशाशी मैत्री करण्यासाठी पुढे पसरलेला आहे; आम्हाला प्रत्येकाशी मैत्री हवी आहे. परंतु अखेर आपले कार्य आपल्या देशातच आहे. आपण जेवढे कार्य करू तेवढीच आपली प्रतिष्ठा होईल आज जगात आमची प्रतिष्ठा व आदर आहे, याचे कारण एवढेच की गेल्या दहा वर्षांतील आमचे काम पाहून एक मोठे राष्ट्र पुनः मैदानात आले आहे, हे जगाने ओळखले भारतीय जनता काम करणारी जनता आहे व ती वेगाने पुढे जात आहे हे जगाने ओळखले आहे. याचा अर्थ असा की या दहा वर्षांतील आपल्या कामामुळेच आजकाल जगात आपली कदर आहे. अखेर हे सारे काम आपल्या देशाचे आहे आणि तुम्ही आम्ही मिळून ते पूर्ण करावयाचे आहे. आपल्या मार्गात जे तात्कालिक व तात्पुरते अडथळे येतात त्याना आपण एकजुटीने तोंड देऊन ते दूर करावयाचे आहेत आपल्याला सर्वांगीण प्रगती साधावयाची आहे. जे राष्ट्र अशा प्रकारे एकजुटीने पुढे जाईल, त्याच्या अडचणी कमी होतील व त्याच्या कामाचा व्याप वाढेल. आपल्या परिश्रमानेच

रखडहळू देशातील बेकारी नाहीशी होईल आणि शेकडो वर्षांपासून गरिबीचे ओझे वाहात आलेले आपले जे विपद्ग्रस्त बांधव आहेत—मग ते शहरांत राहात असोत की खेड्यांत—त्यांच्या शिरावरील ते ओझे खाली उतरेल. हे चित्र आमच्या समोर आहे.

दहा वर्षांपूर्वी स्वातंत्र्य प्राप्त करण्याचे आपले ध्येय साध्य झाले. त्यानंतर आपण दुसरा प्रवास सुरू केला. आता हे दुसरे ध्येय आपल्यासमोर आहे. त्याही मुक्कामाला एके दिवशी आपण जाऊन पोहोचू आणि ज्याप्रमाणे एके दिवशी आपण आपली गुलामी झुगारून दिली होती त्याप्रमाणे या देशातून दारिद्र्याचीही हकालपट्टी आपण करू व सारे मिळून त्याचाही उत्सव साजरा करू.

1957 जय हिंद!

# आपण एक आहोत, एक राष्ट्र आहोत

आज पुन: आपल्या स्वातंत्र्याचा वाढदिवस आला आहे; आणि तो अकरावा वाढदिवस साजरा करण्यासाठी आपण येथे जमलो आहोत. तुम्हाला हा दिवस लखलाभ होवो. परंतु आपण सारे येथे कशासाठी आलो आहोत? केवळ एक विधी पार पाडण्यासाठी, गंमत पाहाण्यासाठी की दुसऱ्या काही हेतूने? अकरा वर्षांपूर्वी पहिल्या प्रथम या लाल किल्ल्यावर आपला राष्ट्रध्वज फडकविण्यात आला होता. आपल्या व जगाच्या इतिहासात तो एक महत्त्वाचा दिवस होता. महत्त्वाचा अशासाठी की ज्या दिमाखाने, ज्या शांततेने एवढा मोठा देश स्वतंत्र झाला होता ती एक अपूर्व गोष्ट होती. जगापुढे ते एक उदाहरण झाले होते. आमचे मस्तक उन्नत झाले, जगाने आमची कदर केली.

आपल्या स्वातंत्र्याला अकरा वर्षे झाली. ही अकरा वर्षे ओढाताणीची गेली. स्वातंत्र्याच्या पहिल्या वाढदिवसाच्या प्रसंगीही येथे येऊन आपण हा दिवस साजरा केला होता. अकरा वर्षांपूर्वी आमचा हा झेंडा येथे फडकविण्यात आला होता; आणि अखेर आपण आपले ध्येय प्राप्त केले म्हणून आपले मन आनंदित झालेले होते. परंतु स्वातंत्र्यातील पहिला सूर्यास्त होण्यापूर्वीच आपल्या कानांवर दुसऱ्या प्रकारच्या बातम्या येऊ लागल्या. आपण मोठ्या घमेंडीत होतो की आम्ही मोठ्या डौलाने, सुसंस्कृतपणे, अहिंसेने स्वातंत्र्य मिळविले आहे; इतक्यात बातमी येऊन थडकली की आमच्या देशात व आपल्या शेजारच्या देशात भाऊ भावाला मारीत आहे, बहीण बहिणीला मारीत आहे आणि लोक मलाना ठार करीत आहेत. अचानक हे दुसऱ्या प्रकारचे चित्र आमच्यासमोर उभे राहिले; आणि ते दंगेधोपे आपल्या या दिल्ली शहरापर्यंत येऊन पोचले. जय हा पराजयाच्या किती जवळ असतो हे आपण त्या दिवशी पाहिले; कारण सूर्योदयाच्या वेळी सकाळ ही आमच्या विजयाची द्योतक होती. तर त्याच दिवशीची सायंकाळ आमच्या पराजयाचे दृश्य घेऊन आमच्यासमोर आली होती.

हा पराभव शत्रूकडून आलेला नव्हता. शत्रूवर आपण जय मिळविला होता. हा पराभव होता आपल्या दुबळेपणाकडून, फुटीरपणाकडून आलेला. फुटीरपणा हीच सर्वांत अधिक भयंकर गोष्ट असते. सिद्धांत प्रतिकार आम्ही निःप्रमाणे केला; पण मग मागाने मागून येऊन आम्हाला घाया घेतात. मी तुम्हाला या गोष्टींची आठवण यासाठी करून देत आहे की अजूनही असे साप पसरलेले आहेत. ते मागून येऊन आपल्याला चावतात, आपल्याला दुर्बळ करतात, अपमानित करतात, आणि आपण आजवर जे काही केले आहे ते धुळीला मिळविण्याचा प्रयत्न करतात.

आपण या ठिकाणी हा दिवस साजरा करण्यासाठी व जुन्या काळाचे सिंहावलोकन करण्यासाठी जमलो आहोत. आजचे काही निकडीचे प्रश्न आपल्या समोर आहेत. आपण एक मोठा प्रवास सुरू केलेला आहे. त्यामुळे जिकडे आपण चाललो आहोत त्या भविष्यकाळातही आपल्याला डोकावून पाहावयाचे आहे. स्वराज्याचा प्रवास आता संपला; आणि त्याहून मोठा अवघड प्रवास सुरू झाला. या देशातील 36–37 कोटी लोकांना एक दिलाने, हातात हात घालून हा प्रवास करावयाचा आहे. त्यांचे जीवन सुखाचे व्हावे, त्यांच्या अडचणी कमी व्हाव्यात, जीवनावश्यक गोष्टी प्रत्येकाला मिळाव्यात, स्वतंत्र भारतात जन्मल्यामुळे ज्यांच्यावर गुलामगिरीची सावली कधी पडली नाही ती आमची होतकरू मुलेबाळे सदैव स्वतंत्र राहावीत, त्यांचे मस्तक उन्नत राहावे, त्यांचे जीवन समृद्ध व्हावे आणि आपला व आपल्या देशाचा विकास त्याना करता यावा असा विचार करून आपण या मार्गाने निघालो. वाटेत हजारो खाचखळगे, हजारो संकटे आली, कधी पूर येऊन आम्हाला वाहून नेई तर कधी एखाद्या वाळवंटासारखी स्थिती होई. कधी पाऊस इतका जास्त पडे की त्याला तोंड देता-देता नाकी नऊ येत तर कधी अवर्षण पडून स्थिती अधिकच वाईट होई. अशी परिस्थिती होती. गेली अनेक वर्षे या देशाने कोणकोणत्या संकटांना तोंड दिले ते तुम्हाला माहीत आहे. त्रास झाला, कटकट झाली, परन्तु भारताचे शिर मात्र झुकले नाही. तो एक कसोटीचा काळ होता—जेव्हा आपण एका साम्राज्याशी सामना करीत होतो तो जुना काळ. परंतु त्यानंतर त्याहूनही कडक कसोटीचा हा काळ आला संकटामध्ये आपण कुठवर एक दिलाने राहू शकतो? कुठवर आपण मिळूनमिसळून काम करू शकतो? कुठवर आपण हाही टप्पा पार करू शकतो? —असा प्रश्न आमच्यासमोर उभा राहिला आमच्यात फाटाफूट असताना, दंगेधोपे चालू असताना हा प्रश्न उद्भवला एक माणूस दुसऱ्या माणसावर हात टाकतो याचा अर्थ काय? आम्ही आमची जुनी शिकवण विसरलो काय? आम्ही गांधीजींना विसरलो काय? भारताच्या हजारो वर्षांच्या इतिहासाचा आपल्याला विसर पडला काय? आपल्या ज्या भविष्यासाठी आपण राबत आहोत त्याचा विसर आपल्याला पडला काय? आपण आपल्या मुलाबाळांना विसरलो काय? आपण जेव्हा एकमेकावर हात टाकतो व दंगेधोपे करतो तेव्हा आपल्याला कसली आठवण असते? केवळ एखादी राजकीय गोष्ट साध्य करण्यासाठी आपण हे सारे करतो काय? याचे कारण तरी काय? मला काही कळत नाही. असो.

मी तुमच्यासमोर उभा राहतो आणि तुम्ही येथे आनंदोत्सव साजरा करण्यासाठी येता म्हणूनही मनात आनंद आहे. परन्तु त्याचबरोबर अवरा

वर्षानंतरही भारताच्या काही भागांत असा घटना घडत आहेत व आजच्या प्रसंगी घडत आहेत, याचे दुःखही मनात आहे. लोक आपसात भांडणतंटा करतात, एकमेकांना ठार मारतात, एकमेकांची मालमत्ता जाळतात. लोकांच्या या गफलती-पासून आपण सावध राहिले पाहिजे. या ठिकाणी मी कोणाला नावे ठेवण्या-साठी उभा राहिलो नाही- तें आपले काम नव्हे. येथे तुमच्यासमोर एखाद्या-पक्षाच्या वतीने मी उभा नाही, तर एक प्रवासी या नात्याने, तुमचा एक सह-प्रवासी म्हणून मी उभा आहे. तुम्हाला व या देशातील कोटयवधी लोकांना माझी अशी विनंती आहे की, आपण जरा आपल्या अंत:करणांत डोकावून पाहू या, आणि या वेळी आपले कर्तव्य काय आहे ते स्वत:ला व इतरांना समजाऊन देऊ या. आपले कर्तव्य, आपले धोरण काहीही असो, आपण शांततेने, एक दिलाने व अहिंसेने काम केले तरच त्यात यशस्वी होऊ, हे उघड आहे. ही एक अगदी ढोबळ गोष्ट आहे. तसे केले नाही तर आपली सगळी शक्ती एकमेकांच्या विरुद्ध खर्च होऊन जाईल. आपल्यांत मतभेद असतील तर आपण एकमेकांना समजाऊन सांगावे, एकमेकांना जवळ करावे. याशिवाय दुसरा मार्ग नाही- निदान या देशात तरी नाही. ही गोष्ट लोकांनी ओळखावी, अशी माझी इच्छा आहे.

आपण जगाशी चढया सुरात बोलतो व हितकारक सल्ले देतो. आपण पंचशीलचा ध्वज उभारला आणि लोकांचे लक्ष इकडे वेधले गेले इतर देशावर त्याचा काही परिणाम झाला ; परंतु आपल्या देशात काय घडतें आहे इकडेही आपण कधी-कधी पाहावे. तें पाहिले की शरम वाटते, आमचे मस्तक खाली होते. आम्ही स्वत:लाच नीट सांभाळू शकत नाही तर आम्ही दुसऱ्यांना हितकारक सल्ला कसा द्यावा? म्हणून माझी तुम्हाला व देशातील सर्व लोकांना अशी विनंती आहे की इतर प्रश्नासंबंधी आपण अवश्य विचार करावा, इतर मार्गांनीही जावे, परंतु सर्वांत पहिली, मूलभूत गोष्ट ही आहे की आपण आपल्याला सावरले पाहिजे एकमेकांशी भांडण्याचा हा मार्ग सोडून दिला पाहिजे. आपण हे ओळखले पाहिजे की भांडणे व मारामाऱ्या करून प्रश्नांचे निकाल लावण्याची आपली इच्छा असेल तर भारतात स्वातंत्र्य नाही, समाजवाद नाही अथवा लोकशाहीही नाही, असे म्हणावे लागेल.

तुमचे मत काहीही असले तरी भांडणाची धमकी देऊन तुम्ही त्याचा निर्णय कसा लावणार? कारण, ज्याच्याशी तुम्ही भांडाल तो तुमच्याशी भांडेल त्यामुळे तुम्हाला काही मिळणार नाही अथवा त्यालाही काही मिळणार नाही. आजकाल जगाची स्थिती अशीच झालेली आहे मोठमोठे देश शस्त्रास्त्रे, अॅटम बाँब व तोफेचे गोळे घेऊन बसले आहेत. ते जगाचा नाश करू शकतात हे सामर्थ्य त्यांच्याजवळ आहे परंतु लढाईच्या द्वारे जगाला सावरण्याचे सामर्थ्य त्यांच्याजवळ नाही. ते काम शांतीच्या द्वारेच होऊ शकेल. युद्धामुळे जगाचा नाश होईल

ही गोष्ट हळूहळू त्यांच्या लक्षात येऊ लागली आहे; तरीही भीतीमुळे सदासर्वकाळ तें युद्धाच्या तयारीतच गुतलेले असतात. तुम्हाला माहीतच आहे की गेल्या काही दिवसापासून पश्चिम आशियांतील देशांमध्ये खूपच धोक्याची परिस्थिती निर्माण झालेली आहे. अजून तेथे सैन्ये आहेत, सशस्त्र सैनिक सुसज्ज उभे आहेत. केव्हा काय प्रसंग येईल, या भीतीने आपण सदैव लढाईसाठी तयार राहिले पाहिजे, असे त्यांना वाटते. युद्ध होणार नाही अशी आशा आहे. ती जुनी भीती थोडी कमी झाली आहे. तेथील ते प्रश्न मुदतील आणि त्या देशातील आपले बांधवही पूर्णपणे स्वतंत्रतेने राहू शकतील, अशी आशा वाटते. तेथील ज्या अन्य देशानी पुष्कळ वर्षांपासून आपल्या स्वातंत्र्यासाठी प्रयत्न केला, संघर्ष केला, हळूहळू प्रगती केली त्यांचेही स्वातंत्र्य पूर्ण होईल व आपल्या इच्छेप्रमाणे, मैत्रीच्या वातावरणात आपले जीवन ते घालवू शकतील अशी आशा आहे.

अशी आहे जगातील इतर देशांची स्थिती. लक्षात ठेवा, जगात भारताची काही इज्जत आहे. भारत हा एक शहाणा, समजूतदार देश समजला जातो; कारण तो सहजासहजी बहकत नाही, सहजासहजी भटकून चुकीची गोष्ट करीत नाही, सहजासहजी कोणावर हात टाकीत नाही, अशी आमच्यासबंधी बहुतेक लोकांची समजूत आहे ही समजूत कितपत बरोबर आहे व कितपत चूक आहे, याचा तुम्हीच विचार करा. कारण ही समजूत बरोबरही आहे आणि चूकही आहे. बरोबर अशासाठी की या काळात, विशेषतः गांधीजींच्या काळात, आपण याची मोठी उदाहरणे दाखवून दिली आहेत—आपल्या सहनशीलतेची व अहिंसेची उदाहरणे. चूक अशासाठी की आमची अलीकडील वागणूक तशी नाही. म्हणून तुम्हाला माझी विनती आहे की तुम्ही यासंबंधी विचार करा. तिकडे गुजराथच्या शहरातील आमच्या तरुणांना काय झाले आहे? जेथे गांधीजींचा जन्म झाला होता, जेथील लोकांना गांधीजींनी आपली शिकवण सर्वांत अधिक दिली, जेथील लोक व्यापारी आहेत, उद्योगी आहेत, त्यागी आहेत, जेथील लोक भारतातील पुढारलेल्या लोकांपैकी समजले जातात, त्या गुजरातमध्ये लोकांना वेडाचा झटका येऊन त्यांनी स्वतः बदनाम व्हावे व भारताला बदनाम करावे, असे हे दूषित वारे कसे आले? गुजरात हा चांगला प्रदेश आहे इतर ठिकाणीही या गोष्टी घडतात. हे वारे वुठवर जाते, या बाबतीत आपण सावध राहिले पाहिजे याचा कोणत्याही निर्णयाशी किंवा धोरणाशी संबंध नाही. वेगवेगळी धोरणे असतील तर ती खुशाल चालावीत. हा स्वतंत्र देश आहे. आपापले स्वतंत्र मत बाळगण्याचा व इतरांना ते पटवून देण्याचा प्रत्येकाला हक्क आहे. परंतु बळजबरीने, बाहुबलाने, दंडुक्याने अथवा बदुकीने दुसऱ्याचे मत बदलण्याचा प्रयत्न करण्याचा अथवा निवाडा करण्याचा कोणालाही अधिकार नाही. कारण, याचा परिणाम काय होतो? त्यातून काही निकाल लागत नाही. त्याचा

परिणाम एवढाच होतो की हुल्लडबाजी माजते, दंगे होतात व विनाश ओढवतो. भारताच्या स्वातंत्र्यासाठी इतकी वर्षे संघर्ष केल्यानंतर व ते स्वातंत्र्य मिळविल्या-नंतर आपल्या दोषाच्या या घाईने, गोंधळात, विहिरीत आपण पडणार काय?

विचार करण्यासारखी गोष्ट आहे. आजचे तरुण चालले आहेत. उज्ज्वल भवितव्याचे एक दृश्य त्यांच्यासमोर आहे. ज्या भारताचे ओझे ते आपल्या शिरावर पेलणार आहेत ज्याला ते पुढे नेणार आहेत, ज्याच्यासाठी त्यांना या वेळी तयारी करावयाची आहे—मग ते शाळेत असोत, कॉलेजात असोत की आणखी कोठे असोत—त्या भारताचे उज्ज्वल भवितव्य त्यांच्यासमोर आहे. परंतु त्यांच्यांतील काहीजण बहकतात आणि मोठ्या गोष्टी विसरून क्षुद्र गोष्टीत, क्षुद्र भांडणांत पडतात. त्यामुळे ते स्वतःला निरुपयोगी बनविनात व देशाचीही काही सेवा करीत नाही. याचा आपण विचार केला पाहिजे. हे मोठे प्रश्न आहेत. आपण कोठे चाललो आहोत याचा विचार केला पाहिजे, समजून घेतले पाहिजे. इतक्या हजारो संकटांना तोंड देऊन आपण आज जेथे आहोत तेथे येऊन पोचलो आहोत, याचा अर्थ कोणाच्या धमकीमुळे, कोणाच्या दोषांमुळे हे काम थांबणार नाही, हे स्पष्ट आहे. हे काम अव्याहत चालू ठेवावयाचे आहे धैर्याने चालू ठेवावयाचे आहे—मग त्यात कितीही अडचणी, कितीही संकटे येईनात का! आपले सामर्थ्य कमी झाले तरी आपल्याला हा दोष काढून, फेकून द्यावयाचा आहे, आणि छाती पुढे काढून पुढे जावयाचे आहे. असो.

अकरा वर्षांचा काळ लोटला. एका राष्ट्राच्या जीवनात हा काही फार मोठा काळ नव्हे; तरीपण तो दुर्लक्ष करण्यासारखा काळ नाही. तुम्ही या अकरा वर्षांकडे वळून पाहा. या अकरा वर्षांत किंवा त्यापूर्वी भारताची काय स्थिती होती? आज जगाच्या रंगभूमीवर किंवा आपल्या घरात काय स्थिती आहे? तुमच्या, माझ्या व देशवासियांच्या हजारो तक्रारी आहेत. त्यांच्यापैकी पुष्कळशा बरोबर व काही चुकीच्या तक्रारी आहेत. आपल्यावर मागोमाग संकटे येत आहेत मी तुम्हाला सांगितल्याप्रमाणे किंवा बुडण्याच्या, पूर येण्याच्या, अवर्षणाच्या, दुष्काळाच्या, वगैरे अनेक आपत्ती आहेत वस्तूंचे भाव वाढत आहेत. मध्या ते कडाडलेलेच आहेत. लोकांना फार त्रास होत आहे; त्यामुळे त्यांनी तक्रार केली तर ते योग्यच होईल. मी ते नाकारीत नाही. अशा परिस्थितीतही काही लोक इतरांच्या अडचणींचा फायदा घेऊन स्वतःच्या नफाखोरीसाठी व्यापार करतात, या वेळी लोकांच्या उपयोगी पडण्याऐवजी त्यांना भारभूत बनतात, चुकीच्या मार्गाने जातात, आणि मग काळाबाजार वगैरे गोष्टी घडतात. याबद्दल तुम्ही तक्रार केली तर तुमची तक्रार बरोबर आहे जो कोणी अशा प्रसंगी अशा गोष्टी करीत असेल, देशातील जनतेचे हाल करीत असेल तो देशद्रोही आहे.

हे आहे तरी काय? कदाचित ही त्यांची दुर्बलता असेल. परंतु वस्तुतः जो कोणी अशा प्रसंगी अशा गोष्टी करीत असेल त्याने हे ओळखले पाहिजे की आपण देशाची

सेवा करीत नसून, देशाला पुढे नेत नसून देशाशी द्रोह करीत आहोत. याचा परिणाम आपल्यावर व देशावर काय होईल, याचा त्याने विचार केला पाहिजे. असो. आपल्या समोर हे मोठे प्रश्न आहेत—जगाचे प्रश्न. आपणही जगाचा भाग आहोत. त्या मुळे आपल्याला त्या प्रश्नामध्ये पडावे लागते. वस्तुतः आपले प्रश्न हे आमच्या देशाचे प्रश्न आहेत. आपल्या घराचा, गल्लीचा व शेजाऱ्याचा प्रश्न आहे. आपण दक्षिणेत कन्याकुमारीला व रामेश्वरला राहात असू किंवा काश्मीरात, किंवा पूर्वेकडे राहात असू की पश्चिमेकडे राहात असू. आपण एक आहोत, एक राष्ट्र आहोत. या राष्ट्राचे तुकडे कोणी करू शकणार नाही, आम्ही कोणालाही त्याचे तुकडे करू देणार नाही. आपण सारे भारताचे रहिवासी आहोत, नागरिक आहोत. आपण काही फक्त या आळीचे, या शहराचे किंवा या प्रदेशाचे नाही. आपण फक्त उत्तरेचे नाही, दक्षिणेचे नाही, पूर्वेचे नाही की पश्चिमेचे नाही. सर्वांनी हे समजून असावे की जो कोणी आमच्या विरुद्ध हात उगारील अथवा भारतीय जनतेला कमजोर बनविण्याचा प्रयत्न करील त्याला आम्ही विरोध केल्याशिवाय राहाणार नाही—मग ती एखादी बाहेरची शक्ती असो की अंतर्गत दडलेली असो. कारण ही सर्वात महत्त्वाची गोष्ट आहे. भारताचे स्वातंत्र्य व भारताचे ऐक्य ही पहिली गोष्ट आहे. ती जर नसेल तर भारताला समृद्धी कशी लाभेल? आपण जेव्हा असे म्हणतो की आम्ही आमच्या देशाला समाजवादाकडे नेणार आहोत, तेव्हा हा समृद्धीचाच प्रश्न असतो. आमचे पाय घसरले, आमच्याकडून चुका झाल्या व पुढेही होतील, हे खरे चुका कोणाकडून होत नाहीत? परंतु एका गोष्टीची गरज आहे—ती म्हणजे आमच्या अंतःकरणात एक आग धगधगत राहिली पाहिजे, आम्हाला एका दिशेला ढकलत राहाणारी एक प्रेरणा हवी; जरी आम्ही कोठे ठेचकळून पडलो तरी पुनः उसळून उठण्याची व उठून पुढे जाण्याची शक्ती आमच्यात हवी.

काही लोकांना असे वाटते की जेव्हा आपण एका बलाढ्य साम्राज्याच्या शक्तीविरुद्ध, तोफांविरुद्ध लढत होतो तेव्हा धैर्याची व शौर्याची गरज होती. परंतु तो काळ उरलला नाही परंतु या गफलतीत कोणी राहू नये. अजून या देशात प्राण आहे, पूर्वीपेक्षा अधिक प्राण आहे कधी कधी आपण गाफील बनतो आणि आपले लोक मार्गभ्रष्ट होऊन महत्त्वाच्या गोष्टी विसरून जातात आपल्यावर आणखी आघात व्हावेत, आणखी संकटे यावीत, हे कदाचित आपल्या हिताचेच असेल. कारण त्यायोगे आपण काय आहोत, आपला देश काय आहे, आपले कर्तव्य काय आहे याची आठवण पुनः आपल्याला होईल आणि आपण योग्य मार्गावर येऊ

आजच्या दिवशी आपण या ऐतिहासिक किल्ल्यावर जमतो. हा लाल किल्ला गेली अनेक वर्षे आमच्या गुलामगिरीचे प्रतीक होता आता तो आमच्या स्वातंत्र्याचे प्रतीक बनला आहे. या ठिकाणी आपण काही केवळ एक विधी पार पाडण्यासाठी·

जमत नसतो. आपण कोणती प्रतिज्ञा केली होती, कोणते संकल्प केले होते, कोणत्या शपथा घेतल्या होत्या त्याची स्वतःला आठवण करून देण्यासाठी आपण येथे जमतो. ते आपले कर्तव्यच आहे.आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी यापुढे आपल्याला कोणत्या मार्गाने जावयाचे आहे, याचे चिंतन करण्यासाठी आपण येथे जमतो. व ज्यांनी आम्हाला येथपर्यंत आणून सोडले त्यांचे व विशेषतः ज्याने आम्हाला मार्ग दाखविला त्या महापुरुषाचे, गांधीजींचे स्मरण करण्यासाठी आपण येथे जमतो. या ठिकाणी पुष्कळ मुले आहेत, तरुणही आहेत. त्यांनी गांधीजींना पाहिलेले नाही, त्यांच्या दृष्टीने गांधीजींचे जीवन ही एक कथा बनली आहे, आपल्या स्वातंत्र्याचे संपूर्ण आंदोलन हा एक इतिहास बनला आहे. कथा तर आहेच—शेकडो हजारो वर्षे टिकून राहणारी कथा. परंतु ती नुसती कथा नाही. ती एक शिकवण आहे, बोधग्रंथ आहे. त्यातून आपण सदैव धडे घेतले पाहिजेत. जेव्हा आपण चुकीच्या मार्गाने जाऊ लागू तेव्हा ते धडे आठवले पाहिजेत. विशेषतः ज्याने या देशाला उभे केले स्वतंत्र बनविले आणि त्याचसाठी आपले प्राण ओवाळून टाकले त्या गांधीजींचे स्मरण आपण सतत केले पाहिजे.

तुम्ही सगळे मिळून माझ्याबरोबर तीनदा जय हिंद म्हणा.

जय हिंद !
जय हिंद !
जय हिंद !

1958

# खरे स्वातंत्र्य : खड्यांचे स्वातंत्र्य

आज आपण पुनः एकदा या ठिकाणी एक वाढदिवस—आपल्या स्वतंत्र भारताचा वाढदिवस साजरा करण्यासाठी जमलो आहोत. आज पुनः आपण काय केले त्याचे सिंहावलोकन करावयाचे आहे; आणि यापुढे काय काय करावयाचे आहेते पाहण्यासाठी भविष्यकाळात दृष्टिक्षेप करावयाचा आहे. बारा वर्षे झाली. या देशाच्या; या राष्ट्राच्या, हजारो वर्षांच्या इतिहासात बारा वर्षे हा फार थोडा काळ आहे. येथे, दिल्लीच्या सभोवतालच्या मातीने व दगडांनी हजारो वर्षे आलेली व गेलेली पाहिली आणि आता ही बारा वर्षेही पाहिली. या अवधीत तुम्ही, आम्ही व भारतात राहणाऱ्यांनी जुन्या जमान्यातून, जुन्या आपत्तीतून, जुन्या दारिद्र्यातून स्वतःला बाहेर काढण्याची धडपड केली. हे अवघड कार्य होते—गुलामीतून सुटका करून घेण्यापेक्षाही अवघड. कारण त्यात आपले स्वतःचे दोष काढून टाकावयाचे होते, जी गेकडो ओझी आमच्या पाठीवर होती ती काढून टाकावयाची होती. बारा वर्षांत काय झाले व काय झाले नाही ते तुमच्यासमोर आहे. पुष्कळ चांगल्या गोष्टी झाल्या काही वाईट गोष्टी घडल्या. मला वाटते, भारताच्या भावी इतिहासात लिहिल्या जातील अशा अनेक गोष्टी घडल्या, आणि ज्यांनी आम्हाला दुर्बळ बनविले किंवा ज्यांच्यामुळे आमच्यातील उणीवा उघड झाल्या अशाही गोष्टी घडल्या.

आज आपण या लाल किल्ल्याजवळ जमलो आणि आपण आपला झेंडा पुनः फडकविला. या वेळी तुमच्या मनात कोणते विचार आहेत? भावी काळाविषयी तुम्हाला काय वाटते ? या बारा वर्षांत आपण बाहेरून व आतून पुष्कळ अडचणींना व आपत्तींना तोंड दिले, निसर्गाने धाडलेल्याही अनेक आपत्ती आपल्यावर कोसळल्या कधी पूर, कधी दुष्काळ तर कधी पिके वाईट आली आमच्या स्वत:च्या दोषांनीही आमचा फार पाठलाग केला त्यात पुन लोकांनी चुकीच्या मार्गाचे अनुसरण केले आपला स्वार्थ व हव्यास यांच्यापुढे देशाचे व समाजाचे हित कशात आहे याचा त्यांना विसर पडला. आपण मोठी कामे अंगावर घेतली आहेत, आणि या देशाला पुनः एक भव्य व प्रतिष्ठित राष्ट्र बनवावयाचे आहे हे ते विसरले त्यांनी तात्कालिक स्वार्थांत गुरफटून राष्ट्राचे, समाजाचे नुकसान केले सध्याही तुम्ही काही अडचणीत, त्रासात आहात महागाई व तत्सम गोष्टी त्या बाबतीत काहींना आपला नाइलाज आहे. अजून यांच्या गोष्टी पूर्णपणे आपल्या आटोक्यात आलेल्या नाहीत. परंतु त्या येतील काही अडचणी मानवनिर्मित आहेत, मानवाच्या स्वार्थातून निर्माण झालेल्या आहेत. कसेही असो. आपल्याला त्यांच्याशी लढा द्यावयाचा आहे. परंतु

आजच्या प्रसंगी आपल्याला विशेषतः या गोष्टींचे स्मरण करावयाचे आहे की आपण कोण आहोत? कोण बनू इच्छितो? कोणत्या मार्गाने जाऊ इच्छितो?

पुनः एकदा बारा वर्षांपूर्वीचा काळ आठवा. त्या वेळी आपले थोर पुढारी गांधीजी आपल्यांत होते व आपण त्यांच्याकडे पाहात होतो. वर्षानुवर्षे आम्ही त्यांच्याकडे पाहिले. अनेक वर्षे आम्ही त्यांच्या मार्गाने जाण्याचा प्रयत्न केला आणि त्या मार्गाने जाऊन आपल्याला यश मिळाले. त्या गोष्टींचे आपल्याला कितीसे स्मरण आहे? त्या आपण कितीसा आपल्यासमोर ठेवतो? आपले मुख्य कार्य म्हणजे आपल्या देशातील ऐक्य टिकवून धरणे हे आहे. या गोष्टीचे सतत स्मरण आपण कितपत ठेवतो? आपण जर वेगवेगळ्या तुकड्यांत विभागलो गेलो—मग ते तुकडे प्रांताचे असोत, भाषांचे असोत, जातींचे असोत, धर्मांचे असोत की दुसरे कसले असोत—तर आपली सारी शक्ती नष्ट होईल, आपला अधःपात होईल, आपण पुढे जाऊ शकणार नाही. मग आपला भावी इतिहास उज्ज्वल बनण्याऐवजी लहान-लहान जमातींचा झगड्यांचा इतिहास बनेल. म्हणून प्रथम आपण आपसात ऐक्य केले पाहिजे आणि आमच्यामध्ये असलेल्या भेदभावनेच्या जुन्या-नव्या भिंती पाडून जमीनदोस्त केल्या पाहिजेत. आपल्याला सदैव या देशाचा, भारताचा विचार करावयाचा आहे त्याच्या एखाद्या भागाचा नव्हे—मग तो भाग कितीही चांगला व सुंदर असेना का! कारण त्या भागात काही श्रेष्ठत्व असेल तर ते तो भारताचा भाग आहे म्हणून. तो भारताचा भाग नसेल तर आपल्या दृष्टीने त्याचे काही महत्त्व किंवा श्रेष्ठत्व संभवत नाही. ही गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे; कारण जुन्या जमान्यात वाढल्यामुळे तुकड्या-तुकड्यांनी राहण्याची, आपल्यातील जातिभेदाची आपल्याला इतकी सवय पडलेली आहे की मिळून-मिसळून राहण्याचे वळण अजून आपल्याला लागत नाही. हा दोष काढून टाकून आपल्याला त्यावरही विजय मिळवावयाचा आहे.

दुसरी गोष्ट अशी की आपले भावी ध्येय कोणते? ते आर्थिक आहे, सामाजिक आहे. भारतातून दारिद्र्याचे उच्चाटण करावयाचे आहे या सार्‍या गोष्टी बोलल्या जातात. त्या खर्‍याही आहेत. परंतु अखेर कोणत्या गजाने तुम्ही या गोष्टींचे मोजमाप करणार? गांधीजींनी एक गज आपल्याला सांगितला होता व आपण तो मान्य केला होता. तो म्हणजे भारतातील आम जनतेची किती प्रगती झाली आहे? खास लोकांची, उच्च वर्गीयांची खूप प्रगती झालेली आहे. त्यांची काही विशेष काळजी करण्याचे कारण नाही. ते आपली काळजी घेऊ शकतात. गरज वाटल्यास आवाज चढवून तक्रारही करू शकतात परंतु जे आम लोक आहेत, जी मूक जनता आहे, विशेषतः जे खेड्यापाड्यांतून राहातात, त्यांची काळजी कोण करणार? त्यांना कोण वर काढणार? कारण, तुम्ही लक्षात ठेवा, दिल्ली शहर हे भारतातील व जगातील एक

धाम शहर आहे आणि दिल्लीत राहणारे आपण लोक एका अर्थाने भाग्यवान आहोत परंतु दिल्ली म्हणजे कांही भारत नव्हे, ती भारताची राजधानी आहे. भारत हा लाखो खेड्यांचा बनलेला आहे; आणि जोपर्यंत ही लाखो भारतीय खेडी उठत नाहीत, जागी होत नाहीत, पुढे जात नाहीत, तोपर्यंत दिल्ली, मुंबई, कलकत्ता अथवा मद्रास ही भारताला पुढे नेऊ शकणार नाहीत. म्हणून आपण आपल्यासमोर नेहमी ही लाखो खेडी ठेवली पाहिजेत. ती कशी पुढे जातील, ती कशी प्रगती करतील, याचा विचार आपण केला पाहिजे.

तुमच्या व माझ्या प्रयत्नांनी ती अवश्य प्रगती करतील परंतु अखेर ती आपल्या स्वतःच्या प्रयत्नांनी, आपल्या हिंमतीवर, आत्मविश्वासाच्या जोरावर पुढे जाणार परंतु या वेळी आपल्यावर जे एक संकट आलेले आहे ते असे की आपले लोक स्वतः-वर अवलंबून राहाणे विसरले आहेत त्यांना असे वाटते की इतर लोक आपल्याला मदत करणार आहेत. आपल्या खेड्यातील लोक धट्टेकट्टे आहेत, चांगले आहेत. परंतु दर वेळी दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहाण्याची त्यांना सवय लागली आहे. स्वतः उठून काम करण्याऐवजी सरकारने व सरकारी अधिकाऱ्यांनी आपल्यासाठी काही करावे असे त्यांना वाटते. त्यांनी स्वतः काम करावे, यासाठी तर योजना आखण्यात आलेल्या आहेत—सामुदायिक विकास योजना, समाजविकास योजना वगैरे त्यांची अमल-बजावणी योग्य प्रकारे झाली तर भारताच्या व जगाच्या दृष्टीने ती एक क्रांतिकारक गोष्ट होईल. सबंध भारतातील साडेपाच लाख खेडी जागी झाली पाहिजेत. तेथे केवळ सरकारी अधिकारी काम करीत असतील तर ती काही क्रांती नव्हे ती एक सामान्य पद्धत झाली—नोकरशाहीची पद्धत. ती निष्प्राण असते कोणत्याही राष्ट्रात प्राण आतून येत असतो, तो वरून ओतता येत नाही म्हणून आपल्यासमोर हा एक बिकट प्रश्न आहे आपण सर्वांनी स्वतःच्या पायावर उभे राहून महत्कार्याने काम केले पाहिजे—मग आपण शहरात राहाणारे असू की खेड्यात राहणारे.

सरकारने व अधिकाऱ्यांनी जनतेला सर्वतोपरी साह्य केले पाहिजे, हे खरे; परंतु अधिकाऱ्यांच्या मदतीने राष्ट्र पुढे जात नसते ते स्वतःच्या पायांनी पुढे जात असते. ही गोष्ट विशेषतः खेड्यांना लागू आहे म्हणून मी म्हटले की सहकार्याने, सहकारी संघाच्या द्वारे काम व्हावे, म्हणजे लोकांची शक्ती वाढते. लोकांनी सहकार्याने काम करण्यास व स्वतःवर अवलंबून राहाण्यास शिकले पाहिजे याचा अर्थ असा नव्हे की सरकारने प्रत्येक गोष्टीत ढवळाढवळ करावी सरकारने कमीत कमी हस्तक्षेप करावा व लोकांनी आपली सूत्रे आपल्या हाती घ्यावीत, अशी माझी इच्छा आहे. अर्थात ज्या मोठ्या सैद्धांतिक गोष्टी आहेत त्या आधी नक्की ठराव्यात. अशा प्रकारे लक्षात ठेवण्याची ही दुसरी गोष्ट. कोणत्या गजाने आपण भारताची प्रगती मोजणार?

तो गज एकच आहे. तो म्हणजे येथील चाळीस कोटी लोक कशी प्रगती करतात? राष्ट्रे कशी पुढे जातात? गरीब देश कसे समृद्ध बनतात? ते समृद्ध बनतात स्वतःच्या परिश्रमांनी.

लोक इतरांच्या दानधर्माने वर उठत नसतात. ते उठतात आपल्या मेहनतीने तेव्हां आपले लोक स्वतःच्या परिश्रमांनी जे निर्माण करतील, जी संपत्ती उत्पन्न करतील ती देशभर पसरेल आणि याच मार्गाने लोक पुढे जातील. जगातील कांही देश संपन्न आहेत, काही गरीब आहेत. संपन्न देशांकडे तुम्ही पाहा. ते कसे संपन्न बनले? उद्योगाने व परिश्रमाने—मग ते देश यूरोपातील असोत, अमेरिकेतील असोत की आशियातील असोत. त्या संपन्न देशांच्या पाठीशी उद्योगाचे, अहोरात्र केलेल्या परिश्रमाचे व ऐक्याचे बळ आहे. या दोन गोष्टींनी त्यांना पुढे नेले. त्यांच्याशिवाय कोणी मोठा होत नाही किंवा पुढे जात नाही.

आपल्या येथे, भारतात अद्यापि अंग मोडून मेहनत करण्याची सवय सर्वसामान्य लोकांना लागलेली नाही. हा काही आपला दोष नव्हे. परिस्थितीमुळे अशा सवयी लागत असतात. परंतु यूरोपचे, जपानचे, चीनचे, रशियाचे किंवा अमेरिकेचे लोक जितके काम करतात तितके आपण करीत नाही, ही गोष्ट काही खोटी नाही. ती राष्ट्रे जादूने समृद्ध बनली आहेत, असे समजू नका. ती आपल्या बुद्धीने व परिश्रमानी समृद्ध बनली आहेत. तेव्हा आपल्यालाही परिश्रमाने व बुद्धीनेच पुढे जाता येईल. इतर काही मार्ग नाही. एखाद्या जादूच्या काडीने आपल्याला पुढे जाता येणार नाही; कारण जग हे मानवाच्या श्रमावर चालत असते. माणसाच्या परिश्रमातून साऱ्या जगातील संपत्ती निर्माण होत असते. शेतात काम करणारा शेतकरी असो, कारखान्यात काम करणारा कामगार असो, कारागीर असो की दुकानातील नोकर असो, त्यांच्याकडूनच काम होत असते. काही मोठे अधिकारी कचेरीत बसून व्यवस्था व संचालन करतात; पण ते संपत्ती निर्माण करीत नाहीत. शेतकरी अथवा कारागीर आपल्या परिश्रमाने संपत्ती निर्माण करतात. सारांश, आपल्याला आपले काम, आपले परिश्रम वाढविले पाहिजेत.

तुम्हाला माहित आहे की या वेळी आपण तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या उंबरठ्यावर आहोत. पहिल्या दोन योजना पार पडल्या. त्यांच्यातून आपल्याला फायदा झाला, आणि जसजसे आपण पुढे जाऊं लागलो तसतसे आपले प्रश्नही वाढत गेले त्या प्रश्नांनी आपल्याला वेढले, आपले हातपाय बांधले आणि पुष्कळदा त्यांचे ओझे आपल्याला असह्य झाले. परंतु तरीही आपण पुढे जात राहिलों. नवे नवे प्रश्न आपल्यासमोर उभे राहात आहेत, हे आपण पुढे चाललो आहोत याचेच चिन्ह आहे. जो पुढे जात नाही त्याच्यासमोर प्रश्नही नसतो व उत्तरही नसते आजही आपण समस्यांनी व चिंतांनी वेढलेले आहोत. परंतु त्या समस्या व चिंता एका विकासोन्मुख दशापुढील आहेत. तो देश मुळातून विकसित होत आहे, परंतु त्या विकासाचा त्रासही त्याला सहन करावा लागतो.

आजकाल मोठमोठे, नाना प्रकारचे लोखंडाचे व पोलादाचे कारखाने उभारले जात आहेत. मोठे याचा अर्थ काय ? याचा अर्थ असा की कोणताही कारखाना रिकामा नाही. त्या प्रत्येकातून एक नव जीवन निर्माण होईल व त्या योगे भारताच्या कोन्याकोपऱ्यांत मोठमोठे उद्योगधंदे सुरू होतील. तो एक पाया बनेल तेथे लाखो व्यक्तींना काम मिळेल आणि ते लाखो लोक आपल्या श्रमातून संपत्ती निर्माण करतील.

या दृष्टिकोणातून तुम्ही सगळ्या पंचवार्षिक योजनांकडे पाहा. आपल्याला काही फक्त एकच गोष्ट तयार करावयाची नाही. आपल्याला स्वतंत्र व समृद्ध भारताची प्रचंड इमारत उभारावयाची आहे. आता नुकताच तिचा पाया घालण्यात आलेला आहे. हा पाया जोपर्यंत मजबूत बनणार नाही तोपर्यंत ती इमारत कशी मजबूत बनेल ? पाया दिसत नाही. परंतु आता तो दिसू लागला आहे. हे सगळे दोन पंचवार्षिक योजनांमध्ये झाले व होत आहे. तिसरी योजना दीड-दोन वर्षांनंतर सुरू होईल ती तुमच्या दारात आलेली आहे. अजून तिची तयारी चालू आहे. ती तुम्ही समजून घ्या. कारण तीही तुम्हाला आराम करू देणार नाही आपल्याला जोर करून, परिश्रमाने तीही पार पाडावयाची आहे. परिश्रमाशिवाय त्रास सोसल्याशिवाय कोणतेही राष्ट्र पुढे जात नसते. जे लोक काम करीत नाहीत ते ढिले पडतात. त्याचा देश ढिला पडतो आणि त्यांची पावले मंदावतात.

सारांश आपल्यासमोर पुन: परीक्षा, कसोटी आहे. जगाचे एक आव्हान आहे काही असे जगाचे डोळेही आपल्याकडे आहेत. त्यांना वाटते की, हा एक मोठा समर्थ देश आहे. याने या कालातही महात्मा गांधीजी सारखा महापुरुष निर्माण केला. ज्याने महात्मा गांधींसारख्या पुरुषाला जन्म दिला तो हा महान देश आज काय करीत आहे ? आपल्याला फक्त विकास योजनाच पार पाडावयाच्या नाहीत;

कारखाने उभारणे, शेतीची सुधारणा करणे व अधिक धान्य पिकविणे, एवढ्याच गोष्टी आपल्याला करावयाच्या नाहीत तर ज्या ज्या गोष्टींची गरज आहे ती प्रत्येक गोष्ट आपल्याला करावयाची आहे. पण या सान्या गोष्टी आपण कशा करणार आहोत ? मस्तक उंच करून की मान खाली घालून व वाईट मार्गाचा अवलंब करून ? ही लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे. कारण गांधीजींनी आपल्याला जो पहिला, दुसरा व तिसरा धडा शिकविला तो हाच आहे की मस्तक सदा उंच ठेवा कधीही वाईट गोष्ट करू नका, चुकीच्या मार्गाने जाऊ नका, स्वार्थांध बनून देशाचे नुकसान करू नका. ही त्यांची मूलभूत शिकवण होती—मोठ्यांसाठी व मुलांसाठी. ही शिकवण जेव्हा आपण विसरतो तेव्हा आपला अधःपात होतो. आज बारा वर्षे संपून आपण तेराव्या वर्षात पदार्पण करीत आहोत. तुम्ही छाती पुढे काढून पाय उचला, खांद्याला खांदा लावून, हातात हात घालून पुढे चला, आणि आपल्या मुक्कामावर आपण वेळेवर जाऊन पोहोचू असा निश्चय करून चालू लागा.

1959

जय हिंद !

# आमचे ध्येय : समाजवाद

काल आपण जन्माष्टमी साजरी केली. आज आपण स्वतंत्र भारताचा जन्मदिवस साजरा करण्यासाठी जमलो आहोत. तुम्हाला आठवते 13 वर्षांपूर्वी याच ठिकाणी हा आपला प्रिय झेंडा पहिल्यांदा लाल किल्ल्यावर फडकविण्यात आला होता आणि त्याने जगाला सांगितले होते की एक नवे राष्ट्र जन्माला आले आहे, एक नवा तारा उगवला आहे आपण आनंदोत्सव साजरे केले होते; परंतु वस्तुत: तो दिवस जेवढा जुन्या संस्मरणांचा होता तेवढा आनंदोत्सव साजरा करण्याचा नव्हता. आपण ज्या प्रतिज्ञा घेतल्या होत्या त्या काही अंशी पूर्ण झाल्या होत्या; परंतु त्या पूर्ण होत असतानाच नव्या आपत्ती ओढवल्या होत्या, नवे प्रवास नजरेसमोर उभे राहिले होते. यामुळे पुन: आपले मन घट्ट करण्याची, आपले शरीर ताठ करण्याची, आपले मस्तक उंच करण्याची व आगेकूच करण्याची गरज निर्माण झाली. एक टप्पा गाठला, परंतु प्रवास संपला नाही. दुसरा टप्पा लगेच समोर उभा राहिला; आणि आपण पुढे निघालो उचसखल रस्त्यावरून चालताना ठेच लागून आपण पडलोही; परंतु जेव्हा जेव्हा आपण आपल्या जुन्या सिद्धांताचे, जुन्या गोष्टींचे, आपले जुने थोर नेते जे गांधीजी त्यांचे स्मरण केले, तेव्हा तेव्हा आपल्यात शक्ती आली. आज आपण या ठिकाणी जे जमलो आहोत ते काही केवळ गमत म्हणून नव्हे, मौजेखातर नव्हे किंवा मौज पाहाण्यासाठी नव्हे; तर पुन: एकदा आपल्या जुन्या प्रतिज्ञांना उजाळा देण्यासाठी, जुन्या गोष्टींचे स्मरण करण्यासाठी व भविष्यकाळात टोकावण्यासाठी येथे जमले आहोत, आपल्याला परिश्रम, बलिदान, उद्योग, वगैरे गोष्टींनी स्वातंत्र्य मिळाले; परंतु स्वातंत्र्य मिळाल्यानंतर त्या जनतेचे कर्तव्य संपते, असे जर तुम्ही समजत असाल तर ती चूक आहे स्वातंत्र्याचा लढा कधी संपत नाही. तो सतत चालत राहातो, त्याच्यासाठी सदैव परिश्रम करावे लागतात, बलिदान करावे लागते, त्याग करावा लागतो तेव्हा ते टिकते जेव्हा एखादा देश किंवा समाज शिथिल बनतो, कमकुवत बनतो, महत्वाच्या गोष्टी विसरून क्षुद्र भांडणात अडकतो तेव्हा लागलीच त्याचे स्वातंत्र्य घसरू लागते म्हणून मी म्हणालो की आजचा दिवस मनोरंजन करण्याचा दिवस नाही पुन: एकदा प्रतिज्ञा करण्याचा, शपथ घेण्याचा आणि आपण आपले कर्तव्य पार पाडले की नाही हे आपल्या मनालाच विचारण्याचा हा दिवस आहे. कोणत्याही देशाचे किंवा समाजाचे पहिले कर्तव्य कोणते असते ? आपले स्वातंत्र्य मजबूत बनविणे व ते टिकविणे हे पहिले कर्तव्य असते; कारण त्याला तुम्ही दुय्यम स्थान दिले तर इतर गोष्टीही नाहीशा होतात म्हणून अमुक गोष्ट आपल्या देशाचे स्वातंत्र्य व ऐक्य कायम टिकविते की नाही

आणि आपल्या देशाच्या प्रगतीला हातभार लावते किंवा नाही, हाच निकष प्रत्येक गोष्टीला लावावयाचा असतो. जर आपल्यापैकी कोणी ही गोष्ट विसरून दुसऱ्या गोष्टी समोर ठेवील, जर आपल्यापैकी कोणी देशाला विसरून आपल्या प्रांताला अथवा प्रदेशाला समोर ठेवील, जर आपण कधी या संप्रदायात तर कधी त्या संप्रदायात जाऊ, जर आपण आपल्या जातीला देशापेक्षा अधिक महत्त्व देऊ, जर आपण आपल्या भाषेला राष्ट्राहून श्रेष्ठ मानू तर आपला नाश होईल, आपल्या देशाचा नाश होईल. तसे पाहिल्यास या साऱ्या गोष्टी त्यांच्या त्यांच्या स्थानी चांगल्या आहेत. आपले शहर आहे, आपला प्रांत आहे, आपली पेठ आहे. ते सारे आपल्याला लख-लाभ होतो. आपले कुटुंब असते, आपले घराणे असते, त्याच्याविषयी आपल्याला प्रेम वाटते. परंतु जर आपण आपल्या कुटुंबाला आपल्या देशापेक्षा श्रेष्ठ मानले जर आपण आपल्या शहराला, प्रदेशाला, भाषेला, संप्रदायाला, कोणत्याही गोष्टीला आपल्या देशापेक्षा श्रेष्ठ मानले तर पुनः आपल्या देशाचा अधःपात सुरू होईल आणि निश्चितपणे त्याचा अधःपात होईल. या गोष्टीची आठवण करून देण्याची वेळ आता आली आहे. तसा प्रसंग आला आहे, म्हणून मी ती आठवण करून देत आहे; कारण आपल्या लोकांना या गोष्टींचा विसर पडू लागला आहे. चाळीस पन्नास वर्षांचे परिश्रम, त्याग व बलिदान यांच्या बळावर आपण आपला देश कसा घडविला, हे ते विसरतात. आम्ही—मी नव्हे—आमच्या राष्ट्राने, गांधीजींच्या नेतृत्वाने देश घडविला व घडवून त्याला मजबूत बनविले त्याला एक मोठे शस्त्र—शांततेचे शस्त्र—बनविले. त्या शस्त्रानेच आपण स्वराज्य मिळविले.

स्वराज्य मिळविणे काय अवघड होते ? स्वराज्य मिळालेच असते ज्या वेळी आपल्या देशात ऐक्य झाले, परिश्रम करण्याची ताकद आली तेव्हा स्वराज्य मिळाले. लक्षात ठेवा, आपले मन स्वच्छ असेल, आपली बुद्धी निकोप असेल, आपण एकजुटीने व निश्चयनेने कार्य करीत असू तर बाहेरचा कोणताही शत्रू आपले फारसे नुकसान करू शकणार नाही या देशाला बाहेरचा धोका कधीच नव्हता. धोका होता आतला. आपसातील दुही, दुर्बलता, फाटाफूट या गोष्टी देशाला कमकुवत बनवतात याच गोष्टींनी जुन्या काळी, शेकडो वर्षांपासून या देशाला दुर्बळ बनविले आणि बाहेरच्या लोकांनी येऊन आम्हाला जिंकले. ते स्वतःच्या सामर्थ्याने येथे आले नाहीत. ते आले आमच्या दुबळेपणामुळे, आमच्या मूर्खपणामुळे. आता पुनः हा दुबळेपणा व मूर्खपणा कोठे कोठे डोके वर काढू लागला आहे. कधी भाषेच्या प्रश्नावरून, कधी प्रांताच्या प्रश्नावरून लढण्यासाठी मैदानात उतरण्याचा लोक प्रयत्न करीत असतात. जिच्यासमोर आपल्याला मस्तक नमवा-वयाचे आहे ती मूलभूत गोष्ट म्हणजे आपला देश आहे, देशाचे ऐक्य आहे

याचा त्यांना विसर पडतो. ज्याला या गोष्टीचा, आपल्या देशाचा विसर पडतो तो कितीही लंब्याचवड्या गप्पा मारीत असला तरी तो देशाचे नुकसानच करतो. ही गोष्ट नीट लक्षात ठेवली पाहिजे. केवळ लक्षात ठेवून भागणार नाही तर मी तुम्हाला सांगतो की प्रत्येक भारतीयाने आपले अंतःकरण तपासून आपण कोठे आहोत, हे पाहण्याची वेळ आली आहे. आपण आपल्या देशाच्या बाजूला आहोत की एखाद्या गटाच्या बाजूला, या प्रश्नाचे उत्तर तुमच्यापैकी प्रत्येकाला—पुरुषाला, स्त्रीला व मुलाला—द्यावयाचे आहे. या बाबतीत कसलीही ढिलाई, फसवणूक किंवा वंचना होता कामा नये, आपण आपापले सवते सुभे बनवून लढत आहोत. आपल्या सरहद्दीवर काय चालले आहे, आजकालच्या जगात या वेळी काय उलाढाली चालल्या आहेत, इकडे आपले लक्षच नाही. मोठमोठे लष्करी पहिलवान जगात लढाईची तयारी करीत आहेत. जगामध्ये केव्हा भडका उडेल ते सांगता येत नाही. अशा वेळी आपण आपल्या देशाचे ऐक्य विसरून, जगातील परिस्थितीकडे काणाडोळा करून जर त्या क्षुल्लक गोष्टीत गुंतून पडलो तर भावी इतिहासकार या काळाविषयी काय लिहितील ? ते असे लिहितील की भारतीय लोकांना एक महान नेता मिळाला—गांधी—आणि त्याने अधोगतीला गेलेल्या गुलाम भारतीयांना एकजुटीने काम करण्यास शिकविले, आपल्यामध्ये असलेल्या भेदभावनेच्या भिंती पाडून टाकण्यास सांगितले जे बिचारे समाजाच्या तळाशी होते, पददलित होते, हरिजन बांधव होते, त्यांना वर काढले, कारण त्याच्या समोर हे ध्येय होते की भारतातील सर्व लोकांचे हित व्हावे, सर्वांनी स्वतंत्र व्हावे—मग त्यांचा धर्म किंवा जात कोणतीही असो. स्वातंत्र्य आले. हे स्वातंत्र्य कोणासाठी आले ? ते काय मूठभर लोकांसाठी आले ? ज्याला तुम्ही काही दिवसांसाठी पंतप्रधान बनविले त्या जवाहरलाल साठी आले ? अनेक जवाहरलाल येतील व जातील. इतर लोकही येतील व जातील. परंतु भारत मात्र नुसता येत असतो, तो जात नसतो. तो कायम राहाणार आहे. सारांश, भारतातील चाळीस कोटी स्त्री-पुरुष व मुले ही स्वातंत्र्याचे भागीदार आहेत, वारसदार आहेत. त्यांना जेव्हा या स्वातंत्र्याचा पूर्ण फायदा मिळेल तेव्हाच हे स्वातंत्र्य पूर्ण होईल. यासाठीच आम्ही प्रयत्न केला व आजही करीत आहोत. माझ्या भारतातील चाळीस कोटी स्त्रीपुरुष भारताच्या स्वातंत्र्यात बरोबरीने भागीदार बनावेत, यासाठी पंचवार्षिक योजना व तत्सम गोष्टी आहेत. म्हणूनच आपण म्हणतो की आमचे ध्येय समाजवाद हे आहे. ज्या समाजात सर्व लोक समान असतील असा समाज निर्माण करणे हे आपले ध्येय आहे.

ही एक अवघड गोष्ट आहे. ती एकदम होऊ शकणार नाही; कारण तिच्यात हजारो घाचपळी, अडचणी व अडथळे आहेत. एखाद्या माणसाला तुम्ही एकदम बदलू शकत नाही. तुम्ही एकदम चाळीस कोटी लोकांना किंवा देशाला बदलू शकणार नाही. परंतु जर तुम्ही आपण कोठे जात आहोत, समाजवादी सिद्धांतावर आधार-लेला समाज कसा निर्माण होऊ शकेल या विषयीचे चित्र सतत आपल्या डोळ्यासमोर ठेवले तर आपण नक्कीच त्या मुक्कामावर जाऊन पोहोचू.- ज्या समाजव्यवस्थेत सर्वांना—मग ते खेड्यांत राहणारे असोत की शहरांत राहणारे असोत, सारखे अधिकार असतील, सर्वांना विकासाची समान संधी मिळेल असा समाज आपल्याला बनवावयाचा आहे. त्यासाठी आपण प्रयत्न केला, देशाची संपत्ती आपल्या परिश्रमानी वाढविली आणि तिचे वितरण नीट होते की नाही, काही मूठभर लोकांच्या खिशांतच ती जात नाही ना, हे पाहिले तर त्या प्रयत्नांत आपल्याला नक्की यश मिळेल. या कामी खूप काळ लागतो. ती काही जादू नाही किंवा जपमाळ फिरवून तें साध्य होत नसते. परिश्रमाने, घाम गाळून व कधी कधी रक्त सांडूनही अशा गोष्टी साध्य होत असतात. तेव्हा भावी इतिहासकार आपल्या इतिहासात असे लिहितील की "होय, भारतातील लोक वरून खालपर्यंत, हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत खडबडून जागे झाले आणि उठले. त्याचे मस्तक उंचावले. आपल्या पाठीवर असलेलें पुष्कळसें ओझें त्यांनी खाली फेकून दिलें. आपले थोर नेते गांधीजी यांच्याकडून धडा घेऊन, पुढे होऊन त्यांनी भारताला स्वतंत्र केले. सेंकडो वर्षानंतर पुनः एकदा भारत चमकू लागला. पुनः त्याचा आवाज येऊ लागला. जगाने त्याचा तो आवाज ऐकला व त्याच्यावर त्याचा परिणाम झाला, कारण तो भारताचा खरा आवाज होता. त्या काही इकडून तिकडून घेतलेल्या घोषणा नव्हत्या. जगाने तो आवाज ऐकला तेव्हा त्याची कदर झाली.

"परंतु त्यानंतर त्याच भारतातील ज्या लोकांनी हिम्मत दाखविली होती तेच लोक हतवीर्य बनले, व चुकीच्या मार्गाला लागले व आपसात भांडू लागले. कधी धर्मांच्या, कधी जातींच्या, कधी भाषेच्या तर कधी प्रांताच्या नावाने ते झगडू लागले. या क्षुल्लक गोष्टीवरून ते जेव्हा आपसांत मारामाऱ्या करू लागले तेव्हा जगाला वाटेल हा काय मूर्खपणा आहे? यांची पारख करण्यात आपली चूक झाली की काय?" यासंबंधी आजच्या प्रसंगी तुम्ही जरा गंभीरपणे विचार करा, कारण मी तुम्हाला सांगितल्याप्रमाणे आजचा दिवस हा मौज करण्याचा दिवस नसून स्मरण व चिंतन करण्याचा, आपल्या अंतःकरणात डोकावून पाहाण्याचा व प्रतिज्ञा करण्याचा दिवस आहे. म्हणून आजच्या प्रसंगी जर काही लोक असे म्हणत असतील की त्यांना काही विशिष्ट गोष्टींचे दुःख वाटते—त्यांचे ते दुःख कदाचित खरेही असू शकेल, त्या बाबतीत

मत्र काही म्हणावयाचे नाही—म्हणून आम्ही हा दिवस साजरा करणार नाही, तर त्यावरून एवढेच दिसून येते की ते क्षुद्र गोष्टींत गुरफटले आहेत आणि आजच्या दिवसाचे काय महत्व आहे, याचा त्यांना विसर पडला आहे. भारत काय आहे व भारतमाता म्हणजे काय, याचा त्यांना विसर पडला आहे. या भारतमातेपुढे साऱ्या गोष्टी तुच्छ आहेत—मग त्या कोणत्याही असोत. प्रांत असो, भाषा असो, दुःख असो की आनंद असो या दृष्टिकोणातून आपण या गोष्टीकडे पाहिले पाहिजे. तुम्हाला माहित आहे की एक क्लेशदायक, अस्वस्थ करणारी दुर्घटना नुकतीच घडली. ही दुर्घटना आपल्या देशात, आपल्या प्रदेशात घडली आणि आसाम व बंगाल हे आपले दोन मोठे प्रदेश त्या दुःखात, आपत्तीत व अडचणीत सापडले. ही आपत्ती आपल्याला दूर करावयाची आहे; आणि आपण ती दूर करू यात मुळीच शंका नाही. परंतु लोक आपत्तीत सापडून एकमेकाविरुद्ध क्रुद्ध होऊन, एकमेकांना धावरून परिस्थिती मावरू देत नाहीत. हे काही पटत नाही. हे काही बरोबर नव्हे.

लक्षात ठेवा की जगात पुष्कळ वाईट गोष्टी आहेत; परंतु त्यातील सर्वांत अधिक वाईट गोष्ट—मग तिला तुम्ही दोष म्हणा, व्यंग म्हणा, दुर्बळता म्हणा, गुन्हा म्हणा, पाप म्हणा किंवा दुसरे काही म्हणा—भीती ही आहे. भीतीहून अधिक वाईट गोष्ट दुसरी नाही, कारण जगातील साऱ्या वाईट गोष्टी भीतीपासून उत्पन्न झालेल्या आहेत. एखाद्या माणसात किंवा राष्ट्रात एकदा भीती शिरली की इतर सारे दोष त्यात आपोआप शिरतात. तो खोटारडा बनेल, फसव्या बनेल व वाटेल ते करील त्याचे मस्तक सदा खाली राहील, मान वर करण्याचे साहस त्याच्यात असणार नाही. भारतात जे सामर्थ्य आले होते ते गांधीजींमुळे आले होते. त्या पुरुषाने आम्हाला शक्ती दिली, आमच्या मनातून भीती काढून टाकली मोठमोठ्या साम्राज्यांची भीती काढून टाकली व आम्हाला एकता शिकविली. अशा स्थितीत आसाम किंवा बंगालमध्ये एकत्र राहणाऱ्या लोकांनी एकमेकांना भ्यावे, याचा अर्थ काय? त्या विचाराने सापडून अस्वस्थ होऊन, आसाम व बंगाल यांच्यापेक्षाही एक गोष्ट अधिक मोठी आहे, ती म्हणजे भारत देश, याचा त्यांना विसर पडावा, याचा अर्थ काय? जे लोक भारताला विसरतात ते बंगालचीही सेवा करीत नाहीत अथवा आसामचीही सेवा करीत नाहीत ज्या लोकांना आजच्या दिवशीही आपला पहिला धर्म, आपले प्रथम कर्तव्य काय आहे, याचा विसर पडला असेल त्यांनी चुकीने, फसून का होईना, आपल्या देशाशी इमान राखले नाही, असेच म्हणावे लागते. आजच्या प्रसंगी आपण सर्वांनी ही गोष्ट नीट समजून घेतली पाहिजे आणि आपल्या देशातून असले दुर्गुण काढून टाकण्याचा निर्धार केला पाहिजे. तुम्ही जरा इकडे बघा—दिल्लीजवळ पंजाब आहे. काही दिवसांपासून तेथे एक विचित्र खेळखंडोबा चालला आहे—भाषेसाठी व प्रांताच्या नावाने. या गोष्टी चांगल्या आहेत की वाईट, याची

चर्चा करण्याचा हा प्रसंग नव्हे. परंतु ज्या गोष्टी पंजाबात घडल्या आहेत आणि ज्या पद्धतीने तेथे घटना घडत आहेत ते सारे वाईट आहे, चुकीचे आहे, भारतीय स्वातंत्र्याला मारक आहे. पंजाबी भाषा ही एक रुबाबदार भाषा आहे, चांगली भाषा आहे, सामर्थ्यवान भाषा आहे, आणि मला असे वाटते की ती भाषा शिकण्याचा प्रत्येक पंजाब्याला हक्क आहे, नव्हे, ती भाषा शिकणे हे त्याचे कर्तव्य आहे. तो ती शिकत नसेल तर एका मोठ्या संपत्तीवर पाणी सोडीत आहे, असे म्हणावे लागेल ती भारताचीच एक संपत्ती व धन आहे. हिंदी व पंजाबी, बंगाली व आसामी हे सारे आपल्या थैलीतील सोन्याचे दागिने आहेत, जडजवाहीर आहे. त्यात आपली संस्कृती आहे. त्यांच्यावरून ही भांडणे का उद्‌भवतात तेच मला कळत नाही. भारतातील रिकामटेकडे, क्षुद्र मनाचे, अडाणी व नालायक लोक एका भाषेला दुसऱ्या भाषेविरुद्ध उभी करतात. जो लायक असतो तो दुसऱ्याकडून शिकतो. दुसऱ्याशी स्पर्धा करीत नाही. कसल्या गोष्टीत आपण गुंतलो आहोत! कसल्या घोडचुका आपण करीत आहोत! आपण किती क्षुद्र बनलो आहोत! आपला हा एक महान देश आहे, मोठे राष्ट्र आहे, विशाल इतिहास आहे, आमच्या राष्ट्राची हजारो वर्षे आमच्या स्मरणात आहेत; त्यात चांगल्या गोष्टी आहेत व वाईटही आहेत. पुन: एकदा एक नवे युग सुरु झाले, आमच्या बुद्धीला थोडा ताजेपणा आला, हातापायांत ताकती आली आणि आपण पुढे सरलो. त्यानंतर पुन: तेच जुने झगडे आमच्या मनांत सरविण्यासाठी, आमचे हातपाय जखडून टाकण्यासाठी लोक पुढे सरसावले, कोणी जातीचे नाव घेऊन, कोणी धर्माचे नाव घेऊन तर कोणी भाषेचे नाव घेऊन! भाषा ही मानवाला उन्नत बनविण्यासाठी आहे. त्याच्यात भांडणे लावून देण्यासाठी नव्हे. भारतातील कोणता प्रांत मोठा असावा व कोणता लहान असावा यावर लोक लढू लागले, भारताचे एक शरीर घायाळ करू लागले तर त्या मार्गाने ते देशाची सेवा करीत आहेत असे म्हणता येईल काय? तुम्हीच विचार करा.

आपण स्वतंत्र झालो. आपण दुसऱ्या एखाद्या देशावर हल्ला करावा, मुलुखगिरी करावी, अशी आमची इच्छा नाही. परतु त्याचबरोबर आम्ही आमच्या भूमीवर आमच्या घरात कोणत्याही शत्रूला शिरू देणार नाही, हेही तितकेच खरे. आपली प्रतिष्ठा व दुसऱ्याची प्रतिष्ठा या दोन्ही गोष्टी जोडीने चालतात. दुसरा कोणी आमच्या प्रतिष्ठेला बट्टा लावीत असेल तर त्याला सर्व प्रकारे विरोध करण्यात येईल. परतु आम्हाला दुसऱ्याची एक तसूभरही जमीन नको, दुसऱ्याच्या वस्तूवर कब्जा करण्याची आमची इच्छा नाही. कारण जगातील प्रत्येक देश आपापल्या जागी स्वतंत्र राहावा, असा आमचा सिद्धांत आहे. हे काही केवळ संपूर्ण देशाच्या स्वातंत्र्याच्या बाबतीतच खरे आहे असे नव्हे तर, तुम्हाला माहीतच आहे की प्रत्येक खेड्यापाड्यांत आरण पंचायती राज्य सुरु केले आहे; कारण ग्रामीण लोकांनीही स्वातंत्र्यात सहभागी व्हावे व त्यांनी आपला कारभार स्वत: चालवावा, असा आमचा सिद्धांत आहे.

या बाबतीत, भारताच्या स्वातंत्र्यामध्ये, एक उणीव राहून गेली आहे. तिची जाणीव आम्हाला नाही, असे बहुधा लोकांना वाटत असावे. परंतु तिचे स्मरण आम्हाला सदैव असते व ती जाणीव लौकरच दूर होईल. ती उणीव म्हणजे भारताचा एक लहानसा भाग—त्याचे नाव गोवा. लक्षात ठेवा, आणि जगानेही हे लक्षात ठेवावे की तो सदैव आमच्या डोक्यात व मनात असतो. आम्ही हात न उगारण्याचा जो संयम राखला आहे तो आमची हिम्मतच आहे. तो आमचा दुबळेपणा नसून आमची हिम्मत, आमची प्रतिष्ठा, शान आहे; कारण आम्ही लष्कराच्या बळावर हा प्रश्न सोडविणार नाही, या आमच्या सिद्धांताला आम्ही चिकटून आहोत. परंतु त्याचे स्मरण भारताला अवश्य राहील व तो सुटल्याशिवाय राहाणार नाही. जगाने ही गोष्ट लक्षात ठेवावी आणि ज्या देशांनी गोव्याला दाबून ठेवले आहे त्यांनीही भ्रमांत न राहाता ही गोष्ट समजून घ्यावी, लक्षात ठेवावी.

तुम्ही जरा आजकालच्या जगाकडे पाहा. जगाचे काय स्वरूप आहे? अलीकडे जगात शांतता नांदू लागली होती, आता वातावरण सुधारणार असे आम्हाला वाटत होते; परंतु ते पुन: बिघडले आणि एकमेकांच्या अंत:करणांत एकमेकाविषयी विष पसरू लागले. मोठी राष्ट्रे एकमेकाना बंदुकी, तलवारी व इतर मोठमोठी शस्त्रास्त्रे दाखवू लागले. अशी ही महाभयंकर दुनिया आहे. या वेळी जे कोणी थोडेही गाफील राहातील ते खाली कोसळतील ज्यांच्यातील ऐक्य कमी होते ते दुबळे बनतात, ही गोष्ट आजच्या प्रसंगी आपण लक्षात ठेवली पाहिजे. आजच्या दिवशी आपण विशेषत: अशा एका व्यक्तीचे स्मरण करावयाचे आहे जिने सर्वांत अधिक भारताचे सामर्थ्य वाढविले, ऐक्य स्थापिले व भारताला स्वातंत्र्य मिळवून दिले. गांधीजींचे नाव आपण लक्षात ठेवले पाहिजे. अर्थात नाव लक्षात ठेवून काय होणार? त्यांचे कार्य व त्यांचे सिद्धांत स्मरणात ठेवले पाहिजेत व त्याप्रमाणे आपण आपल्या देशाची उन्नती केली पाहिजे. वाटेल तेव्हा इकडे-तिकडे जायला आपला देश म्हणजे काही एखादा लहानसा प्रदेश नाही. आपल्या देशाच्या नशिबात दोनच गोष्टी लिहिलेल्या आहेत. एक तर डौलाने मस्तक उंच करून पुढे जावयाचे किंवा अधोगतीला जावयाचे आपण दुबळे असू तर मधली स्थिती संभवत नाही.

आम्ही आमच्या देशाला अधोगतीला जाऊ देणार नाही हे उघड आहे. या देशाचे अध:पतन आमची जनता कधीही सहन करणार नाही. तो काळ आता गेला म्हणून आपल्यासमोर आता दुसराच मार्ग शिल्लक आहे. तो म्हणजे छाती पुढे काढून, दृढपणे, ऐक्याने, पावलाशी पावले मिळवून, हातात हात घालून आगेकूच करणे. याशिवाय दुसरा मार्ग नाही. जो कोणी या मार्गात आडवा येईल त्याला आम्ही बाजूला सारू; कारण क्षुद्र गोष्टींसाठी भारताच्या भाग्याचा सौदा करणे किंवा धिंपडवून टाकणे आम्हाला सहन होणार नाही परंतु हे काही माझ्या हातात नाही.

तुम्ही मला काही दिवसांसाठी पंतप्रधान बनविले आहे. मी जसा आलो तसाच जाणार. माझ्यात हजारो दोष आहेत, उणीवा आहेत. भारताचे खरे सामर्थ्य भारतीय जनतेतच आहे, तुमच्यात आहे, तुमच्यासारखे जे कोटयवधी लोक देशात आहेत त्यांच्यात आहे. ही गोष्ट तुम्ही समजून घ्या. विशेषत: आजच्या दिवशी तुमचे व आपणा सर्वांचे काय कर्तव्य आहे हे समजून घेतले पाहिजे. आपल्या हातात एक मौल्यवान वस्तू आहे–भारताचे स्वातंत्र्य. त्याच्या द्वारे आपण भारतातील चाळीस कोटी लोकांना वर काढणार आहोत. हे स्वातंत्र्य कसे टिकेल, याचा विचार केला पाहिजे. आपल्या दुबळेपणामुळे ते आपल्या हातून जाता कामा नये. या काही मूठभर अधिकाऱ्यांच्या, मंत्र्यांच्या, पंतप्रधानांच्या गोष्टी मी तुम्हाला सांगत नाही. ही भारतातील कोटयवधी लोकांची, प्रत्येक खेड्याची गोष्ट आहे. म्हणून मी म्हणालो की आम्हाला पंचायती राज्य हवे आहे. प्रत्येक पंचायतीतील लोक पंच व सरपंच सामर्थ्यशाली असले पाहिजेत. ते स्वतंत्र असावेत आणि त्यांनी आपल्या गावाचे व देशाचे रक्षण करावे. या पद्धतीने सर्वच देशातील लोकांनी काम करावे. या गोष्टीचे स्मरण मी तुम्हाला अशासाठी देत आहे की ते तुमचे कर्तव्य आहे, देशाचे कर्तव्य आहे. आम्ही काही काळ सेवा केली–कधी चूक, कधी बरोबर; परंतु निर्मळ अंत:करणाने मी धडपड केली. जे काम आम्ही इतरांच्या मदतीशिवाय स्वत: केले ते मोठयात मोठया माणसालाही करता येणार नाही.

तुम्ही पंचवार्षिक योजना पाहा. ते एक चित्र आहे. ते काही पुस्तक नव्हे. राष्ट्राच्या प्रगतीचे चित्र. ही योजना परिश्रमाने, कष्टाने, तुमच्या प्रयत्नांनी व तुम्ही, समजून घेतल्याने पुढे जाईल. ती पुढे जाणार यात मुळीच शंका नाही. अशा स्थितीत जे लोक जनतेला भडकवीत असतील, इतर गोष्टीत गुतवीत असतील, भांडणे लावून देत असतील त्यांना आम्ही वाट चुकलेले गुन्हेगार का समजू नये? याविषयी तुम्ही विचार करा. शेवटी पुन: एकदा मी माझे म्हणणे सांगतो. प्रत्येक भारतीयाचे पहिले कर्तव्य कोणते? भारताचे स्वातंत्र्य व ऐक्य टिकविणे व ते मजबूत बनविणे हे प्रत्येकाचे पहिले कर्तव्य आहे. हा आजचा विशेष संदेश आहे. तुम्हाला भारताचे हे स्वातंत्र्य लखलाभ होवो. तेरा वर्षांपूर्वी येथे हा झेंडा फडकला होता. त्या घटनेचा वाढदिवस असलेला हा दिवस लखलाभ होवो. असे एक नव्हे, शेकडो, हजारो दिवस तुम्हाला लखलाभ होवोत.

जय हिंद !

1960

# काळाला ओळखा

'आज स्वतंत्र भारताचा चौदावा वाढदिवस आहे. हा शुभ दिवस तुम्हाला, आम्हाला व सर्वांना लखलाभ होवो. आजच्या दिवशी पुष्कळ विचार मनात येतात. सर्वांत आधी, ज्यांनी भारताला स्वतंत्र करण्याचा मार्ग आपल्याला दाखविला त्या गांधीजींचे स्मरण आपण केले पाहिजे. केवळ त्यांचेच नव्हे तर त्यांनी आपल्याला ज्या गोष्टी शिकविल्या व ज्या मार्गाने जावयास सांगितले त्यांचेही स्मरण आपण केले पाहिजे; कारण त्या मार्गापासून आपण विचलित झालो तर आपण भलतीकडे जाऊ. जेव्हा-जेव्हा आपण असे विचलित झालो तेव्हा वाट चुकून आपण भलतीकडे गेलो. त्याचप्रमाणेच ज्या हुतात्म्यांनी व लाखो लोकांनी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आपले प्राण दिले, खूप त्रास सोसला व परिश्रम केले त्यांचेही स्मरण आपण केले पाहिजे. त्यांचे स्मरण केल्यानंतर मग या चौदा वर्षांच्या काळाचे सिंहावलोकन केले पाहिजे. आपण काय केले? कोठपर्यंत जाऊन पोचलो? आपण काय करू इच्छित होतो? काय करावयाचे राहिले? आपण कुठवर पुढे सरलो? कोठे अडलो? आपल्याला काय करावयाचे आहे? अशा प्रकारे जुन्या काळासंबंधी विचार करणे योग्य आहे; कारण जुना काळ हा आपला असतो, त्याच्यापासून आपण शिकत असतो आपण शिकलोही आहोत. परंतु अखेर आपली नजर भविष्याकडे गेली पाहिजे; कारण तुम्हाला, आम्हाला व भारतातील कोट्यवधी लोकांना भविष्यकाळ घडवावयाचा आहे. हा काही नशिबाचा खेळ नव्हे. आपल्याला आपल्या कामाने व परिश्रमाने आपले नशीब स्वतः घडवावयाचे आहे. म्हणून भविष्यासंबंधी विचार करावयाचा. भारतातील लोकांनी या मागल्या काळात मोठमोठे समुद्र ओलांडले, परंतु पुढे आणखीही समुद्र आहेत, आणि ज्या ध्येयाकडे आपले डोळे लागलेले आहेत ते खूप दूर आहे. तरीपण या मागील काळाकडे पाहिल्यानंतर आपली हिम्मत वाढते, धाडस येते. आपण पुष्कळ काम केले. कितीतरी टप्पे ओलांडले. पंचवार्षिक योजना आल्या. प्रत्येक योजना हे आमच्या राष्ट्राचे एक-एक पाऊल बनले. दोन पाउले पूर्ण झाली. आता तिसऱ्याची सुरुवात आहे. हे पूर्ण झाल्यानंतर सारा भारत पुष्कळ पुढे जाईल आणि आपले रक्षण करण्याचे व स्वतः समृद्ध बनण्याचे त्याचे सामर्थ्य पुष्कळ वाढेल, अशी मला आशा वाटते. आपल्या स्वातंत्र्याचे रक्षण करणे हे प्रत्येक राष्ट्राचे पहिले कर्तव्य असते. दुर्दैवाने आपल्यावर, आपल्या सरहद्दीवरही संकटे येतात, आली आहेत. म्हणून सदैव सुसज्ज राहून आपल्या देशाचे रक्षण आपल्याला करावयाचे आहे.

कालच, नुकतीच आपल्या लोकसभेत एक लहानशी घटना घडली. भारतातील काही गावे, जरी ती कायद्याप्रमाणे येथेच होती तरी, पुष्कळ वर्षांपासून

भारतापासून वेगळी पडली होती. ती भारतात सामील झाली—दादरा व नगर हवेली या महान देशाचा हा एक लहानसा तुकडा आहे; परंतु या महान देशाचा अगदी लहानात लहान तुकडाही आम्हाला प्रिय आहे, आमच्या हृदयात त्याला स्थान आहे. त्यामुळे हा लहानसा तुकडा परत आल्यामुळे आम्हाला आनंद झाला. त्याच्या आगमनाने नुसता आनंदच झाला नाही तर इकडे-तिकडे जे आणखी काही तुकडे उरले आहेत तेही परत आणावयाचे आहेत व त्यांना घरात स्थान द्यावयाचे आहे, हा विचारही ताजा झाला. आपण इतर देशांवर हल्ला करावा, दुसऱ्या देशाची जमीन बळकवावी, किंवा दुसऱ्या देशातील रहिवाशांना आपल्यात सामील करून घ्यावे, अशी आमची मुळीच इच्छा नाही अथवा तसे आमचे धोरणही नाही. या नव्या जमान्यात जुनाट कल्पना आम्हाला नकोत. आम्हांला दुसऱ्या कोणत्याही देशावर स्वारी करावयाची नाही किंवा कुणाच्या अंतर्गत बाबीत ढवळाढवळ करावयाची नाही. त्याचबरोबर आमच्या देशावर कोणी हल्ला केल्यास तेही आम्ही सहन करणार नाही. एकमेकांच्या प्रदेशावर स्वाऱ्या करणे या जुन्या काळच्या गोष्टी आहेत. सरंजामदार, नबाब व राजेरजवाडे यांचा तो काळ होता. आपले राज्य ही आपली मालमत्ता आहे असे त्यांना वाटे व त्यात ते भर घालीत किंवा त्यातील काही भाग गमावून बसत. तो काळ आता राहिलेला नाही. लोकांनी आपापल्या घरात, आपापल्या देशात राहून इतरांशी सहकार्य करण्याचा हा काळ आहे. देशांच्या सीमा वाढविण्याचा किंवा कमी करण्याचा हा काळ नव्हे. जर कोणी तसे करीत असेल तर तो नव्या युगात राहून जुन्या जमान्यात वावरणारा आहे, असे म्हणावे लागेल. आजकालचा हा जमाना कसा आहे? आपल्या या पृथ्वीवरील विमाने पृथ्वीऐवजी ग्रहतान्यांकडे पाहू लागली आहेत. तिकडे जाऊ-येऊ लागली आहेत. अशा परिस्थितीत तुमच्या-आमच्या लहान-लहान सीमांचे काय महत्त्व? आपले आपसातील क्षुद्र झगडे काय किमतीचे? आपल्याला दुसऱ्या जगासाठी, दुसऱ्या युगासाठी तयार व्हावयाचे आहे. एकीकडे अशी स्थिती आहे आणि आपण तयार होत आहोत. आपल्या तरुणांपैकी कित्येक तरी लोक या नव्या जगासाठी तयार होत आहेत. ते या नव्या जगातील नव्या युगासाठी धडपडही करीत आहेत. परंतु आजच्या प्रसंगी गेल्या चौदा वर्षांत आपण काय-काय केले त्याबद्दल बढाई मारण्याची माझी इच्छा नाही. अर्थात आपल्याला अभिमान वाटावा अशा पुष्कळ गोष्टी आहेत; परंतु आजच्या प्रसंगी आपण आपल्या उणीवांकडे अधिक लक्ष द्यावे हे जास्त बरे.

आजच्या वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेला आपल्या उपराष्ट्रपतींचा संदेश तुम्ही कदाचित वाचला असेल. आपल्या लोकांमध्ये शिस्त असली पाहिजे, या गोष्टीकडे त्यांनी विशेषेकरून लक्ष वेधले आहे. इतर पुष्कळ गोष्टी हव्यात, परंतु शिस्त ही पहिली गोष्ट. शिस्त कोणामध्ये हवी? आपल्या सैन्यात चांगली शिस्त आहे. आपले

सैनिक चांगले आहेत, शूर आहेत, त्यांच्यावर आपला भरवसा आहे. परंतु शिस्त ही फक्त सैन्यातच असून भागणार नाही, ती कोटयवधी लोकामध्येही असली पाहिजे. भारतामध्ये कितीतरी वेगवेगळे व मोठमोठे प्रांत आहेत. भाषा आहेत, धर्म आहेत. त्यांत अनेकता आहे, परंतु त्या अनेकतेमागे जी एकता आहे तिला आपण मजबूत बनवावयाचे आहे. आपण लक्षात ठेवले पाहिजे की जी व्यक्ती, पुरुष अथवा स्त्री आपल्या ऐक्याला सुरुंग लावणारी गोष्ट करीत असेल ती भारताचे नुकसान करते आपण आपल्या शेजाऱ्याला, दुसऱ्या धर्माच्या आपल्या शेजाऱ्याला आणि आपल्या देशातील सर्व रहिवाशांना आपलेसे केले पाहिजे. आपण ही शिकवण विसरतो. ही दुःखाची गोष्ट आहे. कधी प्रांतीयतेच्या, कधी जातीयतेच्या, तर कधी जातिभेदाच्या तर कधी भाषावादाच्या आहारी जाऊन आपण एकमेकांशी भांडतो. या सर्व गोष्टी-संबंधी शांत विचार चिंतन व चर्चा करून निर्णय घेतले पाहिजेत. जिच्यामुळे आप-सात दुही माजते, वैमनस्य उत्पन्न होते, भिंती उभ्या राहातात अशी प्रत्येक गोष्ट त्याज्य होय. जिच्यामुळे ज्या विशाल मार्गाने आपण वेगाने चालली आहोत त्या मार्गात अडथळे निर्माण होतात व राष्ट्र पुढे जाऊ शकत नाही. आपण कोणते कार्य अंगावर घेतले आहे ते लक्षात घ्या. ते एक प्रचंड कार्य आहे. एवढे मोठे कार्य जगातील दुसऱ्या कोणत्याही देशाला क्वचितच अंगावर घेता येईल. 43 कोटी लोकांना पुढे न्यावयाचे आहे. एखाद्या विशिष्ट गोष्टीतच पुढे जावयाचे नसून पुष्कळ बाबतीत प्रगती करा-वयाची आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे त्यांना एका युगातून काढून दुसऱ्या युगात आणावयाचे आहे. जुन्या काळच्या विचारातून, जुनाट प्रकारच्या राहाणींतून, जुन्या काळच्या दारिद्र्यातून बाहेर काढून त्यांना एका नव्या काळात, समृद्धीच्या काळात आणावयाचे आहे. आपण नव्या काळातील गोष्टी ओळखू या, त्यावर ताबा मिळवू या आणि त्याच्या साहाय्याने आपल्या देशाला पुढे नेऊ या. संपूर्ण देशाची समृद्धी ही नुसती समृद्धी नसते. तिच्या मागे अनेक गोष्टी असतात. त्या बुद्धीला उन्नत बनवितात, आध्यात्मिकता वाढवितात. नुसत्या सुधारलेपणाने राष्ट्रे पुढे जात नाहीत. तुम्हाला या मागील पांच वर्षांत खूप लाभ झाला. आपण पुढे गेलो. आपण आरामही केला. अर्थात पुष्कळ लाभ झाला, यापुढेही खूप अडचणी येतील. आपल्यापुढील अडचणींना तोंड देता आले पाहिजे. या अडचणींबद्दल मी तुमचे अभिनंदन करतो. कारण, जर एखाद्या राष्ट्रासमोर अडचणीच नसतील, त्याच्यात सुखासीनता आली असेल, तर ज्याप्रमाणे श्रीमंताची मुले निरुपयोगी व दुबळी बनतात त्याप्रमाणे ते राष्ट्र कमकुवत बनते. आम्हाला असला कमकुवतपणा नको. आम्हाला सुदृढ राष्ट्र हवे, शूर राष्ट्र हवे. एकमेकांना समजून घेणारे व एकमेकांशी मिळून मिसळून राहाणारे माणसे व राष्ट्रे हवीत. या वेळी तुम्ही भारताकडे पाहाल तर तुम्हाला विचित्र दृश्य दिसेल. येथे मोठमोठी कामे चालली आहेत—ज्यांच्यामुळे भारताचे स्वरूप पूर्वीपेक्षाही अधिक उज्ज्वल होईल असे वाटते. शेतकऱ्यांची मुले शाळेत जातात; आणि नव्या जगाची माहिती

मिळवितात. लाखो विद्यार्थी कॉलेजांत आहेत. ते भावी काळात भारताची व जगाची सेवा करण्यास तयार होत आहेत. परंतु त्याच बरोबर आपमांतील भांडणे, क्षुद्र गोष्टीं-संबंधी वादविवाद आणि द्वेष व वैमनस्य ही देखील आपल्याला पाहावयास मिळतात.

विशेषतः तुमचे व माझे लक्ष या वेळी पंजाबकडे आहे. तेथील लोक शूर आहेत. त्यांनी जुन्या काळी व आपल्या स्वातंत्र्ययुद्धातही भारताची पुष्कळ सेवा केली आहे. यापुढेही ते अशीच सेवा करतील यात शंका नाही. त्यांच्यापैकी कितीतरी लोक आपल्या सैन्यात आहेत व नावारूपाला चढले आहेत. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी की आपसातील द्वेष व वैमनस्य यांमुळे त्यांची पुष्कळ शक्ती वाया चालली आहे. भारताच्या इतर भागातही अशा घटना घडल्या. या वेळी आपल्यासमोर पहिला प्रश्न पंचवार्षिक योजनेचा आहे. त्या योजनेची अंमलबजावणी आपल्याला करावयाची आहे. देशातील कोटयवधी लोकांना हातात हात घालून, शिस्तीत पुढे जावयाचे आहे. हा आपल्यापुढील पहिला प्रश्न आहे हे खरे, परंतु या वेळी त्यापेक्षाही अधिक निकडीचा व महत्त्वाचा प्रश्न भारतीयामध्ये हार्दिक ऐक्य कसे निर्माण करावयाचे हा आहे. त्याला आपण एकात्मता म्हणतो. ही एकात्मता प्रत्येक राष्ट्रात असली पाहिजे. त्यासंबंधी विचार करण्यासाठी भारतातील विभिन्न प्रांतातून नुकतेच येथे लोक आले होते. त्यांनी विचारविनिमय करून काही निर्णय घेतले. परंतु हे तर एक पाऊल झाले. आपण हा प्रश्न हाती घेऊन त्याला प्राधान्य दिले पाहिजे. आपण आपसात भांडत असू, सहकार्याने व प्रेमाने कार्य करू शकत नसू, एकदिलाने चालू शकत नसू तर आपली कितीही प्रगती झाली, आपण मोठमोठे कारखाने उभारले, नाना मार्गांनी पैसा मिळविला तरी त्याचा काय उपयोग? हा मूलभूत मुद्दा आहे भारतात कोठे-कोठे अशा गोष्टीही चालल्या आहेत, याचा मला खेद होतो. या वेळी पंजाबातही याचीच चर्चा चालू आहे आणि पंजाबात काय घडणार याची चिंता अनेकांना लागून राहिली आहे. मला आशा वाटते की काही वाईट घडणार नाही लोकांना शहाणपण सुचेल पंजाबी लोक जोमदार आहेत शेवटी त्यांची समजूत पटते. त्यांना नक्कीच शहाणपण सुचेल आणि युद्धासमोर जे धूम्रपटल पसरल्यामुळे त्यांना समोरचे नीट दिसत नाही ते ते बाजूला सारतील आणि ताज्या वातावरणात व प्रवाहात त्या प्रश्नां-कडे ते पाहातील. मारामाऱ्या करून आपण सोडवावा असा कोणताही प्रश्न या देशा-समोर नाही अथवा असूही नये. ज्याच्यासाठी आपण उपोषणे वगैरे करावीत असा कोणताही प्रश्न नाही. हे काही लोकशाहीचे मार्ग नव्हेत. प्रश्न सोडविण्याचे हे लोक-शाही मार्ग नव्हेत. या मार्गात आपण गुंतलो तर प्रत्येकजण सवतासुभा निर्माण करील. मग कोणाचे ऐकावयाचे आणि कोणाचे नाही? आपल्याला समाजाचे संघटन करा-वयाचे आहे; परंतु आपला समाज हा काही केवळ हिंदु समाज नाही, मुसलमान समाज नाही, शीख समाज नाही, अथवा दुसरा एखादा समाज नाही. आपला समाज हा भारतीय समाज, हिंदी समाज आहे. त्यात सर्व लोक येतात. म्हणून आपल्या-

समोर पहिला प्रश्न एकमेकांना आत्मसात करून घेण्याचा आहे. उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम, सर्वच दिशांना वेगवेगळे धर्म आहेत. भारतातील बहुतांश लोक याच देशात जन्मलेले आहेत. त्याच्यापैकी काही बाहेरून आलेले आहेत. परंतु जो कोणी भारतात असेल तो भारताचा आहे. त्याचा मान आपण ठेवला पाहिजे. ही काही आजची गोष्ट नसून हजारो वर्षांची ही परंपरा आहे. एकमेकांविषयी, एकमेकांच्या धर्माविषयी आचारविचाराविषयी आदर बाळगणे, आपसात न भांडणे ही भारताची परंपरा आहे. अशोकाने आपल्या शिलालेखात हे लिहून ठेवलेले आहे. आपण क्षुद्र गोष्टींवरून भांडू नये—कधी भाषेच्या नावाने, कधी धर्माच्या नावाने, तर कधी जातीच्या नावाने आपसात मारामाऱ्या करू नयेत—ही गोष्ट गेल्या दोन हजार वर्षांत आपण विसरून गेलो. जातिभेद व अशाच प्रकारचे दुसरे भेद कोणत्याही लोकशाहीत टिकू शकत नाहीत. ज्या जातिभेदाने आपल्या समाजाचे तुकडे केले त्याचे उच्चाटण आपल्याला करावयाचे आहे. आपल्याला इतर भेदभावही नाहीसे करावयाचे आहेत. प्रत्येकाने आपापल्या धर्माचे पालन करावे, हे खरे; परंतु आपल्या धर्माचे पालन करणे याचा अर्थ दुसऱ्याशी वैर करणे, भांडणे व देशाला दुर्बळ बनविणे असा नाही. म्हणून आपापल्या धर्मांत राहून हे लक्षात ठेवले पाहिजे की आपला एक मोठा धर्म आहे भारत धर्म. हा सर्वांचा धर्म आहे. मिळून मिसळून राहाणे, सहकार्याने काम करणे आणि सर्वांनी मिळून पुढे जाणे, हा तो धर्म होय. या धर्मात जे कोणी अडथळा आणीत असतील ते सारे चुकीचे धर्म आहेत—मग त्यांना कोणतेही नाव द्या. हिंदु धर्म, इस्लाम, शीख अथवा ख्रिस्ती धर्म हे सारे आपल्या देशाचे आहेत. त्यांच्याकडे आपल्याला समदृष्टीने पाहावयाचे आहे, बरोबरीच्या नात्याने त्यांच्यासह राहावयाचे आहे व त्यांच्या-बरोबर पुढे जावयाचे आहे. आजच्या जमान्यात आपण धर्मावरून भांडण करणे हें किरतत योग्य आहे? मी तुम्हाला सांगितल्याप्रमाणे आजचा जमाना हा ग्रहताऱ्या-कडे पाहाण्याचा व मानवाने ग्रहावर जाण्याचा आहे. माणूस ग्रहावर केव्हा पोचेल, कोण जाणे. तो काळ जवळ येत आहे व आपण ग्रहावर अवश्य जाऊ. आमचे नवजवानही जातील व प्राण संकटात घालतील. जे लोक जीव धोक्यात घालतात तेच देशाला पुढे नेतात. फक्त बगल्याबगल्या पैशाच्या थैल्या भरण्याने कोणतेही राष्ट्र पुढे जात नाही अर्थात वेळप्रसंगी पैशाचीही गरज लागते, परंतु माणूस पैसा उत्पन्न करतो, पैसा माणसाला उत्पन्न करीत नाही. आपल्याला या देशात माण-सांची व माणुसकीची जरूर आहे. म्हणून सर्वांनी आपल्यासमोर माणुसकीचा आदर्श ठेवावा.

दुसरी गोष्ट अशी की तुम्ही जगाप्रमाणे आजच्या काळाकडे बघा. कधीकधी युद्धाच्या नौबती ऐकू येऊ लागतात. युद्धाची तयारी, युद्धाची शस्त्रास्त्रे, यांविषयीच्या गोष्टी कानावर येतात. या युगातील शस्त्रास्त्रे जगाचा नायनाट करू शकतील. एखा

त्यांच्यावरील बंधन तुम्ही काढले की अशी शस्त्रास्त्रे दिवसेंदिवस वाढू लागतील. तरी देखील आपसांत तडजोड करून त्याच्यावर कायमची बंदी घालावी, ती नष्ट करून टाकावीत, एवढे शहाणपण जगातील मोठ्या मंडळींना सुचत नाही. आजकालच्या प्रचंड शस्त्रास्त्रांनी जगाचे प्रश्न सुटणार नाहीत, केवळ जगाचा नाशच होईल, ही गोष्ट सिद्ध झालेली आहे. त्यांच्यामुळे कोणाचाच जय होत नाही. जगाचे स्मशान होईल, जय कोणाचाच होणार नाही, अशी जगाची स्थिती आहे. असो. जगाला आपण काय सावरणार? आपल्याला तर स्वतःलाच सावरायचे आहे. जगासमोर हे धोके असताना आपण काय करावे? आपण आपल्या मार्गाने चालावे; आणि यथाशक्ती आपल्या आवाजाने, आपल्या सेवेने, जगाला युद्धापासून दूर ठेवण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे, हे उघड आहे. परंतु आपला काही प्रभाव असेल, आपण आपल्या घरात तसे वातावरण निर्माण केले असेल तरच आपण जगाला युद्धापासून परावृत्त करू शकू. त्याऐवजी आपण घरामध्ये आपसांतच भांडत असू, वातावरण दूषित करीत असू तर आपण आपली काय सेवा करणार? आणि जगाची तरी काय सेवा करणार? म्हणून तुम्हाला व तुमच्या द्वारे भारतातील लोकांना माझी अशी विनंती आहे की तुम्ही आजच्या काळाला ओळखा, आजच्या भारताला ओळखा, कारण आजचा भारत हा नवा भारत आहे. तो जगाच्या दिशेने चालला आहे. नव्या सीमा आपल्याला ओलांडावयाच्या आहेत, सीमोल्लंघन करावयाचे आहे. या मार्गाने जुनी भांडणे, जुन्या गोष्टी निकालात निघत नसतात. मुख्य मुद्दा असा आहे की आजचे भारतीय, लोकांच्या विचारपद्धतीकडे कोणत्या दृष्टिकोणातून पाहातात? आपण त्याच जुनाट खड्ड्यात पडून राहाणार की त्यातून बाहेर पडून मैदानात येणार आणि मैदानातून पर्वतावर, मानवतेच्या शिखरांवर चढणार, हा प्रश्न आहे. आपण नव्या युगात वावरणार की जुन्या जमान्यात पडून राहाणार ही भारतापुढील मुख्य समस्या आहे. पंचवार्षिक योजना वगैरे गोष्टी ही तिचीच अंगे आहेत. ही समस्या तुम्ही समजून घ्या व ती कशी सोडविता येईल याचा विचार करा. या मार्गाने आपल्याला कोण नेऊ शकेल? आपण आपल्या भांडणातच, मग ते भांडण कसलेहि असो—गुतून राहाणार काय? निवडणूक जवळ येत आहे. तिच्या भरपाईत आपण अडकणार काय? निवडणुकी येतात व जातात; परंतु राष्ट्राचा गाडा सतत चाललेला असतो, त्याचे सिद्धांत सतत चालत असतात. राष्ट्राने योग्य प्रकारे चालणे, एकमेकांना जवळ करणे व सहकार्याने वागणे शिकून घेतले नाही आणि आपण आपसात भांडतच राहिलो, तर निवडणुकी तरी काय करणार? कोणी जिंको, कोणी हारो, देश तर राहीलच. आपल्या-समोर एका पक्षाच्या जयाचा किंवा पराजयाचा प्रश्न नसून एका देशाच्या, एका राष्ट्राच्या जयाचा प्रश्न आहे. भारताच्या विजयाचा प्रश्न आहे. तुम्हाला, भारतातील सर्व लोकांना व विशेषतः पंजाबातील लोकांना, तेथील वयोवृद्ध व अनु-

मंत्री लोकांना माझी अशी विनंती आहे की, "तुम्ही या दृष्टिकोणातून पाहा. संकुचितपणाने, चुकीच्या भावनांच्या प्रवाहात वाहून न जाता तुम्ही विचार करा; कारण लक्षात ठेवा की एखादी चांगली गोष्टही जर वाईट मार्गाचा अवलंब करून घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यात आला तर ती वाईट बनते."

गांधीजींची एक मोठी शिकवण ही होती की वाईट मार्गाने आपण कोणतेही चांगले काम करू शकत नाही. वाईट मार्गाने गेल्यास ते कार्यही वाईट बनते. म्हणून भारतासमोर आज जे ऐतिहासिक युग उभे आहे त्या युगात वावरणे आपल्याला लखलाभ होवो, अशी मी आशा बाळगतो. या ऐतिहासिक युगात भारताचा व जगाचा इतिहास लिहिला जात आहे. तो कसा लिहिला जात आहे? लेखणीने लिहिणारे तर मागून येतील. मागील युगाप्रमाणे या वेळीही आपण आपल्या कार्याने, परिश्रमाने व ऐक्याने हा इतिहास लिहू या. अशा वेळी क्षुद्र गोष्टीत गुरफटून आपण ते सारे विसरून जाणार? लहान प्रश्न मुद्दा या पद्धतीने सुटत नसतात. भांडणाच्या मार्गाने जाऊन कोणताही लहान-मोठा प्रश्न सुटत नसतो. नव्या जगाचा जो नवा सूर्य उदयाला येत आहे त्याच्याकडे आपण पाहू या, त्या दिशेने जाऊ या व देशालाही नेऊ या. आज नव्हे तर पन्नास वर्षांपूर्वीच्या काळात मी आणि तुमच्या वडीलधाऱ्या मंडळींनी नवभारताची, स्वतंत्र भारताची नवी स्वप्ने रंगविली होती. आमची ती स्वप्ने साकार झाली, पुष्कळ अंशी साकार झाली. आपली स्वप्ने साकार झाली असे फार क्वचित घडते. परंतु आमच्या बाबतीत ते घडले. ते पाहून आम्हाला आनंद झाला. परंतु अजून मुक्काम गाठलेला नाही, पुष्कळ गोष्टी करावयाच्या आहेत. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत जो एक प्रचंड भारतीय समाज पसरलेला आहे तो एक व्हावा त्याच्यात एकात्मता निर्माण व्हावी, त्याची उन्नती व्हावी, त्याचे मन विशाल बनावे बुद्धि व्यापक बनावी, परस्पर सहकार्याची वृत्ती वाढावी व लोक सुखी व्हावेत, यासाठी आम्ही धडपडत आहोत. बेचाळीस कोटी माणसांना वर काढणे, त्यांनी आपल्या शक्तीने स्वतः वर उठणे, जुने दोष काढून टाकणे, उच्चनीचतेची भावना नाहीशी करणे, हे काही लहान-सहान काम नव्हे. सर्वांना विकासाची समान संधी मिळावी, अशी आमची इच्छा आहे. धर्म आमच्यात भांडण लावून देत असतील, एकमेकाविषयी तुच्छता शिकवीत असतील तर धर्म वाईट आहेत. असे शिकविणारा धर्म हा धर्मच नव्हे ती वाईट गोष्ट आहे. या दृष्टीने विचार करून आपण आपल्या धर्माचे पालन केले पाहिजे. जी गोष्ट आम्हाला विभक्त बनविते ती सोडली पाहिजे. या बाबतीत मूल्यमापनाचा एक निकष मी तुम्हाला सांगतो जे काम तुम्हाला करावयाचे असेल त्याच्या संबंधी तुम्ही मनाला असे विचारा की याने मनें जुळतील की दुभंगतील? जर जुळत असतील तर ते चांगले आहे मने मोडत असतील, माणसे दुरावत असतील तर ते वाईट आहे. ही गोष्ट मुलांनीही समजावून घ्यावी व मोठ्यांनीही. कारण मी तुम्हाला

मांगतो की भारताला ज्या गोष्टीची या वेळी सर्वांत अधिक गरज आहे ती म्हणजे भावनात्मक एकात्मता. कवायतीतील शिस्तीची नव्हे, तर मनांच्या शिस्तीची, बुद्धीच्या शिस्तीची, मानसिक ऐक्याची गरज आहे. हाच सर्वांत मोठा प्रश्न आहे. या एकात्मतेच्या मार्गात अडथळे निर्माण करणाऱ्या गोष्टी त्याज्य आहेत–मग त्या धर्माचे आवरण घेऊन येवोत की दुसरे कसले. ही गोष्ट तुम्ही लक्षात ठेवा. येथे पुष्कळ मुले बसलेली आहेत. ही मुले काय आहेत? ही मुले म्हणजे ज्यांच्यासाठी आम्ही आज कार्य करीत आहोत तो उद्याचा भारत आहेत. ज्याप्रमाणे आज तुम्ही-आम्ही भारत आहोत, त्याचप्रमाणे उद्या ही मुले मोठी होऊन भारत बनतील. त्यांच्यासाठी जग घडवावयाचे आहे; आणि किती सुंदर जगात व छान भारतात ते जन्माला आले आहेत हे आपण त्यांना नीट समजाऊन द्यावयाचे आहे. त्यांच्या व आमच्या परिश्रमांनी आपण त्याला अधिक चांगला बनवू या. आपल्यात जे जुने गुण आहेत त्यांचे स्मरण ठेवून त्यांना उजाळा देऊ या व नवे सद्गुण अंगी बाणवू या. विज्ञानाच्या विश्वात प्रवेश करून वस्तूवर ताबा मिळवू या आणि ज्या अंतर्गत गोष्टी आपल्याला विभक्त करतात–मग त्या कोणत्याही असोत–त्या काढून टाकून आपण एक विशाल कुटुंब बनून, सहकार्याने पुढे जाऊ या.

आजचा हा दिवस, आजचा चौदावा वाढदिवस आपणा सर्वांना लखलाभ होवो. गेल्या काही दिवसांपासून आपल्या राष्ट्रपतींची प्रकृती बरी नाही, ते आजारी आहेत. आता त्यांची तब्येत पूर्वीपेक्षा बरी आहे, तरीपण ते आजारी आहेत. त्यांच्याकडे आपले मन धाव घेते. आपण सर्वजण, सारे देशवासी मिळून अशी आशा करू या की ते लौकरच बरे होतील आणि त्यांनी जन्मभर देशाची जी थोर सेवा केली आहे ती यापुढेही पुष्कळ काळपर्यंत ते करीत राहातील.

जय हिंद !

1961

# आम्ही भारताचे रक्षण करू

तुमच्यापैकी जी मुले येथे बसलेली आहेत त्यांना भारतात स्वातंत्र्य नव्हते त्या काळाची आठवणही नसेल. तुमच्यापैकी जे तरुण आहेत ते त्या वेळी बहुधा लहान मुले असतील. त्यांनाही फारसे आठवत नसेल. पंधरा वर्षांपूर्वी आपल्या देशाच्या, भारतीय जनतेच्या जीवनात एक मोठे परिवर्तन घडून आले. एक नवे युग सुरु झाले. या गोष्टीला पंधरा वर्षे झाली. आज आपल्या स्वातंत्र्याचा वाढदिवस आहे. तो साजरा करण्यासाठी येथे लाल किल्ल्यावर आपण जमलो आहोत. याच ठिकाणी स्वतंत्र भारताचा ध्वज पहिल्यांदा फडकला होता. ते ध्वजवंदन ही स्वातंत्र्याची खूण होती. असो. ही पंधरा वर्षे तुम्हाला, आम्हाला, सर्वांना लखलाभ होवोत परंतु या पंधरा वर्षांत काय घडले? आपण काय-काय केले? आणि जे आपल्याला करावयास हवे होते असे काय-काय राहून गेले? तुम्हाला माहित आहे की आपल्या देशापुढे हजारो अडचणी आल्या आणि आजही आपल्यासमोर खूप अडचणी आहेत. आपण पुष्कळच केले आणि तुम्ही-आम्ही मिळून यापुढेही पुष्कळच करू यात शंका नाही. कारण आपण स्वतंत्र झालो ही काही केवळ वरवरची घटना नव्हती. राष्ट्रात, कोट्यवधी माणसात संचारलेला तो एक आवेश होता, आणि त्याने हे फळ मिळविले होते. तो आवेश आपले कार्य पूर्ण केल्याशिवाय राहाणार नाही. ते कार्य पूर्ण होणे याचा अर्थ देशातील सारे लोक सुखी बनले आणि ज्यात समता आहे, विषमता फार थोडी आहे, असा समाज निर्माण होणे हा होय. जातिभेदरहित समाजवादी समाज निर्माण करण्याची आमची इच्छा आहे. त्या दृष्टीने आमचे प्रयत्न चालू आहेत. त्यांत प्रारंभी पुष्कळच अडचणी आल्या व अद्यापि येत आहेत. त्यांना तोंड द्यावयाचे आहे. आपण पुष्कळच अडचणींना तोंड दिले. या दिल्ली शहरात स्वातंत्र्यानंतर ज्या आपत्ती आल्या, ज्या भयंकर घटना घडल्या, त्यानाही आपण तोंड दिले व त्यांच्यावर ताबा मिळविला, हे तुम्हाला आठवते ना? तेव्हा आता आम्हाला विचलित करील अथवा घाबरवून सोडील अशी कोणती गोष्ट असणार?

या वेळीही आपल्या देशासमोर अनेक प्रश्न आहेत. आपल्याला खूप त्रास होतो शिवाय आपल्या सरहद्दीवरही आपल्याला सावध राहिले पाहिजे; कारण आपल्या देशाकडे वाईट नजरेने पाहाणारे व हल्लेखोर लोक सरहद्दीवर आहेत. अशा स्थितीत कोणतेही राष्ट्र, शांततापूर्ण राष्ट्र जागृत राहाते आणि हल्लेखोराशी दोन हात करण्यास, त्याला अडविण्यास तयार राहाते. तुम्हाला माहीत आहे की सुरुवातीपासून आमचे धोरण आपल्या देशात व बाहेरच्या देशाशी शांततेचे राहिलेले आहे.

आम्ही सर्व देशांशी मैत्री करण्याचा प्रयत्न केला व त्यांत पुष्कळ अंशी यशस्वीही झालो. परंतु तरीही आमच्या सरहद्दीवर राहाणाऱ्या आमच्या बांधवांनी आमच्याकडे वाईट नजरेने पाहावे आणि कधी-कधी लढाईच्याही गोष्टी बोलाव्यात ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे! अर्थात असे असले तरी आपण घाबरता कामा नये. हातपाय गाळता कामा नये. उलट आपण नेहमी तयार, सावध राहिले पाहिजे, दक्ष राहिले पाहिजे. याच पद्धतीने आपण प्रत्येक संकटाला तोंड देऊ शकतो. देशात आपले सामर्थ्य कसे वाढते? देशाचे रक्षण करण्यास सैन्य आहे, इतरही गोष्टी आहेत. परंतु शेवटी राष्ट्राचे रक्षण जनताच करते—काम करून, परिश्रम करून. ज्या जनतेत ऐक्य असेल, जी जनता परिश्रमी असेल तीच देशाचे सामर्थ्य वाढविते—मग ती शेतात काम करीत असो, कारखान्यात राबत असो की दुकानांत काम करीत असो. सर्वांनी अंग मोडून व प्रामाणिकपणे आपापले कर्तव्य केले तर देशाचे सामर्थ्य वाढते व ऐक्य निर्माण होते. मग त्याच्यावर जगातील कोणतीही शक्ती हल्ला करू शकत नाही. आपला इतिहास हा आपसांतील दुहीचा इतिहास आहे. त्या दुहीचा परकीयांनी फायदा घेतला. आता तरी ते घडू नये. लहानसहान गोष्टींवरून आपण वाद घालतो. वादविवाद, चर्चा करणे चांगलेच; त्याला काही हरकत नाही. परंतु आपण नेहमी लक्षात ठेवले पाहिजे की आपसात दुही माजविणे हा देशद्रोह आहे, राष्ट्राला कमकुवत बनविणे आहे, आणि इतक्या मुष्किलीने मिळविलेले स्वातंत्र्य संकटात लोटणे आहे.

आजच्या प्रसंगी तुम्हाला पंधरा वर्षांपूर्वीच्या व त्याच्याही आधीच्या काळाची आठवण मी करून देऊ इच्छितो. त्या वेळी आपल्या देशात स्वातंत्र्याचे युद्ध चालू होते आणि आपल्यामध्ये आपले थोर नेते महात्मा गांधी होते. ते आम्हाला आपल्याबरोबर घेऊन जात होते. आम्ही ठेचाळत होतो, डगमगत होतो, खाली पडत होतो. परंतु तरीही त्यांच्याकडे पाहून आम्हाला धैर्य येई आणि आम्ही पुनः उभे राहात होतो. याप्रमाणे त्यांनी त्या काळातील लोकांना तयार केले. याप्रमाणे त्यांनी एक मजबूत राष्ट्र घडविले. त्या राष्ट्रात ऐक्य होते आणि राष्ट्रातील लोकांमध्ये कांहीसा शिपाईबाणा होता. त्यांनी एका मोठ्या साम्राज्याशी झुंज घेतली व अखेर शांततेच्या मार्गाने यशस्वी झाले. स्मरण करण्यासारखा तो काळ होता. त्या वेळी आम्ही कसल्या-कसल्या संकटांना तोंड दिले होते याची आठवण आली की स्फूर्ती येते. आजकाल आपल्याला लहानशी अडचणही फार मोठ्या संकटासारखी वाटते. अडचण शिवा काम होता कामा नये, हे उघड आहे; परंतु तुम्ही आम्ही ओझे उचलल्याखेरीज भारताला आधुनिक बनवू शकणार नाही. ओझी वाहणारच. आपण ती ओझी उचलून पुढे गेले पाहिजे. नुसते दुसरी होऊन शिवा तयारी नसेल [illegible] होऊ शकणार नाही. [illegible], दुर्दैवाने जर परकीयांशीच

भारताच्या स्वातंत्र्याला व आमच्या सरहद्दींना धोका निर्माण झाला तर आपल्याला किती त्रास सहन करावा लागेल? हे लक्षात ठेवा. तसे घडणार नाही, अशी मी आशा करतो. परंतु त्यापासून आपला बचाव करण्यासाठी आपण आजपासूनच तयार राहिले पाहिजे. या वेळी आपण गाफील राहू व ऐन वेळी सर्वांग बहादुरी दाखवू, हे चालणार नाही. म्हणून आपण क्षुद्र गोष्टी सोडून देऊन मोठ्या गोष्टींकडे लक्ष द्यावयाचे आहे व ज्यात दृढ ऐक्य आहे असे राष्ट्र घडवायचे आहे. आपला भारत पुष्कळ लोकांचा, अनेक धर्मांचा व नाना प्रकारच्या लोकांचा देश आहे. यात हिंदु आहेत, मुसलमान आहेत, किरिस्ताव आहेत, शीख आहेत, बौद्ध आहेत, पारशी आहेत. लक्षात ठेवा, आपल्या देशात सगळे समान आहेत आणि जो कोणी याविरुद्ध आवाज काढील अनेल तो भारताशी द्रोह करीत आहे आणि भारताच्या राष्ट्रीयतेला सुरुंग लावीत आहे, असे म्हणावे लागेल. आपण एक राष्ट्र आहोत आणि जो कोणी या देशात राहातो तो भारतमातेचे लाडके लेकरू आहे. सगळेजण आमचे बांधव आहेत. आपले एक मोठे कुटुंब आहे.

जातीयवादी दृष्टिकोणातून पाहिल्याने अथवा जातिभेदाकडे गेल्याने दुर्बळता येते, हे आपण ओळखले पाहिजे. सध्याचा काळ कसा आहे ते तुम्ही पाहा. आजकाल आकाशात दोन नवे तारे परिभ्रमण करीत असल्याचे तुमच्यापैकी काही लोकांनी कदाचित रात्री पाहिले असेल. ज्यांना मी तारे म्हटले ती दोन माणसे आहेत. ती जगापासून दूर जाऊन पृथ्वीभोवती शेकडो मैलाच्या फेऱ्या मारीत आहेत ती रशियातून निघाली आहेत. यापूर्वी अमेरिकेतून असे लोक निघत होते. जगात या अशा घटना घडत आहेत. सारे जग बदलत आहे! माणूस बदलत आहे. नव्या नव्या शक्ती पुढे येत आहेत. त्याची ओळख आपण करून घेतली नाही आणि आपण आपल्या व जगाच्या हितासाठी त्याचा वापर केला नाही तर आपण मागे राहू. आपण नुसतेच फुशारक्या मारीत बसू व जग पुढे निघून जाईल. म्हणून आपण एका बदलत्या जगात, बदलत्या भारतात राहात आहोत आणि त्याच्याबरोबर आपण वेगाने बदलली नाही तर आपण मागे पडू, हे आपण ओळखले पाहिजे. आपण बदलले पाहिजे. आपल्याला विज्ञानाची वाढ करावयाची आहे, परिश्रम करून या देशाच्या उन्नतीचे नवे मार्ग शोधून काढावयाचे आहेत, कारखाने उभारावयाचे आहेत आणि मुख्यतः शेतीचा विकास करावयाचा आहे! कारण तो भारताचा मूळ आधार आहे. येथील शेतकरी हा भारताचा कणा आहे किंवा मूळ आहे—तुम्ही त्याला काही म्हणा. ते नवी अवजारे वापरतात व आधुनिक नांगर चालवितात. त्यांनी हजार वर्षांपूर्वीची जुनाट अवजारे वापरू नयेत. जग बदलले आणि आमची शेती 'हजार वर्षांपूर्वीची राहिली तर आम्ही मागे पडू. आपल्याला बदलावयाचे आहे, आपण बदलत आहोत.

- आपल्या येथे पंचायती राज्य आहे. भारताच्या इतिहासात नाना प्रकारच्या गोष्टी या वेळी घडत आहेत व त्या खेड्यात राहणाऱ्या आमच्या कोट्यवधी लोकांमध्ये हळूहळू बदल घडवून आणीत आहेत. तुम्ही एखादी मोठी इमारत पाहिली अथवा प्रचंड कारखाना पाहिला तर ती काही सर्वात महत्त्वाची गोष्ट नव्हे. भारतातील शेतकरी शिक्षणामुळे हळूहळू कसे बदलत आहेत, ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. खेड्यातील त्यांची मुले शिकत आहेत. ज्याला शिक्षणाची संधी मिळत नाही असे एकहि मूल भारतात असणार नाही, असा दिवस लवकरच उजाडणार आहे.

स्वातंत्र्यापूर्वी आपले सरासरी आयुर्मान बत्तीस वर्षांचे समजले जात होते. परंतु लोकसंख्या वाढल्यानंतरही आता ते जवळजवळ पन्नास वर्षांचे झाले आहे. याचा अर्थ काय? याचा अर्थ असा नव्हे की सर्व माणसे पन्नास वर्षांची असतात अथवा पन्नास वर्षांहून अधिक मोठा कोणी नसतो. ही सरासरी आहे. याचा अर्थ असा की देशाची लोकसंख्या वाढली असूनही लोकांचे आरोग्य पूर्वीपेक्षा जास्त चांगले आहे. का? कारण त्याना पूर्वीपेक्षा चागले अन्न मिळते. पूर्वी उपासमार होत असे, ती आता होत नाही. काही लोकांची होत असेलही, ते मला सांगता येणार नाही; परंतु सामान्यतः उपासमार होत नाही. आरोग्य चागले आहे. भरपूर व चागले अन्न मिळाले की आरोग्य चागले राहाते. देशातील सर्व लोकांना अन्न मिळावे, वस्त्र मिळावे, राहावयाला घर मिळावे, त्यांच्या आरोग्याची, शिक्षणाची व कामाची तरतूद व्हावी, सर्व गोष्टी व्हाव्यात हे आमचे ध्येय आहे. आपण लहान लहान गोष्टीत, रोजच्या अडीअडचणीत गुतलेले असतो. परंतु स्वातंत्र्यापूर्वी गांधीजींच्या नेतृत्वाखाली असलेल्या लोकांनी काय-काय केले त्याचे स्मरण आपण मनात ठेवले पाहिजे. त्यापासून आपण काही धडा घ्यावा. त्याने आमच्यात चैतन्य संचारले आपण त्याच मार्गाने जाऊ या. कारण मला असे वाटते की महात्माजींनी आम्हाला ज्या मार्गाने नेले होते त्याच मार्गाने आपण गेले पाहिजे. आम्ही त्या वेळी दुबळे होतो, कमजोर होतो तरीही त्यानी आमच्यात थोडेफार धैर्य निर्माण केले व आम्हालाही शिपाई बनविले. शिपाई किंवा सैनिक हे काही केवळ गणवेष घालणारे लष्करी लोकच नसतात. सनिकाप्रमाणे एक काम हाती घेऊन ते पूर्ण करणारा प्रत्येक माणूस हा सैनिक असतो. आपल्याला साऱ्या भारताचे—लहानाचे व मोठ्याचे लक्ष तिकडे वेधावयाचे आहे. लक्षात ठेवा आमच्या सैन्यात प्रत्येक धर्माचे लोक आहेत. सैन्यात भेदभाव नाही. सगळे समान आहेत, सर्वांना समान अधिकार आहेत. आपल्या देशालाही आपल्याला असे बनवावयाचे आहे. आजचा दिवस मुळातच शुभ आहे कारण तो स्वातंत्र्यदिन आहे परंतु आणखी एका दृष्टीने आजचा दिवस शुभ आहे. आज राखी पौर्णिमा, रक्षाबंधन आहे. आज आपण एक-मेकांना राखी बांधतो. राखी हे कशाचे प्रतीक आहे? राखी हे निष्ठेचे, एकमेकांच्या

रक्षणाचे प्रतीक आहे. भावाने बहिणीचे रक्षण करावे, इतरांचेही करावे. आज तुम्ही मनातल्या मनात भारतमातेला राखी बांधा. त्याचबरोबर, 'काहीही झाले तरी आम्ही भारताची सेवा करू, भारताचे रक्षण करू' ही आपली प्रतिज्ञा तुम्ही पुनः घ्या. रक्षण करणे याचा अर्थ तुम्ही स्वतंत्रपणे बहादुरी दाखवावयाची असे नव्हे. वेळ पडल्यास तसेही करावे लागेल; परंतु त्याचा अर्थ असा की, 'आम्ही आपसात एकोप्याने राहू, आम्ही एकमेकांचा अनुचित फायदा घेणार नाही, आम्ही एकमेकांना साह्य करू, सहकार्य देऊ आणि अशा प्रकारे एक मजबूत राष्ट्र घडवू.' तेव्हा आजच्या या स्वातंत्र्याच्या व रक्षाबंधनाच्या दिवशी या वेळी आपण सारे मिळून, जेथे पंधरा वर्षांपूर्वी पहिल्यांदा आपण हा झेंडा फडकविला होता त्या या पवित्र भूमीवर, पुनः एकदा अशी प्रतिज्ञा करू या की 'काहीही झाले तरी भारताच्या नावाला कालिमा लागेल अशी कोणतीही गोष्ट आम्ही करणार नाही. आम्ही भारताची सेवा करू.'

भारताची सेवा करावयाची म्हणजे काय ? भारत हे काही एखादे चित्र नाही. अर्थात त्याचे चित्र आपल्या अंतःकरणात असते. भारताची सेवा करावयाची म्हणजे भारतात राहणाऱ्या लोकांची, भारतीय जनतेची सेवा करावयाची; जनतेला वर काढावयाचे. पुष्कळ दिवसांपासून दडपली गेलेली जनता वर येत आहे. तिला मदत करावयाची आहे. त्या मार्गाने तिला पुढे न्यावयाचे आहे. त्याची प्रतिज्ञा आपण घेऊ या, ती प्रतिज्ञा लक्षात ठेवू या आणि ते काम मनापासून करण्याचा प्रयत्न करू या मग आपला व्यवसाय किंवा काम काहीही असो. सर्वांसाठी एक जरा वेगळे कामही आहे. ते म्हणजे भारताची सेवा. भारताची सेवा म्हणजे आपल्या शेजाऱ्यांची सेवा, आपल्या देशवासीयांची सेवा कोणी कोणत्याही धर्माचा असला तरी सर्वांना आपण समान लेखले पाहिजे. ते भारतीय असतील तर आपले बांधव आहेत असे पाहिल्यास बाहेरचे लोकही आपले बांधव असू शकतात; परंतु हे आपल्या कुटुंबातील आहेत. तुम्ही असे वागावे; क्षुद्र भांडणात, क्षुद्र वादविवादात पडू नये अशी माझी इच्छा आहे. मतभेद असतात. ठीक आहे. मतभेद असले पाहिजेत. आपण एक जिवंत राष्ट्र आहोत. सर्वांनी एकाच पद्धतीने विचार व कामे करावीत असे बंधन आम्ही कोणावर घालीत नाही. परंतु काही गोष्टीत मतभेदाला वावच नसतो भारताच्या सेवेच्या बाबतीत मतभेद असू शकत नाही. भारताच्या संरक्षणाच्या बाबतीत मतभेद असू शकत नाही ते प्रत्येकाचे कर्तव्य आहे—मग तो कोणीही असो तेव्हा या बाबतीत आपण आज निर्धार करू या. या निर्धाराचे स्मरण आपण दररोज केले, तर आपल्या थोडयाशा श्रमाने थोड्या थोड्या संवेतून एक प्रचंड पर्वत उभा राहील. तो भारताला पुढे नेईल व त्याचे रक्षण करील.

1962

जय हिंद !

# देशाने स्वावलंबी बनावे

स्वतंत्र भारताच्या सोळाव्या वाढदिवसाच्या निमित्ताने आज आपण पुन्हा जमलो आहोत. हा शुभ दिवस आहे. तुम्हा सर्वांना हा लखलाभ होवो. तुमच्यापैकी पुष्कळांना आठवत असेल की सोळा वर्षापूर्वी आपण पहिल्यांदा या लाल किल्ल्यासमोर जमलो होतो आणि आपला राष्ट्रध्वज पहिल्यांदा येथे फडकला होता. तो दिवस आपणा सर्वांच्या स्मरणात राहील; कारण त्या दिवशी आपल्याला आनंद झाला होता. आनंदाने जणू आपण बेभान झालो होतो. पुष्कळ वर्षानंतर, पुष्कळ प्रयत्नानंतर, पुष्कळांच्या आत्माहुतीनंतर भारत स्वतंत्र झाला होता. कित्येक वर्षानंतर काळोखी रात्र संपून उजेड आला होता. आता आपले दुर्दिन संपले आणि आता आपण आपल्या देशाची नवनिर्मिती करू, या कल्पनेने आपण पूर्ण आनंद साजरा केला होता. त्यानंतर थोड्याच दिवसांत आपल्याला जोराचा धक्का लागला. भारताच्या फाळणीनंतर दंगे झाले आणि पाकिस्तानांत व नव्या सरहद्दीच्या या बाजूस भारतात भयंकर घटना घडल्या. आपल्याला भयंकर धक्का बसला. सर्वांनाच दुःख झाले. तरीपण आपण त्याला तोंड दिले आणि हळूहळू त्यावर ताबा मिळविला. त्याच काळात थोड्या दिवसांनी एका भारतीयाने आमचे थोर नेते महात्माजी यांची हत्या केली. यापेक्षा मोठी शिक्षा आम्हाला दुसरी कोणती होती? तरीपण आम्ही विचार केला की या वेळी त्यांनी आम्हाला काय सल्ला दिला असता? त्यांनी आम्हाला सांगितले असते की 'नुसते हळहळू नका, रडत बसू नका; तर देशाला विनाशाकडे नेणाऱ्या चुकीच्या गोष्टींना, चुकीच्या प्रवृत्तींना व चुकीच्या विचारांना खंबीरपणे तोंड द्या' आम्ही—मी जेव्हा 'आम्ही' असे म्हणतो तेव्हा त्यात तुम्हा सर्वांचाही समावेश असतो—त्याला तोंड दिले आणि त्या विचाराला दडपूनही टाकले. भारतात पुन्हा एक नवे वातावरण निर्माण झाले. आम्ही विचार केला की आता आपण या भारताच्या संरक्षणासाठी, नवभारताच्या निर्मितीसाठी, भारताला समृद्ध व संपन्न बनविण्यासाठी आपली शक्ती पणाला लावावी. त्यायोगे सारी जनता वर येईल व भारताची शक्ती वाढेल. त्याप्रमाणे आम्ही या गोष्टीकडे लक्ष पुरविले, मोठमोठ्या योजना बनविल्या व त्या अमलात आणल्या. गेल्या 10-12 वर्षांपासून हे काम चालू आहे.

गेल्या 10-12 वर्षांत भारताचे रूप पालटले व पालटत आहे असे मी मानतो. या बाबतीत तुम्हीही माझ्याशी सहमत व्हाल. किती नवीन शहरे वसली, हजारो नवे कारखाने उभे राहिले, नव्या योजना बनल्या, नवे प्रकल्प सुरू झाले, आणि तुम्ही

जरा इकडे-तिकडे हिंडून पाहाल तर तुम्हाला पूर्वीपेक्षा अधिक समृद्धी आढळून येईल. आम्ही आमच्या उद्दिष्टापासून अद्यापि पुष्कळ दूर आहोत, परंतु ही गोष्ट घडली आहे. हे सारे झाले खरे; परंतु आपले लक्ष काही मूलभूत गोष्टींपासून विचलित झाले. आपण असे समजतो की आपण स्वतंत्र झालो, आता आपले स्व.तंत्र्य अढळ झाले. आपल्याला चुका करायला, गाफील राहायला हरकत नाही. यापुढे आपल्यावर, आपल्या स्वातंत्र्यावर कोणी हल्ला करणार नाही. स्वातंत्र्य ही वस्तू आपल्या आपण प्रयत्नाशिवाय अबाधित राहू शकत नाही, हा धडा अजून आपण नीट शिकलो, नव्हतो. स्वातंत्र्याची सेवा, स्वातंत्र्याचे रक्षण सतत, दर वर्षी, अहोरात्र डोळ्यात तेल घालून करावयाचे असते आणि बेसावध राहिल्याने, त्याच्याकडे दुर्लक्ष होताच, ते हातातून निसटू लागते व धोके निर्माण होतात याची कल्पना आपल्याला आली नाही. आपण गाफील राहिलो.

आपण स्वतःला शांततेचे पाईक बनविले. जगात आपली अशी कीर्ती पसरली की भारत शांततेच्या बाजूचा आहे. ते बरोबर होते. आम्ही शांततेच्या पक्षाचे होतो व आजही आहोत. परंतु शांततेबरोबर दुर्बळता चालू शकत नाही. शांततेबरोबर गाफीलपणा चालू शकत नाही. शांततेबरोबर जेव्हा परिश्रम व सामर्थ्यही असतात, तेव्हाच आपण तिचे रक्षण करू शकतो व जगात आपल्या शब्दाला काही किंमत राहाते.

गत वर्षी जेव्हा आपल्या सरहद्दीवर हल्ला झाला तेव्हा आपणा सर्वांना पुनः एक धक्का बसला ज्याला आपण मित्र समजत होतो अशा एका देशाने जोराचा हल्ला चढविला व त्यामुळे सरहद्दीवर दुर्घटना घडल्या आपल्याला दुःख झाले, त्रास झाला. परंतु त्याचाही एक चांगला परिणाम घडून आला. तो असा की त्यामुळे आपण त्या गाफीलपणातून बाहेर पडलो, साऱ्या देशात एक नवे वारे वाहू लागले व लोक तयार होऊ लागले. सर्वत्र एक जोश होता. लोक बलिदान व त्याग करू लागले. मला अजून आठवते आणि तुम्हालाही माहीत आहे की त्या वेळी आपली जनता कित्येक महिनेपर्यंत आपल्याजवळ असलेली प्रत्येक वस्तू, आपले सर्वस्व द्यावयास तयार झाली होती. लोकांनी पैसे दिले. आमच्या संरक्षण निधीसाठी सोने, चांदी वगैरे सर्व काही दिले ज्यांच्याजवळ सर्वांत कमी होते त्यांनी सर्वात जास्त दिले. अकस्मात भारतामध्ये, सर्व देशभर, असे एक वातावरण पसरले की त्यामुळे लोक आपसातील भांडणे विसरले. त्यांनी आपली भांडणे मागे ठेवली, लपवून टाकली, गाडून टाकली. त्या वेळी आपला देश संकटात आहे, त्या संकटाला तोंड देणे, त्याचा प्रतिकार करणे व त्याकामी सर्वतोपरी मदत करणे हे आपले पहिले कर्तव्य आहे, याची जाणीव सर्वांना झाली. ऐक्याचे वारे वाहू लागले आणि वरवर कितीही मतभेद दिसले तरी साऱ्या देशात किती जबरदस्त ऐक्य आहे व प्रसंग येताच

गे इतके स्पष्ट होते हे आपल्याला दिसून आले. आमचे धैर्य वाढले, सामर्थ्य वाढले आणि देशाची शक्ती वाढवून त्याला सबळ बनविण्याचा लौकर तयार करण्याचा प्रयत्न आम्ही चालविला. देशाला तयार करावयाचे म्हणजे काय? लोकांमध्ये नुसता जोश असून भागणार नाही. लष्करी तयारीच्या मागे इतर अनेक प्रकारची तयारी असावी लागते. युद्धासाठी तयार करणारे कारखाने लागतात, विमानांसाठी हजारो कारखाने हवे असतात, अन्न, खाद्यपदार्थ हवे असतात. त्यासाठी भारतातील धान्य पिकविणाऱ्या शेतांकडे लक्ष द्यावे लागते. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे लष्करी तयारीसाठी सर्व बाजूंनी काम करावे लागते. आपली आर्थिक स्थिती भक्कम व्हावी यासाठी प्रत्येक व्यक्तीने आपले कर्तव्य बजावावे आणि जास्तीत जास्त उत्पादन करावे या दृष्टीने लक्ष पुरविण्यात आले. त्यांत प्रगती झाली व होत आहे. परंतु युद्ध थोडे थंडावताच आपला जुना गाफीलपणा आता पुन: डोकावू लागला आहे. लोकांना आपल्या ऐक्याचा विसर पडू लागला आहे. त्यांनी पुन: जुने वादविवाद व भांडणें उकरून काढली असून देशाला कमजोर बनविणारे वातावरण उत्पन्न करण्यास सुरवात केली आहे. दुर्दैवाने ही आपली जुनी सवय पुन: वर आली आहे. जेव्हा संकट समोर उभे राहिले तेव्हा तिचा त्याग आपण केला होता. परंतु आता पुन: आपण भरकटू लागलो आहोत. परंतु तुम्हाला माहीत आहे की आपल्या सरहद्दीवरील धोका काही तात्पुरता नाही. त्याच्यापासून देशाचे रक्षण करणे हे तुमचे-आमचे पहिले काम आहे. त्यानंतर इतर गोष्टी जो देश आपल्या स्वातंत्र्याचे, आपल्या भूमीचे रक्षण करू शकत नाही त्याची कदर जगात कोण करील? आणि विकासाचे त्याचे सामर्थ्य तरी काय असणार?

या वेळी आपले सर्वात मोठे कार्य देशरक्षण हे आहे. अर्थात देशाचे सामर्थ्य वाढविणे, देशातील उत्पादन वाढविणे, देशातून दारिद्र्याचे उच्चाटण करणे, देशाला समृद्ध बनवून प्रत्येकाला विकासाची समान संधी मिळवून देणे, वगैरे कामेही महत्त्वाची आहेतच. भारतात राहाणाऱ्या लाखो लोकांना व आपल्या मुलाबाळांना विकासाची पूर्ण संधी मिळाली पाहिजे, त्यांना सर्व गोष्टी मिळाल्या पाहिजेत, त्यांना उत्तम प्रकारे देशाची सेवा करता आली पाहिजे, हे सारे खरे परंतु देशाची इभ्रत, देशाचे स्वातंत्र्य टिकेल तरच या गोष्टी होऊ शकतील. त्यात ढिलाई झाली, तर राष्ट्राचे धैर्य खचते, कंबर मोडते आणि ते कामातून जाते. म्हणून जो देश स्वतंत्र आहे व स्वतंत्र राहू इच्छितो तो देशाच्या रक्षणाला पहिले स्थान देतो व इतर गोष्टींना दुय्यम लेखतो. देशाच्या रक्षणाच्या प्रश्नावर वादविवाद होता कामा नये. चर्चा अवश्य व्हावी, पण मतभेद नकोत प्रत्येक भारतीयाचे एकच मत असले पाहिजे, आणि एकमत असेल तर सर्वांनी एकाच स्वरात बोलले पाहिजे, हे त्याने ओळखले पाहिजे. आपल्या देशाचे ऐक्य ही सर्वात अधिक आवश्यक गोष्ट आहे. देशाच्या

ऐक्याचें हे दृश्य आम्ही गतवर्षी आणि या वर्षाच्या प्रारंभी पाहिले होतें. परंतु काही दिवस सरहद्दीवर युद्ध थांबताच लोकांना त्या ऐक्याचा विसर पडू लागला. पुन: लहानमोठीं भांडणें सुरू झालीं, पुन: परस्परविरोधी आवाज ऐकू येऊं लागले, टीकेच्या फेरी झडू लागल्या. ही खेदाची गोष्ट आहे. प्रत्येकाला टीका करण्याचा, चर्चा करण्याचा हक्क आहे. आपला स्वतंत्र देश आहे, आम्ही कोणाला प्रतिबंध करीत नाही; परंतु प्रत्येकाचे जसे हक्क असतात तशी काही कर्तव्येंही असतात. जो आपल्या कर्तव्याकडे दुर्लक्ष करील त्याला हक्कासंबंधी बोलण्याचा काय अधिकार? देशाचें रक्षण करणें, देशाचें ऐक्य टिकविणें, देशाचें सामर्थ्य वाढविणें व देशाची सेवा करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. प्रत्येक भारतीयाची ही कर्तव्यें आहेत—मग त्याचा धर्म कोणताही असो आणि तो भारताच्या कोणत्याही भागात राहाणारा असो. त्याचा विसर आपल्याला पडला की आपले हक्कही हिरावले जातात. ते आपण जोराने मागू शकत नाही. हक्क प्रत्येकाला आहेत व असले पाहिजेत. परंतु लोकांचे असे अनेक हक्क आहेत की जे या वेळी पूर्णपणे चालू शकत नाहीत. भारतातील प्रत्येक माणसाला सुखी जीवन घालविण्याचा हक्क आहे. त्याचें दारिद्र्य नाहीसे झाले पाहिजे, त्याच्यावर दारिद्र्याचें ओझें असता कामा नये, आणि त्याच्या मुलाबाळांना सर्व प्रकारच्या विकासाची संधी मिळाली पाहिजे. आम्ही प्रयत्न करीत आहोत आणि जसा काळ हळूहळू अधिकाधिक येत जाईल अशी आशा आम्हाला आहे. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की या वेळी आपण त्या टप्प्यापासून दूर आहोत. आपण जेव्हा आपली कर्तव्यें पार पाडू तेव्हाच त्या ठिकाणी जाऊन पोहोचू

मी तुम्हाला सांगितले की देश संकटात आहे. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की या वेळी एखादी विशेष घटना घडणार आहे. परंतु अलीकडे जे दृश्य आपल्याला दिसते त्यामुळे आपल्या सरहद्दीवर उत्पन्न झालेल्या नव्या संकटाचा व धोक्याचा आपल्याला विसर पडला आहे. त्या संकटांना तोंड देण्यासाठी आपण तेथे सैन्य धाडावें, विमानें धाडावीत, हें बरोबर आहे. परंतु नुसतें सैन्य आणि विमानें देशाचें रक्षण करू शकत नाहीत. आजकाल सबंध देशातील लोक, सारी जनता, स्त्रीपुरुष जेव्हा देशरक्षणासाठी काहीना काही काम करतात तेव्हाच देशाचें रक्षण होतें. सरहद्दींच्या संरक्षणामागे संपूर्ण देशाची शक्ती असली पाहिजे; आणि देशाची शक्ती म्हणजे ऐक्य. तुम्ही शेतात काम करीत असा की कारखान्यात, तुम्ही मिळून-मिसळून, एकोप्याने काम केले पाहिजे ही पहिली गोष्ट आहे. लोकांनी यासाठी तयार व्हावें व त्या मार्गाने देशाचें सामर्थ्य वाढवावें. त्याचा परिणाम असा होईल की आपले लष्करी सामर्थ्य ही वाढेल व इतर प्रकारानीही आपली शक्ती वाढेल. आपल्यासमोर मोठमोठे प्रश्न आहेत, हें लक्षात ठेवा. आपल्या पंचवार्षिक योजनांचेही प्रश्न मोठे होते

ते आता पुष्कळच वाढले आहेत. जग विचित्र आहे. जग बदलत असते. जगामध्ये एकीकडे ॲटम बॉंब व हायड्रोजन बॉंबचा वापर होण्याची शक्यता असलेल्या युद्धांचे धोके आहेत, तर दुसरीकडे काही चांगल्या गोष्टीही दिसत आहेत.

ॲटम बॉंब संबंधीच्या एका करारावर अमेरिका, रशिया व इंग्लंड या देशाच्या प्रतिनिधींनी मॉस्कोमध्ये नुकत्याच सह्या केल्या. नंतर इतरही देशांनी सह्या केल्या. आपल्या देशानेही सही केली. तो (अण्वस्त्र बंदीचा) करार युद्धाची भीती नाहीशी करीत नाही, आमच्यापुढील धोके कमी करीत नाही, तरी तो एक मार्ग दाखवितो. त्या मार्गाने गेल्यास कदाचित युद्धावर काबू मिळविता येईल व जगात शांतता नांदू शकेल. मॉस्कोमध्ये ज्या ठरावावर सह्या झाल्या तो आम्ही सात-आठ वर्षांपूर्वीच संयुक्त राष्ट्रांसमोर मांडला होता. या बाबतीतील पहिली हाक भारताने दिलेली होती. आता ती गोष्ट अमलात आली, याचा आम्हाला विशेष आनंद वाटतो. या मार्गावर आता जे पाऊल टाकण्यात आले आहे, ते तसेच पुढे जात राहील व शेवटी जग या धोक्यापासून वाचेल अशी आम्हाला आशा वाटते. आपण एका भयंकर जगात राहात आहोत. त्यात धोकेही आहेत व आशाही आहेत. आजकालच्या तरुणासमोर व मुलांसमोर जे जीवन आहे त्यातही या दोन्ही गोष्टी मिसळलेल्या आहेत—धोके व आशा. अशा काळात आपण राहात आहोत हे चांगलेच आहे; कारण अशा काळात राहिल्यानेच राष्ट्र भक्कम बनते, त्याच्यात हिम्मत येते. कोणत्याही राष्ट्राच्या दृष्टीने फार सुखासीनता ही चांगली गोष्ट नव्हे. ती त्याला दुर्बळ बनविते. आपण सतत सावध राहिले पाहिजे. मी तुमचे व विशेषतः तरुणांचे आणि मुलांचे, ते या काळात राहात असल्याबद्दल, अभिनंदन करतो. आपणा सर्वांसमोर त्याच्या पुष्कळ परीक्षा होतील. शाळा-कॉलेजातून दिल्या जाणाऱ्या परीक्षांपेक्षा या परीक्षा फार मोठ्या असतात. जीवनाच्या परीक्षा जास्त अवघड, जास्त मोठ्या असतात. या परीक्षांमध्ये एखादे पुस्तक वाचून तुम्ही पास होऊ शकत नाही. त्यात पास होण्यासाठी कोणत्याही संकटाला तोंड देता येईल, त्याच्यावर विजय मिळविता येईल, घाबरगुंडी उडणार नाही असे तुमचे चारित्र्य, मन व बुद्धीही सुदृढ असली पाहिजेत. या मार्गाने आपल्याला जावयाचे आहे वर्षे लोटत आहेत, आपल्या स्वतंत्र भारताचे वय वाढत आहे, त्याचबरोबर आपणही मजबूत बनावयाचे आहे. आपण कधीही गाफील राहाता कामा नये. लक्षात ठेवा, आपली मते कितीही असोत—दोन, तीन, शंभर, हजार कितीही का असेनात—परंतु एका बाबतीत आपले सर्वांचे मत एकच आहे. ती म्हणजे भारताचे ऐक्य राखणे, भारताचे रक्षण करणे

ओझी उचलावी लागतात, देशाच्या देश कसे नष्टहोतात हे तुम्ही जाणता. आपल्या-समोर या वेळी तसा प्रकारचे युद्ध नाही. अर्थात पुढे काय होईल हे कोणी सांगू शकणार नाही, परंतु ते संकट टाळण्यासाठी या वेळीही आपण तयार झाले पाहिजे, तयार राहिले पाहिजे व ओझी उचलली पाहिजेत.

भारत हा शांतताप्रिय देश आहे, म्हणून जगात आपली कीर्ती पसरली होती. आज आपण आपले लष्कर वाढवीत आहोत, तरुणांना लष्करी शिक्षण देत आहोत हे खरे, पण त्याचा अर्थ असा नव्हे की आम्ही आमचे शांततेचे धोरण सोडले आहे. आम्ही त्याच शांततेच्या मार्गाने जाणार आहोत, त्याच धोरणाने जगात सर्वत्र वागणार आहोत. एखाद्या देशाशी असलेले आमचे भांडण शांततेच्या मार्गाने मिटत असेल तर तसा प्रयत्न आम्ही अवश्य करू; कारण देशाचा विनाश करणारे व जनतेचे हाल करणारे युद्ध आम्हाला पसंत नाही. परंतु शांतता स्वाभिमानानेच टिकू शकते. घाबरून जाऊन एखाद्या चुकीच्या गोष्टीसमोर मान तुकविल्याने ती निर्माण होऊ शकत नाही. जे लोक घाबरतात ते देशाला दुर्बल बनवितात, त्याला बदनाम करतात. म्हणून आम्ही देशाच्या संरक्षणाची जय्यत तयारी करणार असलो तरी आमचा मार्ग शांततेचाच राहील. जगामध्ये किंवा आमच्याशी संबंधित प्रश्नांमध्ये जेव्हा शांततेच्या मार्गाने निर्णय करणे शक्य असेल तेव्हा आम्ही त्याचाच अवलंब करू. परंतु भारताच्या प्रतिष्ठेला धक्का लागेल अशी कोणतीही गोष्ट घडता कामा नये. म्हणून त्या दृष्टीने आम्ही परिपूर्ण तयारी करू. त्या तयारीचा अर्थ केवळ तोफा-बंदुकांची व लष्कराची जमवाजमव करणे हा नाही. त्या तयारीचा अर्थ असा की समग्र देशातील प्रत्येक व्यक्तीने—पुरुषाने, स्त्रीने व मुलाने—त्यासाठी काही ना काही द्यावे, तयार व्हावे, आपले मन घट्ट करावे, आपली बुद्धी शाबूत ठेवावी व सहकार्याने चालावे. आपल्या देशातील पुष्कळसे लोक वेगवेगळे चालत असतात. एक दिलाने चालणे आपल्या देशातील फार थोड्या लोकांना येते. पायाशी पाय जुळवून चालणे यात काही फार मोठे वैशिष्ट्य आहे असे नाही, सहकार्याने काम करण्याचे ते एक दृश्य स्वरूप आहे. सैन्याचे सामर्थ्य कशात असते? ते लोक सहकार्याने काम करतात, एकमेकांच्या पायाशी पाय जुळवून चालतात. सगळी कामे मिळून करतात, त्यांच्यात शिस्त असते, हेच त्यांचे सामर्थ्य. आपल्याला आपल्या देशाला थोडा शिपाईबाणा शिकवावयाचा आहे, साऱ्या देशाला शिस्त शिकवावयाची आहे. आपल्या भविष्यकाळासाठी अशा प्रकारे आपण तयार झालो तर ते चांगलेच आहे म्हणजे मग या संकटातून आपण जेव्हा बाहेर पडू तेव्हा अधिक शक्तिशाली झालेले असू, आपल्यात अधिक हिम्मत येईल, अधिक आत्मविश्वास येईल आणि समृद्धीच्या मार्गाने आपण सहज जाऊ शकू. जे देश स्वावलंबी असतात,

दुसऱ्यांवर विसंबून राहात नाहीत तेच समर्थ असतात. मैत्री इतरांशी करावी, परंतु भरवसा स्वतःवरच ठेवावा. इतरांशी सहकार्य करावे, परंतु विचार स्वतःच्या बुद्धीने करावयाचा असतो, काम स्वतःच्या हातांनी करावयाचे असते. जेव्हा एखादा देश ही गोष्ट विसरतो, घाबरून जातो, गडबडतो, स्वतःवर अवलंबून राहात नाही, तेव्हा तो खाली पडतो, अपमानित होतो, नाश पावतो. असा देश काय कामाचा?' ही गोष्ट तुम्ही ओळखली पाहिजे. भारतासारख्या मोठ्या देशांतील रहिवाशांनी घाबरून, गडबडून जावे, आत्मविश्वास गमावून बसावे याहून अधिक लज्जास्पद गोष्ट कोणती असू शकेल? आपण स्वतःवर अवलंबून राहिले पाहिजे. जगात आपले मित्र आहेत, इतर देश आहेत. त्यांच्याशी आम्हाला मैत्री करावयाची आहे, त्यांच्या कडून मदतही घ्यावयाची आहे. मोठमोठ्या देशांनी आम्हाला मदत केली आहे. त्याचे आम्ही आभारी आहोत. फक्त मदतीबद्दल नव्हे तर त्यांच्या सहानुभूती-बद्दल आम्ही त्याचे आभारी आहोत. त्यामुळे आमचे ओझे कमी होते. ज्या ध्येयाकडे आम्ही चाललो आहोत, जो प्रवास आम्ही करीत आहोत, त्या ध्येया-पर्यंत आम्ही अवश्य जाऊन पोहोचू व तोपर्यंत आमचा प्रवास चालू ठेवू. ही गोष्ट तुम्ही लक्षात ठेवा. याच सिद्धांतानुसार आपण आपल्या देशाला पुढे न्यावे, त्याचा विकास घडवून आणावा, अशी आमची इच्छा आहे. स्वतःवर अवलंबून इतरांची मदत घेऊन सर्व आर्थिक समस्या सोडवाव्यात आणि देशाला पूर्णपणे स्वावलंबी बनवावे, त्याला त्याच्या पायांवर उभे राहाण्यास समर्थ बनवावे अशी आमची इच्छा आहे. मोठ्या माणसाची काळजी तर आहेच; परतु देशातील कोट्यवधी बालकांना विकासाची, शिक्षणाची, देशसेवेची व स्वतःची सेवा करण्याची पूर्ण संधी मिळावी, अशी माझी इच्छा आहे. ज्यायोगे त्याना अशी संधी मिळेल व देशात कोणी उच्चनीच राहाणार नाही असा भारत आपण निर्माण करू. भविष्यासंबंधीचे हे चित्र आमच्या नजरेसमोर आहे.

आमचे नियोजन मंडळ आहे आणि मोठमोठ्या कचेऱ्या थाटून लोक काम करीत आहेत. परतु तुम्हाला माहीत आहे की सरकारतर्फे केवळ मार्ग-दर्शन केले जाते. खरे काम तर तुम्हाला व भारतातील कोट्यवधी लोकानाच करावयाचे आहे. त्यानी केले तरच ते होईल त्यानी केले नाही तर नियोजन मंडळ ते करू शकणार नाही किंवा सरकारही करू शकणार नाही. सरक्षणाचे काम असो की नियोजनाचे काम असो, ते कोट्यवधी लोकच करतील. कचेरीत बसणारे मूठभर लोक ते करीत नसतात. आपल्या कामाचा संबंध भारतातील 45 कोटी लोकाशी आहे. आपल्याला 45 कोटींना जागे करावयाचे आहे वर काढावयाचे आहे. आणि जास्तीत जास्त म्हणजे मार्गदर्शन करावयाचे आहे. त्यानाच चालावयाचे आहे व फायदाही त्यानीच घ्यावयाचा आहे. आमच्या

समोर हे चित्र आहे. गतवर्षी आमच्या सरहद्दींवर जे काही घडले ते देशाच्या बऱ्यासाठीच घडले, वाईटासाठी नाही असे मी मानतो. त्यामुळे देश प्रबळ बनेल, मजबूत बनेल. त्याला घाबरून आपण स्वस्थ बसलो नाही तर त्याच्यामुळे भावी काळात देशाला पुढे जाण्याचीही तयारी करता येईल. आमच्या राष्ट्राने भ्याडपणाच्या मार्गाने जाण्याची शिकवण घेतलेली नाही. म्हणून आपण यासाठी तयार राहिले पाहिजे.

या सोळाव्या वाढदिवसाच्या प्रसंगी मी पुनः एकदा तुमचे अभिनंदन करतो आणि तुम्ही या दिवसाचे स्मरण ठेवाल अशी आशा बाळगतो. स्वतंत्र भारत हे अजून एक बालक आहे. एका राष्ट्राच्या दृष्टीने सोळा वर्षांचे वय म्हणजे काही फार नव्हे. तसे पाहिल्यास आपला देश हा एक प्राचीन देश आहे. हा जसजसा पुढे जाईल तसतसे याचे सामर्थ्य वाढो, याचे चारित्र्य उत्तम बनो, याच्यात दृढता येवो, याचे मस्तक उंच होवो आणि जगात हा छाती पुढे काढून चालत राहो. या गोष्टी तुम्ही लक्षात ठेवा. विशेषतः आपल्या देशात जे लोक राहातात—ते कोणत्याही भागात राहात असोत, त्यांचा धर्म कोणताही असो—ते सारे आपले बांधव आहेत व सर्वांना मिळून पुढे जावयाचे आहे हे विसरू नका. जो कोणीही गोष्ट विसरतो तो देशाची सेवा करीत नाही.

1963

जय हिंद !

GIPN—S6—14 P D (I&B)/65—30-6-66—3,000